


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

# राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

ऑगस्ट-सप्टेंबर २००७

## जे० पी० नाइक
## जन्मशताब्दी
## विशेषांक






*JP Naik, thou shouldst be living*
*at this hour*
*India hath need of thee.*

शिक्षण आणि समाजपरिवर्तन ही एक अखंड प्रक्रिया आहे. यासाठी नवभारतचा २००३ मधील विशेषांकही पहावा. त्यातील अनुक्रमणिका मुखपृष्ठ क्र. ३ वर पहावी.






# जे. पी. नाईक जन्मशताब्दी निमित्ताने

डॉ. जे. पी. नाईक हे शिक्षणक्षेत्रातील प्रतिभावान विचारवंत. त्यांचे हे जन्मशताब्दी वर्ष. त्यांनी कोठारी कमिशनचे सदस्य-सचिव असताना जो रिपोर्ट लिहिला त्यामध्ये शिक्षण पद्धतीबद्दल अनेक मौलिक विचार आहेत. जे. पी. नाईक हे श्रेष्ठ गणिती होते. विज्ञानाच्या साहाय्याने भारतीय शिक्षण पद्धतीची आमुलाग्र पुनर्रचना करणे हे त्यांचे स्वप्न होते. २१ व्या शतकात जे माहिती-तंत्रज्ञान विकसित झालेले आहे, त्याच्या साहाय्याने शिक्षण पद्धतीची पुनर्रचना करून जे. पी. नाईक यांचे स्वप्न साकार करणे शक्य आहे. या कार्यासाठी भारतातील अनेक वैज्ञानिक, शिक्षणतज्ज्ञ आणि शिक्षणक्षेत्रात संशोधन करणाऱ्या संस्था यांनी एकत्र येऊन या कार्यासाठी एक 'आयकन्सेंट' तयार केले आहे. हे 'आयकन्सेंट' आणि 'महाराष्ट्र ज्ञान महामंडळ' यांनी मिळून हे कार्य अंगीकारले आहे. जे. पी. नाईक यांच्या जन्मशताब्दी निमित्त या अभियानाचे उद्‌घाटन ३० जूनला झाले. या निमित्ताने डॉ. राम ताकवले यांनी शिक्षणतज्ज्ञांची एक बैठक पुण्यात बोलावली होती. त्यात डॉ. रघुनाथ माशेलकर, डॉ. विजय भटकर, अरुण साधू, रावसाहेब शिंदे, पु. ग. वैद्य आदी मान्यवर सहभागी झाले होते. 'अंतर्नाद' चे संपादक भानू काळे यांनी त्यांच्याशी संवाद साधला. त्या चर्चेमध्ये राज्यभरातील एमकेसीएलच्या तीन हजार केंद्रातील शिक्षक दृक् श्राव्य माध्यमातून सहभागी झाले होते. त्यानंतर प्रा. ग. प्र. प्रधान आणि डॉ. चित्रा नाईक यांची ध्वनिचित्रमुद्रित केलेली भाषणे सादर करण्यात आली. ग. प्र. प्रधान म्हणाले, "महाराष्ट्रात पावणेपाच लाख शिक्षक आहेत, एकूण नव्वद हजार शाळा आहेत आणि तरीही अनेक मुले-मुली शिक्षणापासून वंचित आहेत. या सर्व मुलामुलींना शिकविण्यासाठी मुक्त शाळा काढाव्या लागतील, या शाळांमध्ये विद्यार्थ्यांना ८ वी नंतर त्यांच्या आवडीनुसार विषय शिकवून, त्यांच्यातील सुप्त गुणांचा विकास घडवून आणता येईल. शाळेतील अध्यापकांशिवाय आधुनिक तंत्रविज्ञानाचा उपयोग करून व्ही.डी.ओ.कॅसेटद्वारा प्रत्येक विषयातील श्रेष्ठ अध्यापक, अध्यापिका, प्राध्यापक यांच्या अध्यापनाचा फायदा या विद्यार्थ्यांना मिळू शकेल. विद्यार्थ्यांच्या मनात ज्ञानाबद्दलची ओढ निर्माण झाल्यावरच त्याला शिकण्यात आनंद वाटू लागेल. शिक्षणामध्ये अध्ययन, अध्यापन आणि सृजनशील ज्ञान यांचा समावेश असला पाहिजे. नव्या युगातील शिक्षकाला त्याच्या विषयाचे ज्ञान असलेच पाहिजे, शिवाय त्याला अध्यापनात कॉम्प्युटरचा उपयोग करता आला पाहिजे.

माणूस एकेकाळी भटक्या, शिकारीवर जगणारा होता. शेती ही त्याच्या प्रगतीची पहिली अवस्था. औद्योगिक क्रांती ही प्रगतीची दुसरी अवस्था आणि ज्ञानाधिष्ठित समाज ही प्रगतीची तिसरी अवस्था. आधुनिक तंत्रविज्ञानाच्या साहाय्याने सर्व मुलामुलींना ज्ञान देऊन त्यांच्या ज्ञानोपासनेतून ज्ञानाधिष्ठित समाज निर्माण करून आपण जे. पी. नाईक यांची जन्मशताब्दी साजरी केली पाहिजे."

डॉ. चित्रा नाईक म्हणाल्या, "शिक्षण हा समाज-जीवनाचा भाग आहे. जो समाजात ज्ञानोत्सुक असेल, तेथेच शिक्षण दिले जाईल. शिक्षण घेताना विद्यार्थी जे प्रश्न विचारू लागतो, त्या प्रश्नांचे समाधानकारक उत्तर अध्यापकांनी दिले पाहिजे. जीवन व शिक्षण यांची फारकत होऊन चालणार नाही. हा महात्मा गांधींचा विचार अत्यंत मौलिक आहे. जे. पी. नाईक यांनी समाजजीवनाचे व शिक्षणाचे नाते हे जिव्हाळ्याचे असले पाहिजे या सूत्राच्या आधारे शिक्षणक्षेत्रात अनेक प्रयोग केले. आजच्या तंत्रविज्ञानाच्या साहाय्याने त्यांच्या प्रयोगांचे परिणत स्वरूप शिक्षणक्षेत्रात दिसू शकेल. डॉ. नाईकांचे शिक्षणाबद्दलचे स्वप्न ज्ञानाधिष्ठित समाजातच साकार होईल."

(साधना, ७ जुलै २००७, पृष्ठ क्र. २)

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

इंडियन कौन्सिल ऑफ सोशल सायन्स रिसर्च (ICSSR)दिल्ली, यांच्या पश्चिम विभागीय कार्यालयाने या जे. पी. नाईक विशेषकांसाठी अनुदान दिलेले आहे. आम्ही त्यांचे आणि त्यांच्या पश्चिम विभागीय कार्यालयाचे प्रमुख डॉ. नीरज हातेकर यांचे आभारी आहोत.

प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.





**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियत-कालिकाला अनुदान दिले आहे व या विशेषांकासाठी ICSSR (Indian Council of Social Science Research, Delhi) यांच्या पश्चिम विभागीय कार्यालयाकडून अनुदान मिळाले आहे. असे असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ, राज्य शासन व ही संस्था सहमत असेलच, असे नाही.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका












# अतिथी संपादकीय

देवदत्त दाभोलकर



१ व २ सप्टेंबर २००७ च्या कृति-चर्चासत्राविषयीचे टिपण पृ० ४ व ६ वर पहावे.

उत्तर-नव भारत

हा संपूर्ण अंकच 'उत्तर-नव भारत : विकासाची विविध प्रतिमाने : शिक्षण' याला वाहिलेला आहे. यात काही सहभाग देऊ इच्छिणाऱ्यांसाठी एक रचनाही सुचविण्यात आलेली आहे. प्रत्यक्ष कार्यवाहीच्या दृष्टीने तिचा अधिक विचार होऊ शकतो. या सर्वांची यथोचित मांडणीही या सदरातून होऊ शकते.

आधी प्रकट केल्याप्रमाणे मी या अंकापासून अतिथी संपादक म्हणून सूत्रे खाली ठेवत आहे.

नवभारत संपादकांच्या पूर्वसूरींच्या विचार-धारांचा निर्देश व तपशील या आधीच्या अंकातून आलेला आहे. माझ्या अतिथी संपादनाच्या काल-खंडात संपादक मंडळ व संचालक मंडळ यांनी मला कोणतीही पूर्वअट न घालता जे संपूर्ण सहकार्य अगत्यपूर्वक दिले त्यासाठी मी त्यांचा मनापासून ऋणी आहे. अधिक ते सरते। न्यून ते परते। करुनि घेयावे इतुके विनवितुसे।

'उत्तर-नव भारत : विकास प्रतिमाने' याचे नवभारत वाहक व्हावे असे मला वाटते. नियमित स्वरूपात ते सदर येऊ सकल्यास चांगलेच. परंतु अनियतकालिक क्रमांकानेही ते येत गेल्यास नवभारताच्या ध्येय कल्पनेशी ते सुसंगत होईल. मुक्त व्यासपीठाचे ते कृति-निदर्शक अंग राहील.

नवभारतच्या पहिल्या अंकापासून मी नवभारतच्या प्रेमात पडलो. डिसेंबर १९४८ च्या अंकात माझा 'प्राचीचे प्रश्नचिन्ह : जपान' हा लेख प्रसिद्ध झाला, तेव्हापासून आजतागायत हे प्रेम आणि नवभारत परिवाराशी निकटचे ऋणानुबंध अखंड उत्तरोत्तर दृढ होत गेले आहेत. हे ऋण हे माझे मोठे धन आहे.



अनुक्रमणिका










# चर्चासत्रांविषयी

## 'उत्तर-नव' भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

संयोजक : नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही साभार स्वीकार करण्यात येईल.)

### निवेदन

जे०पी० नाईक यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'नवभारत' मासिक, 'अ०ल०दा० निकेतन', सातारा व 'नारळकर ट्रस्ट', पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने हे चर्चासत्र आयोजित करण्यात आले आहे. शिक्षणाच्या क्षेत्रात कृतिशील कार्य करणाऱ्या सर्व संस्थांचे व व्यक्तींचे यात स्वागत आहे. परस्परसहकार्याने काही अधिक घडवता येते का हे शोधण्याचा प्रयत्न या चर्चासत्रात करण्यात येईल. त्याची कार्यवाही करण्याचा प्रयत्न वरील तीन संस्था करतील.

जे० पी० नाईक यांच्या The Education Commission and After या शेवटच्या ग्रंथातील त्यांचे शेवटचे आवाहन सोबत जोडले आहे. (पृ० ६ पहावे.) हे आवाहन काही व्यक्तींना पेलण्यासारखे नाही हे उघड आहे. परंतु प्रारंभ तर केलाच पाहिजे आणि काही संस्थांनी व व्यक्तींनी त्याचा काही प्रारंभही केला आहे. अशा सर्वांचे प्रतिवर्षी सहचिंतन, अनुभवांचे आदानप्रदान व्हावे अशी रचना करणे शक्य होईल असे वाटते.

प्रश्न तनमनधनाने यात सहभागी होण्याच्या इच्छेच्या प्रभावी प्रेरणेचा आहे. हे कार्य आपल्याला निकडीचे वाटत असेल तर त्यासाठी आपला किती वेळ, शारीरिक क्षमता व पैसा, कशाचीही अपेक्षा न ठेवता करू शकतो याचा आहे.

अशा विचारविनिमयासाठी या चर्चासत्राचे आयोजन करण्यात आले आहे. निश्चितपणे सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांनी शंभर रुपये पाठवून मागणी केल्यास त्यांच्याकडे 'नवभारत' मासिकाचा शिक्षण आणि समाजपरिवर्तन हा अंक व येता जन्मशताब्दी अंक पाठविण्यात येईल.

येणाऱ्यांनी आपापली टिपणे पाठवावीत. न येऊ शकणाऱ्यांनीही आपली टिपणे पाठवावीत, म्हणजे एकूण प्रतिसादाची कल्पना येऊ शकेल.

सहभागी होणाऱ्यांनी येण्याजाण्याचा खर्च आपापला करावयाचा आहे. भोजनादिसाठी सहभाग प्रतिदिनी रुपये शंभर. निवासाची साधी व्यवस्था असेल.

चर्चासत्र दि० १ व २ सप्टेंबर रोजी होईल. सहभागी होणाऱ्यांची नावे कळल्यानंतर सर्वांच्या दृष्टीने अधिक सोयीच्या ठिकाणी (वाई, सातारा, पुणे) जागा निश्चित करून त्या लोकांना निश्चित जागा कळवली जाईल.

संपर्कासाठी पत्ते -

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८
E-mail : devdatta123@hotmail.com
E-mail केल्याचे फोनवर कळवावे.

**प्रा. यशवंत कळमकर**
**निवास :** २४१०-क, सोनगीरवाडी,
दूरध्वनी कॉलनी रस्ता, वाई ४१२८०३
दूरध्वनी : (०२१६७) २२२७०४
**कार्यालय :** सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई
दूरध्वनी : (०२१६७) २२०००६










# जे० पी० नाईक
## एक पुण्यस्मरण



जे० पी० नाईक यांचा आणि माझा निकटचा परिचय तीन तपांचा. कोरगावकर ट्रस्ट त्या काळात दरवर्षी कोल्हापूर येथे महाराष्ट्रातील कार्यकर्त्यांचे एक स्नेहमीलन दोन तीन दिवस घेत असे. नामवंत मंडळी त्यात सहभागी होत. मलाही कौतुकाने आमंत्रण असे. त्या संमेलनात ते भेटत.

मौनी विद्यापीठाचा संचालक म्हणून मी यावे अशी त्यांची इच्छा होती. मी नुकताच आधी डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा आजीव सदस्य झालो होतो. त्यामुळे मी नकार दिला. त्याच्यानंतर ICSSR चे संचालक म्हणून मी त्यांच्या नंतर काम करावे अशीही त्यांची इच्छा होती. तेही जमले नाही. इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशनचे पुण्याला स्थलांतर झाले तेव्हा पुणे विद्यापीठातून कुलगुरू म्हणून निवृत्त झाल्यानंतर त्या संस्थेत संचालक म्हणून जबाबदारी स्वीकारली. त्या संस्थेतील माझा काळ आनंदाचा उत्साहाचा गेला.

'जे० पी० नाईक तुम्हाला इतके का मानतात' हा प्रश्न भारतात व इतरत्रही मला अनेकांनी विचारला आहे. त्यातील गर्भितार्थाशी मी सहमत आहे. त्यांना माझ्या मनात वडील बंधूंचे स्थान सदैव होते. ती वडील बंधूंची उदारता त्यांच्या मानसिकतेत होती असे मला वाटते.

माझा रशियाला जायचा कार्यक्रम ठरला होता. जे० पी० नाईक मृत्यूशय्येवर अत्यवस्थ होते. मी चित्राताईंशी 'मी जाणे रहित करतो' असे म्हटले. आगळ्या धीराने त्यांनी एकाच शब्दात उत्तर दिले, 'Nonsense.' मी दुसरे दिवशी मॉस्कोला पोहोचलो. रशियन संस्थेचे संचालक Kotovsky यांनी आदल्या रात्री जे० पी० नाईक यांचे निधन झाल्याची तार आल्याचे सांगितले.

तीन आठवड्यांनी मी परत आलो. काही महिने उलटले. एके दिवशी दुपारी 'चित्राताईंनी बोलावले आहे' असा निरोप आला. मी खाली गेलो. लॉनवर जे० पी० नाईक यांच्या समाधीचे काम पूर्ण झाले होते. चित्राताई एकट्या तेथे उभ्या होत्या. अस्थिकलश समाधीमध्ये ठेवावयास त्यांनी मला सांगितले. मला काही सुचेना. मी शेजारचीच चार पाच पानेफुले खुडली आणि कलश समाधीत ठेवून त्यावर ती वाहिली आणि मूकपणे परतलो.

भावजीवनाची तीन तपे त्या क्षणात एकवटलेली होती.

- देवदत्त दाभोलकर

☑ ☑ ☑

# Walking In the footsteps of J.P. Naik

## A New National System of Education

The creation of a national system of education is not an easy task; it involves the making of hard decisions, the provision of massive resources, the organization of a sustained nationwide movement and a pre-paredness to alienate many a vested interest. The task becomes all the more difficult because it has to be accompanied by a simultaneous effort at a radical reconstruction of the society itself. The experience of the past thirty years has shown that we can succeed in this task only if -

- we make a big R&D effort to generate the required knowledge and expertise to plan radical educational changes and to implement them;
- we educate all concerned on the need and implication of such educational transformation and the price to be paid for it;
- we create and sustain a nationwide movement at the macro- and micro-level to bring about radical changes;
- we educate political parties and workers on basic educational issues and create strong pressures within the parties themselves in favour of the educational changes needed;
- we organize a continuous campaign in favour of the educational reforms throughout the country so that sufficient pressures are generated from outside to make Governments sit up and take notice;
- we harness the assistance of all political and social workers who should be made education-conscious and see the close relationship between their socio-political programmes and educational transformation; and
- we create the necessary vision and moral commitment among teachers, students and educational administrators for the new society and the new education we need.

It is these measures that will create the social climate within which it will be possible to plan and create a national system of education suited to the new society visualized in the Preamble to the Constitution.

(The Education Commission and After, By J. P. Naik, Pp. 242-243)

☑ ☑ ☑







अनुक्रमणिका

# महात्मा गांधींना अभिवादन

## प्रा०वि०म० बेडेकर

## (प्रथम वर्षाच्या प्रथम अंकातील (ऑक्टोबर १९४७) संपादकियातून)

या ऑक्टोबर २ रोजी महात्मा गांधींना ७८ वर्षे पुरी होत असून ते ७९ व्या वर्षात पदार्पण करीत आहेत. या त्यांच्या वाढदिवशी प्रत्येक हिंदवासियाचे अंतःकरण त्यांच्याविषयीच्या शुभेच्छेने उचंबळून आल्याशिवाय राहणार नाही. ऑगस्ट १५ ला हिंदुस्थान स्वतंत्र झाला. त्या दिवशी हिंदी संघराज्याच्या घटनासमितीत व बाहेर वृत्तपत्रांतून आणि व्यासपीठावरून सर्वत्र एकमुखाने महात्मा गांधींचा "हिंदी स्वातंत्र्याचे विधाते वा जनक (The Architect or Father of Indian freedom)" म्हणून जो अंतःकरणापासून गौरव झाला, त्याची आपली आठवण अजून अगदी ताजी आहे. भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीची घटना, हिला जगात तोड नाही, असे तज्ज्ञांकडूनही म्हटले जाते. चाळीस कोटी लोकांना इतके शांततामय व सदिच्छापूर्वक सत्तासंक्रमण ही गोष्ट जगाच्या इतिहासात अभूतपूर्व अशी आहे. या घटनेला जागतिक परिस्थिती, ग्रेट ब्रिटनची सध्याची स्थिती व त्या स्थितीतही दिसून येणारा ब्रिटिशांचा सूज्ञपणा ही जशी कारणे आहेत त्यांचबरोबर हिंदुस्थानने प्रचंड प्रमाणावर आचरुन दाखविलेले अनत्याचारी शांततामय प्रतिकार हेही एक प्रभावी कारण होय, हे कोणालाही कबूल करावे लागेल. या अनत्याचारी प्रतिकाराची प्रेरणा, योजना व यशस्वी आचार प्रामुख्याने गांधीजींनी करुन दाखविला आहे यातच त्यांची असामान्य थोरवी आहे.

हिंदी स्वातंत्र्यप्राप्तीमुळे महात्मा गांधींचे एक जीवनकार्य सफल झाले असूनही आज दुर्दैवाची गोष्ट अशी की, त्यांना व हिंदी जनतेला या साफल्याचा आनंद अनुभवायला मिळत नाही. गांधीजी स्वत: दुर्दम्य आशावादी आहेत, तरी त्यांच्याही जीवनात या वैफल्याची कटु जाणीव उत्पन्न होणे अस्वाभाविक नाही. परकीय सत्तेने आपल्या स्वार्थाकरिता उठविलेले धर्मांधतेचे, जात्यंधतेचे, यादवीचे भूत आज भारताच्या मानगुटी बसले असून आज भारतीयांचे डोके ठिकाणावर नाही. अशांततेने, धर्मांधतेने गजबजलेल्या वातावरणात महात्मा गांधींची माणुसकीची 'पुकार' ऐकू येईनाशी झाली आहे.

अशा परिस्थितीत गांधीजींना आपल्या जीवन-दर्शनाच्या व जीवनकार्याच्या कसोटीची वेळ आली आहे, असे वाटत असल्यास नवल नाही. हिंदु-मुस्लीम ऐक्यासाठी, शांती प्रस्थापित करण्यासाठी ते आज आपली तपस्या व आपले प्राणही पणास लावावयास तयार झाले आहेत. हा सर्वत्र पेटलेला वणवा आपल्या अहिंसेच्या शान्त्युदकाने शमवावयास उद्युक्त झालेला हा एकाकी महात्मा सकृद्दर्शनी अव्यवहारी, स्वप्नाळू वाटत असल्यास नवल नाही. गांधीजींच्या जीवनात असे अव्यवहारित्व, एकाकित्व अनेक वेळा जगाच्या निदर्शनास आले आहे.

आणि गांधीजींच्या असामान्यत्वाचे रहस्य त्यांच्या सकृद्दर्शनी वाटणाऱ्या या अव्यवहारित्वात, 'एकलेपणात' साठविलेले आहे. या 'अमानुष' काळात पुन्हा माणुसकी प्रस्थापित करुन तिचा उत्कर्ष करणे हे त्यांचे जीवितकार्य आहे. याच उच्च नैतिक भूमिकेवरुन त्यांनी परकीयांशी देशाच्या स्वातंत्र्याचा यशस्वी लढा आतापर्यंत चालविला होता. याच भूमिकेवरुन आज ते स्वकीयांच्या अमानुष प्रवृत्तींना धीरगंभीरपणे तोंड देत आहेत. आणि या लढ्यात ते यशस्वी होतील याची चिन्हे स्पष्ट दिसू लागली आहेत. कलकत्ता व बंगालमध्ये झालेली शांती अत्यंत आशादायक आहे.

गांधीजींचा आशावाद दुर्दम्य आहे. केवळ हिंदुस्थानातच काय, सर्व जगात शांती प्रस्थापित करणे हे त्यांच्या जीविताचे ध्येय आहे.

हिंदुस्थानचे स्वातंत्र्यसंपादन हा त्यांच्या जीवन-कार्याचा एक टप्पा संपला आहे. पुढील टप्पे साधण्याकरिता गांधीजींना परमेश्वराने आयुरारोग्य द्यावे अशी प्रार्थना करणे प्रत्येक हिंदवासियाचे कर्तव्य आहे.

☑ ☑ ☑

# स्मरण एका थोर शिक्षणतज्ज्ञाचे...

## डॉ० राम ताकवले

जे. पी. नाईक यांचे मूळ नाव व्ही.एच. घोटगे. त्यांचा जन्म बहिरेवाडी या कोल्हापूर जिल्ह्यातील छोट्याशा गावात एका गरीब , पण मोठ्या शेतकरी कुटुंबात झाला. गावातील चौथीपर्यंतच्या शाळेतील अभ्यास दोन वर्षांतच पूर्ण करून शाळा सोडून गुरे वळण्याचे काम हा मुलगा करु लागला. योगायोगाने त्यांना पुढे शिक्षणाची संधी मिळाली आणि बेळगाव, धारवाड आणि कोल्हापूर येथे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करून त्यांनी गणित हा विषय घेऊन बी. ए. पदवी मिळवली. त्यांनी १९३० मध्ये स्वातंत्र्यलढ्यात भाग घेतला. गांधीवादी विचारांचा पगडा त्यांच्यावर सातत्याने राहिला. साधे खादी कपडे आणि साधी जीवनपद्धती त्यांनी जीवनभर आचरणात आणली.

जे. पी. नाईक यांना अलौकिक बुद्धिमत्ता व स्मरणशक्ती लाभली होती. प्रचंड वाचन, इतरांना अभ्यासात मदत करणे आणि गणितापासून समाजविज्ञान, भाषा आदी अनेक विषयांवरील प्रभुत्व यासाठी ते प्रसिद्ध होते. त्यांच्या शैक्षणिक जीवनकार्याची सुरुवात खेडेगावात प्राथमिक शाळा सुरु करण्यापासून झाली. शिक्षण आणि खेड्याचा विकास या गांधीजींच्या 'मूळ शिक्षण' व 'जीवनशिक्षण' पद्धतीचे सूत्र त्यांनी आपल्या पद्धतीने विकसित केले. त्यांनी १७ प्राथमिक शाळा काढल्या. नंतर त्यांनी मुंबई प्रांतात (१९३७-४०) आणि कोल्हापूर संस्थानात (१९४०-४७) शिक्षण आणि विकास अधिकारी म्हणून काम केले. मुंबईत भारतीय शिक्षण संस्थेची स्थापना केली. (१९४८-५९). त्यानंतर ही संस्था पुण्यात आणली. याच काळात ग्रामीण शिक्षणाचा विकास करण्यासाठी गारगोटी येथे मौनी विद्यापीठ स्थापन करण्यात त्यांचा पुढाकार होता. त्यांनी नंतर केंद्रीय शिक्षण मंत्रालयात (१९५९-७३) प्राथमिक शिक्षणाचे सल्लागार म्हणून काम केले. पुढे भारतीय समाजविज्ञान संशोधन संस्थेची स्थापना करून तिच्या सुरुवातीस प्रमुख प्रशासक आणि नंतर सदस्य सचिव म्हणून काम केले (१९६७-७८).

जे. पी. नाईक यांच्या सूचनेवरुन डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांचा जन्मदिवस ५ सप्टेंबर हा शिक्षकदिन म्हणून पाळला जातो. केंद्रीय सल्लागार म्हणून काम करताना त्यांनी कधीही वेतन घेतले नाही. 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ पब्लिक ॲडमिनिस्ट्रेशन' च्या वसतिगृहातील खोलीमध्ये ते वास्तव्य करीत. 'शिक्षणआयोगा'चे सदस्य -सचिव म्हणून त्यांनी केलेले कार्य मोलाचे आहे. आंतरराष्ट्रीय स्तरावर त्यांना काम करण्याच्या अनेक संधी मिळाल्या. विशेषत: त्यांनी विकसनशील देशांतील शिक्षणपद्धती घडविण्यासाठी जे कार्य केले, अहवाल लिहिले ते शिक्षणाला नवी दिशा देणारे, शिक्षणाचा विकासाशी संबंध जोडणारे होते. जे. पी. नाईक यांनी जीवनभर जे कार्य केले, त्यांचे सूत्र शिक्षण आयोगाच्या (१९६४-६६) अहवालात पूर्णपणे प्रकट झाले आहे. आयोगाने शिक्षणाचा व्यापक विचार केला. ते विकासाशी जोडण्याचा प्रयत्न केला आणि शिशु शिक्षणापासून ते संशोधनापर्यंत शिक्षणाचा आराखडा व दिशा देण्याचा प्रयत्न केला. अहवालाच्या अंमलबजावणीतून 'राष्ट्रीय शिक्षणपद्धती' निर्माण होईल व हे परिवर्तन घडवून आणण्यासाठी शैक्षणिक क्रांती निर्माण होईल, असा विश्वास आयोगाला वाटत होता. या परिवर्नाच्या क्रांतीचे नेतृत्व शिक्षक, विद्यार्थी, शिक्षण प्रशासक व शासन करेल अशा तऱ्हेने अहवालाची मांडणी करण्यात आली. राष्ट्रीय शिक्षणपद्धतीचे मूळ हे भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या काळात निर्माण झालेल्या 'राष्ट्रीय शिक्षणा'त आणि महात्मा गांधींच्या जीवनशिक्षणाच्या विचारात आहे.

स्वातंत्र्यानंतर स्वीकारलेली प्रजासत्ताक राज्यघटना व विविध सुधारणा आणि बदल यासंबंधी जे. पी. नाईक यांनी केलेले विश्लेषण अत्यंत मूलगामी आहे आणि आजच्या परिवर्तनाच्या काळात त्याला फार महत्त्व आहे. भारताने सर्वच क्षेत्रात आज भरीव कामगिरी केली आहे. प्रगतीचा वेगही वाढतो आहे, लोकसहभागही लोकजागृती होऊन वाढला आहे. २०२० मध्ये प्रगत देशांत भारत आघाडीवर असेल. तरीही आपण समता व न्यायावर आधारलेल्या समाजाच्या घडणी-

पासून फार दूर आहोत. विविध क्षेत्रांतील विषमताही वाढीस लागली आहे.

शैक्षणिक क्रांती न घडण्याची दोन प्रमुख कारणे जे. पी. नाईक यांनी दिली. एकतर क्रांती घडवून आणण्याची जबाबदारी आणि नेतृत्व शिक्षक, विद्यार्थी, शिक्षण प्रशासन व शासनावर दिले हे चुकले आणि विकासाची संकल्पना व प्रारूप स्पष्ट नव्हते, तसेच त्याचा शिक्षणाशी असलेला संबंधही अस्पष्ट होता. शैक्षणिक परिवर्तन न घडण्याची आणि सर्वांपर्यंत न पोचण्याची पाच कारणे त्यांनी दिली आहेत. ती म्हणजे : १) औपचारिक आणि प्रौढ शिक्षणामध्ये केलेली फारकत, २) शिक्षण विस्तारासाठी चुकीच्या प्रारूपांचा व तंत्राचा वापर, ३) शिक्षणामध्ये समाजाचा सहभाग नाही, ४) समाजातील दारिद्र्याचा प्रश्न सोडवला नाही, आणि ५) पूर्वी असलेली बुद्धिवंतांमधील सामाजिकता आणि सेवावृत्ती थंड होत गेली.

कोणत्याही क्रांतीमध्ये प्रस्थापित व सत्तेत हितसंबंध असलेल्यांकडून क्रांतीची अपेक्षा करणेच चूक आहे. क्रांती म्हणजे उलथापालथ. खालचे वर आणि वरचे खाली आणि सत्ता कधी दिली जात नाही; घेतली जाते. त्यासाठी लागणारी सबळीकरणाची प्रक्रिया शिक्षणव्यवस्था निर्माण करु शकली नाही. म्हणून स्वातंत्र्यानंतर गेल्या ५८ वर्षांत बदल हळूहळू घडताहेत. क्रांतिकारक पद्धतीने; वेगाने नव्हे.

नाईक यांच्या मृत्यूनंतरही आता पाव शतक लोटले आहे. खूप बदल आणि प्रगती झाली आहे. माहिती तंत्रज्ञानाचे युग सुरू झाले आहे. नाईक यांना विसाव्या शतकातील विकासाची दोनही प्रारूपे (भांडवलदारी विकास पद्धती व समाजवादी/साम्यवादी विकास पद्धती) अमान्य होती. गांधीजींच्या समन्वय मार्गावर, सर्वोदयावर त्यांचा विश्वास होता व भारताला त्याचेच एखादे प्रारूप सर्वांगीण विकासासाठी उपयोगी पडेल हा त्यांचा विचार होता.

जे. पी. नाईक यांच्या विचारांचा व विश्लेषणाचा आज खरा वापर होऊ शकतो. शैक्षणिक क्रांतीची सुरुवात माहिती-तंत्रज्ञानाच्या क्रांतीच्या मदतीने करता येईल. शिक्षकाची व्याख्या शाळा-महाविद्यालयातील शिक्षक एवढ्यापुरती मर्यादित न करता उद्योग, संस्था, समाज व कुटुंब यामधील जी व्यक्ती मुलांच्या आणि विद्यार्थ्यांच्या शिक्षणाला व विकासाला मदत करते, ती शिक्षक मानून सर्व 'शिक्षकांना' परिवर्तनाच्या कार्यात आणता येईल. औपचारिक, अनौपचारिक व प्रासंगिक शिक्षणाचा एकात्मिक पद्धतीने विकास करून आजीवन शिक्षणाचा विस्तार करता येईल. पुस्तकी ज्ञानावर भर देऊन त्यातून सेवा व उत्पादन प्रक्रियेमधील सर्वसामान्यांचा सहभाग वाढवता येईल व दारिद्र्य निर्मूलनावर भर देता येईल. शासन सत्तेच्या विकेंद्रीकरणातून विशेषत: पंचायत व ग्रामसभांचा सत्तेतील सहभाग वाढवता येईल. त्यासाठी ई-नेटवर्कचा वापर करुन त्यांना ज्ञानाची व अनुभवाची जोड देता येईल. ज्ञानाधिष्ठित समाज व ज्ञान अर्थव्यवस्था निर्माण होत असताना नव्या राष्ट्रीय शिक्षण-प्रणालीचा विकास करून खासगी-सार्वजनिक व समाज यांच्या सहकार्याने एका नव्या समाजाचे नवे प्रारुप निर्माण करता येऊ शकेल. नाईक यांचे विचार व विश्लेषण काळाच्या खूप पुढे होते. त्यांच्या विचारांना मूर्त स्वरुप मिळण्याची वेळ आता आली आहे. जे. पी. नाईक यांच्या जन्मशताब्दी वर्षात त्यांच्या विचारांवर, प्रस्तावित मार्गावर आजच्या संदर्भात विचार करुन नव्या शैक्षणिक पद्धतीचा विकास ज्ञानाधिष्ठित समाज घडविण्यासाठी कसा करता येईल, याचा शोध घेणे हे महत्त्वाचे कार्य आहे. ते त्यांनी स्थापन केलेल्या भारतीय शिक्षण संस्थेतर्फे सर्व सहकाराने हाती घेतले आहे. त्यात सर्वांनी सहभागी होऊ, जे. पी. नाईक यांच्या स्मृती व कार्य पुढे नेऊया, हीच त्यांना आदरांजली.

(सकाळ, ५ सप्टेंबर २००६)

☑ ☑ ☑

**मानवी समाजाच्या विकासासाठी शिक्षणपद्धती निर्माण व समृद्ध करणारे जे थोर शिक्षणतज्ज्ञ जगभर होऊन गेले, त्यांमधील निवडक तज्ज्ञांचा परिचय 'युनेस्को'ने चार ग्रंथांतून करून दिला आहे. यांमध्ये गांधीजी आणि रवीन्द्रनाथ टागोर यांच्या बरोबरीने जे० पी० नाईक (५/९/१९०७ - ३०/८/१९८१) यांचेही नाव आहे. विशेष म्हणजे या तिघाच भारतीयांचा या ग्रंथात समावेश आहे. जे० पी० नाईक यांची थोरवी यातून स्पष्ट होते.**

अनुक्रमणिका

# भारताची महान शिक्षाविद् त्रयी
## रवीन्द्रनाथ, गांधीजी, जे० पी० नाईक

## शिक्षण
### रवीन्द्रनाथ टागोर

जेवढे अत्यावश्यक असेल तेवढ्यातच काराबद्ध होऊन राहणे, हा काही मानवी जीवनाचा धर्म नव्हे. आपण काही प्रमाणात आवश्यकतेच्या श्रृंखलांनी बांधलेले असतो, आणि त्याचबरोबर, काही प्रमाणात स्वतंत्रही असतो. माणसाचा देह साडेतीन हाताचा आहे, म्हणून तेवढे साडेतीन हात लांबीरुंदीचे घर निर्माण करून काही चालत नाही. मोकळेपणाने हिंडता-फिरता यावे म्हणून पुष्कळशी जागा आपल्याला मोकळी ठेवावीच लागते, नाहीतर आपल्या स्वास्थ्याची आणि आनंदाची हानी झाल्यावाचून राहणार नाही. शिक्षणाच्या बाबतीतही असेच आहे. ज्याला नुसतेच 'शिकवणे' असे म्हणायचे, म्हणजे ज्या गोष्टींची माहिती असणे माणसाला अत्यावश्यक असते तेवढ्यातच बालकांना अगदी एकांतिकपणाने घर बांधून ठेवण्यात आले, तर त्यांच्या मनाची पूर्णपणे वाढ होणे अशक्य आहे. आवश्यक गोष्टींचे ज्ञान करून देण्याबरोबरच मुलांच्या शिक्षणात स्वतंत्र वाढ होण्याचीही व्यवस्था झाली नाही तर मुलांची वाढ नीटपणे होणार नाही. तो वयाने मोठा होईल पण बुद्धीच्या बाबतीत मात्र तो बऱ्याचशा प्रमाणात जन्मभर लहान मूलच राहील.

पण, दुर्दैवाने आमच्या हाती ह्या कामासाठी खर्च करायला वेळ असतो फारच थोडा. बनेल तितक्या लवकर विदेशी भाषा शिकून, परीक्षा पास करून उद्योगाला लागावे, अशीच आमची धडपड असते. म्हणून, अगदी लहानपणापासून नुसती दमछाक होईपर्यंत, घाईघाईने, डावीउजवीकडे दृष्टी न वळविता शिकवलेले नुसते तोंडपाठ करीत बसण्यापलीकडे दुसरे काही करायला फुरसतच मिळत नाही. अभ्यासाव्यतिरिक्त दुसरे काही मनोरंजनाचे किंवा त्याच्या आवडीचे पुस्तक मुलाच्या हाती दिसले की ते आपल्याला त्याच्या हातातून हिसकावूनच घ्यावे लागते.

शिक्षणक्रमांत पुढे पुढे जात असताना त्याबरोबर आमच्या विचारशक्तीचीही वाढ व्हायला पाहिजे ती होत नाही, ह्याचा अर्थ, आम्ही ढीग फार मोठा रचीत सुटतो पण त्या बरोबरच बांधणीचे कामही जे सुरू असायला पाहिजे ते होत नाही, असा आहे. विटा, चुना, दगड, माती, रेती वगैरेंचा ढीग डोंगरासारखा मोठा होतो आहे अशातच विश्वविद्यालयाकडून हुकूम येऊन थडकतो - तिसऱ्या मजल्यावरची गच्ची तयार करा! हुकुम आला रे आला की आम्ही त्या ढिगाऱ्याच्या वर जाऊन उभे रहायला लागतो आणि दोन वर्षे होईपर्यंत कसेतरी ठोक-पीट करून त्या वरच्या टोकाशी एक सपाट भूमी तयार करून ठेवतो. दिसायलाही ती जागा पुष्कळशी गच्चीसारखीच दिसायलाही लागते. पण ह्याला काय तिमजली वाडा म्हणायचे? वारा आणि उजेड आत खेळ करु शकेल अशी ह्यात जागा तरी आहे काय? माणसाने आजन्म जेथे सुखाने निवास करावा, असा निवारा ह्यात कुठेतरी आहे का? बाहेरच्या उन्हा-पावसापासून आणि आवरण हीनतेपासून हे आमचे करावे तसे संरक्षण कधी करु शकेल का? ह्यात आपल्याला सुशृंखल सौंदर्य आणि सुषमा कुठेतरी दिसते का?

ज्या प्रकारचे जीवन आम्हाला जगायचे आहे त्याला योग्य ठरेल असे शिक्षण आम्हाला दिले जात नाही. ज्या घरात आम्हाला मरेपर्यंत राहायचे आहे त्या घराचे उन्नत चित्र आमच्या पाठ्यपुस्तकात आम्हाला पहायला मिळत नाही. ज्या समाजातच आम्हाला आमचा जन्म काढावा लागणार आहे त्या समाजाचा कोणताही उच्च आदर्श आम्ही प्राप्त करून घेतलेल्या कोणत्याही साहित्यात आम्हाला आढळून येत नाही. आमचे मातापिता, सुहृद-बांधव, भाऊ-बहिणींचे दर्शन ज्यात आम्हाला घडत नाही, ज्यात आमच्या दैनंदिन जीवनातील तऱ्हेतऱ्हेच्या कार्यांना स्थान नाही, आमचे आकाश आणि आमची धरणी, आमची निर्मल प्रभात आणि सुंदर संध्या, आमची डवरलेली शेते आणि आमच्या देशाची लक्ष्मी-स्त्रोतस्विनी ह्यांचे कोणतेही संगीत ज्यामध्ये ध्वनित होत नाही, असे हे शिक्षण आहे. ह्या गोष्टीचा आपण नीटपणे विचार केला म्हणजे आमच्या जीवनाशी ह्या शिक्षणाचा तेवढासा दाट, एकजीवपणाचा संबंध असणे संभवनीय नाही, हे आपल्या लक्षात येईल. आपल्या जीवनात आणि ह्या शिक्षणात एक






आडपडदा असणारच. आमच्या जीवनात ज्या आवश्यक गोष्टींचा अभाव आहे, त्या अभावाची पूर्ती ह्या शिक्षणाच्या द्वारा होणेच शक्य नाही. आमच्या जीवनाची मुळे ज्या ठिकाणी रुजलेली आहेत त्या स्थानापासून शेकडो मैल अंतरावर ह्या शिक्षणाची वृष्टिधारा वर्षाव करीत आहे; मधल्या अडचणी भेदून जो काही थोडासा रस आमच्यापर्यंत येऊन पोहोचतो, तो आमच्या जीवनातील शुष्कता नाहीशी करायला अपुरा आहे. जे शिक्षण प्राप्त करून घेऊन आम्हाला आपले आयुष्य शेवटपर्यंत कंठायचे आहे, ते शिक्षण आम्हाला फक्त कारकुनी करण्याला किंवा एखादा धंदा करण्यालाच फक्त लायक बनवणारे आहे. ज्या पेटीत आम्ही आपले कचेरीत जाताना घालायचे कपडे घडी घालून ठेवीत असतो त्याच पेटीत आम्ही आपली सारी शिकलेली विद्याही बंद करून ठेवतो. तिचा ऑफिसाव्यतिरिक्तच्या आमच्या अष्टौप्रहराच्या कुठल्याही व्यवहारात आम्हाला कसलाही उपयोग नाही, अशी परिस्थिती ह्या आमच्या शिक्षण प्रणालीमुळे अवश्यभावी होऊन बसलेली आहे. ह्याचा दोष आमच्या विद्यार्थीवर्गाच्या डोक्यावर लादणे अन्यायाचे होईल. त्या विद्यार्थ्यांचे पुस्तकातले जगत एकीकडे, आणि ज्या जगात त्यांना प्रत्यक्षपणे जगायचे असते ते जगत दुसरीकडे; दोहोंच्यामध्ये व्याकरणाचा आणि शब्द-रूपांचाच काय तो पूल आहे. म्हणूनच, एकीकडे पाश्चिमात्त्य दर्शन-शास्त्र, विज्ञान आणि न्यायशास्त्राचा पारंगत पंडित दुसरीकडे जुन्या-पुराण्या कुसंस्कारांची मोठ्या प्रयत्नपूर्वक जोपासना करीत असलेला आपण पाहतो. एकीकडे स्वातंत्र्याच्या उज्ज्वल आदर्शाचा तोंडाने प्रचार करणारा माणूसच दुसरीकडे आधीनतेच्या शेकडो हजारो तंतुपाशांनी स्वतःला आणि आपल्याबरोबरच दुसऱ्यांनाही पावलोपावली बांधून घेऊन दुर्बल बनवीत असलेला आपल्याला दिसतो. एकीकडे मनुष्य निरनिराळ्या भावांनी परिपूर्ण अशा साहित्याचा मोकळेपणाने रसास्वाद घेत असूनही दुसरीकडे तो आपल्या जीवनाला भावांच्या अत्युच्च शिखरावर आरूढ करून ठेवीत नाही असे जेव्हा आपल्याला दिसते, मनुष्य नुसत्या धनोपार्जनाच्या आणि विषयसंपत्तीची उन्नती करून घेण्याच्याच मागे लागलेला आपल्याला दिसतो, त्यावेळी त्या गोष्टीत आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही असेच आपल्याला म्हणावे लागते. कारण ह्या माणसाचे शिक्षण व त्यामुळे त्यांनी प्राप्त करून घेतलेली विद्या आणि प्रत्यक्ष व्यवहार ह्या दोहोंच्यामध्ये एक फार मोठे खरे खरे व्यवधान आहे; त्या दोन गोष्टी सुसंलग्नपणे एकमेकीत मिसळणेच शक्य नाही.

रेल्वे, टेलिग्राफ, यंत्रे आणि कारखाने ह्यांची काहीच गरज नाही असे माझे म्हणणे नाही, ही गोष्ट आतापर्यंत जे काही सांगितले त्यावरुन वाचकांच्या लक्षात आलीच असेल. माझे म्हणणे असे की, ह्या गोष्टीचेही प्रयोजन आहे, पण त्या निःशब्द आहेत. विश्वांतल्या कोणत्याही स्वराला त्यांच्याकडून प्रत्युत्तर मिळत नाही, हृदयाच्या कोणत्याही हाकेला त्यांच्याकडून साद मिळत नाही. मनुष्य ज्या ठिकाणी अभावग्रस्त असतो त्याठिकाणी त्या अभावपूर्ततेची उपकरणे तयार होतात. पण मनुष्याची ज्या ठिकाणी पूर्णता असते त्याठिकाणी त्याचे अमृतरूप प्रकट होत असते. ह्या अभावाच्या बाजूने, उपकरणांच्या क्षेत्रात मनुष्याची ईर्षा, त्याचा द्वेष ह्यांचा खेळ चालू असतो. तो तट-भिंती उभारतो, पाहरेकरी नेमतो, तो ह्याच ठिकाणी. मनुष्य ह्याच ठिकाणी स्वतःला मोठा करून घेत असतो आणि दुसऱ्यांची तेथून हकालपट्टी करीत असतो. ह्याच क्षेत्रात त्याला दुसऱ्याशी युद्ध करावे लागत असते. पण ज्या क्षेत्रात त्याचे अमृत भरलेले असते, जेथे मनुष्य वस्तूचे प्रकटीकरण न करता आपल्या आत्म्याचे प्रकटीकरण करीत असतो, त्या ठिकाणी तो दुसऱ्यांना आवर्जून आपल्याजवळ बोलावून आणीत असतो. त्या ठिकाणी आपल्यातला भाग दुसऱ्याला दिल्याकारणाने कधी मेजवानीचा तुटवडा पडत नाही. म्हणून त्या ठिकाणीच खरी शांतीही असते.

विज्ञानाच्या कृपेने आज जळी, स्थळी आणि आकाशात किती नवे नवे मार्ग माणसासाठी खुले झालेले आहेत ! त्या मार्गावरून किती तऱ्हेतऱ्हेचे रथ धावत जाताहेत! भूगोलाच्या सीमा आता काही सीमा म्हणून शिल्लक उरलेल्या नाहीत. आज आता नुसत्या अनेक व्यक्तीच नाही तर अनेक जाती एकमेकींच्या जवळ आलेल्या आहेत. त्यामुळे आज मनुष्यापुढे उभा असलेला सत्यासंबंधीचा प्रश्नही फार मोठा बनलेला आहे. विज्ञानाच्या शक्तीने ज्यांना एकत्र आणून ठेवले आहे त्यांना ती एक बनवू शकेल का? माणसांचा योग जर संयोग ठरला तर उत्तम, नाही तर तो दुर्योगच म्हटला पाहिजे. तसाच एक महाभयंकर दुर्योग आज मनुष्यापुढे उभा राहिलेला दिसतो आहे. एकत्र आणणारी बाह्य शक्ती तर धडाक्याने पुढे धावत सुटली आहे, हे खरे. पण माणसांना एक बनविणारी आंतरिक शक्ती मात्र फार मागे पडलेली आहे. एंजिनाच्या जोरावर गाडी पुढे धावत सुटावी पण बिचारा ड्रायव्हर मात्र 'अरे, अरे हो हो-' करीत त्या गाडीच्या मागे धापा टाकीत पळत

असावा, तसेच हे झाले आहे. त्या बिचाऱ्याला काय करावे तेच सुचत नाही. पण काही लोक प्रचंड वेगाने धावत सुटलेल्या त्या एंजिनाकडे पाहून हर्षभराने म्हणताहेत, "शाब्बास! उन्नती म्हणतात ती हीच!" इकडे आम्ही पूर्वेकडचे साधे सरळ वृत्तीचे लोक! आम्ही आपले धीरगंभीर गतीने संथपणे एक एक पाऊल उचलीत हळूहळू पायी चालणारे लोक! त्यांच्या त्या उन्नतीची धडक बसल्यामुळे आमची जी हबेलहंडी उडाली तिच्यातून आम्ही अजूनही स्वतःला सावरून घेऊ शकलेलो नाही. कारण जे जवळ असूनही दूरही आहेत त्यांची धावपळ सुरू असली म्हणजे आपल्याला पावलोपावली धक्के खावेच लागतात. असे धक्के एखाद्या विशिष्ठ अवस्थेत कल्याणप्रद असले तरी ते सुखकारक खासच नसते.

अशा ह्या विद्यापीठात केवळ विद्येचा संचयच होता असे नाही; त्या ठिकाणी विद्येचा गौरव होता. ह्यू-एन-त्सांग म्हणतो, येथे जे आचार्य, अध्यापक वगैरे होते त्यांचे यश दूरपर्यंत पसरलेले होते. चारित्र्याने ते पवित्र, अनिंदनीय असे होते. सद्धर्माच्या अनुशासनांचे पालन ते लोक अकृत्रिम श्रद्धेने करीत. ह्या देशातील आणि दूरदूरच्या देशांतून आलेले छात्र, ज्या विद्येच्या प्रचाराचा भार ह्या अध्यापकांवर होता त्या विद्येच्या मानाचे उज्ज्वलपणे रक्षण करण्याची जबाबदारी त्या शिक्षकवर्गावर होती, आणि तेही केवळ मेधेच्या जोरावर नाही, केवळ बहुश्रुतपणाच्या जोरावर नाही, तर आपल्या चारित्र्याच्या व अस्खलित, कठोर तपस्येद्वारा आपली ती जबाबदारी पार पाडीत असत. सारा देश श्रद्धायुक्त मनाने त्यांच्याकडून अशा प्रकारच्या आदर्श सात्विकतेची अपेक्षा करीत असे, म्हणूनच त्यांना तसे करता आले. दूरदूरच्या देशांत ज्ञानाचा प्रसार करण्याचा फार मोठा भार आपल्या शिरावर आहे, ह्याची अध्यापकांना जाणीव असे. समुद्र आणि पर्वत ओलांडून, प्राण पणाला लावून, सर्व प्रकारची दुःखे झेलीत दूरदूरच्या देशांतून विद्यार्थी आपल्याकडे येतात ते त्यांना ज्ञानप्राप्तीची तहान लागलेली आहे म्हणून, हे त्या शिक्षकवर्गाला ठाऊक होते.

☑ ☑ ☑

## रवींद्रनाथांची राष्ट्रीय मते

माझ्या लेखातून राष्ट्रनीती, समाजनीती, धर्मनीती इत्यादिकासंबंधी माझी खास मते कोणती ते हुडकून काढण्याचा कोणी प्रयत्न करीत आहे असे ऐकले की मला निश्चितपणे वाटायला लागते - ह्या गृहस्थाची ह्या बाबतीतील जी मते असतील त्यांची माझ्या विचारांशी आणि मतांशी आता काय भेसळ होणार! मुकद्दमा चालू असताना साक्षीदाराच्या जबानीबरोबर वकीलाचे वक्तव्यही लक्षात घेतल्यानंतर जी गोष्ट समोर उभी राहते तीच प्रमाण मानून चालत नाही. कारण विरुद्ध पक्षाचा वकीलही त्या जबानीला धरून दुसरेच काही तरी सांगत असतो. ह्याचे कारण निवडून काढून पुढे ठेवलेल्या विशिष्ट विधानांचा अर्थ ते विधान विशिष्ट रूपाने निवडून काढून पुढे मांडण्यावरच अवलंबून असतो.

माझी राष्ट्रनीतीविषयक मते काय आहेत त्याची आलोचना करणारे एक इंग्रजी पुस्तक नुकतेच प्रसिद्ध झाले आहे. व्यक्तिशः मी त्याबद्दल लेखकाचा आभारी आहे. पुस्तकात त्याने कुठेही माझा अपमान करण्याचा प्रयत्न केलेला नाही. माझ्याबद्दल आदर व्यक्त करूनच त्याने पुस्तक लिहिले आहे. माझ्याबद्दल त्याच्या मनात अनुकूल भावना असल्यामुळेच त्या लेखकाने माझ्या मतांपैकी बराचसा भाग प्रचलित लोकमताला अनुकूल असल्यासारखे दाखवून सर्वसाधारणांच्या रागापासून मला वाचवण्याचा प्रयत्न केला आहे.

हे पुस्तक वाचून काढणे मला प्राप्तच होते. माझ्या राष्ट्रीय मतांबद्दल कोणत्या वाचकाला काय वाटते ते जाणण्याचे कुतुहल मला आवरता येणे कठीण होते. माझी मते नक्की काय आहेत ते जाणणे सोपे नाही, हे मी जाणतो. लहानपणापासून आजतागायत, देशाची नाना प्रकारची अवस्था आणि त्यामुळे असलेल्या माझ्या समजुती आणि विचार, ह्या सर्वांबद्दल मी पुष्कळ दिवस स्वतःच्या मनाशी विचार केलेला आहे आणि कार्यही केलेले आहे. लिहिण्याची प्रवृत्ती माझ्या स्वभावातच असल्याकारणाने ज्यावेळी जे काही मनात आले ते त्यावेळी मी प्रसिद्धही करून टाकलेले आहे. ज्यावेळी ती गोष्ट लिहिली गेली त्याकाळचे मुख्य प्रयोजन कोणते होते त्याच्याशी माझ्या त्या लिखाणाचा संबंध तोडून जर त्या गोष्टीकडे पाहिले तर माझ्या म्हणण्याचे तात्पर्य पूर्णपणे समजू शकणे शक्य होणार नाही. बराच काळपर्यंत चिंतन करीत जो माणूस जे काही लिहित असतो त्याच्या लेखनधारेचे परीक्षण ऐतिहासिक रूपानेच करणे इष्ट आणि सुसंगत ठरेल.

(संकलन : देवदत्त दाभोलकर, रवींद्रनाथ ठाकूर : निबंधमाला खंड पहिला, साहित्य अकादमी १९६६.)

☑ ☑ ☑






# शिक्षणाच्या पुनर्रचनेची दिशा

## गांधीजी

इ.स. १९१५ पासून सुरू असलेल्या माझ्या दौऱ्यांत मी अनेक खेडी पाहिली आहेत. तेथील बहुसंख्य बालके निरक्षर आहेत आणि त्यांच्या गरजा लक्षात घेऊनच मी बोलत आहे. जरी कॉलेजांतील विद्यार्थ्यांचा माझा आज-काल संबंध येत असला - त्यांच्यापैकी शेकडोंशी माझा पत्रव्यवहारही आहे, मनमोकळेपणी ते माझ्याशी बोलतात, त्यांच्या गरजा, अडचणी, चुका व दोष यांची मला माहिती आहे. तरी मला कॉलेजच्या शिक्षणाविषयी अनुभव नाही. तेव्हा आपण जर आपले विचार प्राथमिक शिक्षणापुरतेच मर्यादित केले तर बरे होईल. कारण एकदा प्राथमिक शिक्षणाचा मूलभूत प्रश्न सुटला की कॉलेजच्या शिक्षणाचा गौण प्रश्न आपोआप सुटेल.

बऱ्याच विचारांती माझे असे निश्चित मत झाले आहे की, प्राथमिक शिक्षणाची सध्याची पद्धती केवळ पैसा व वेळ यांचा अपव्यय करणारी आहे असे नव्हे, तर ती अपायकारकही आहे. प्राथमिक शिक्षण घेतलेली अधिकांश मुले आपल्या वडिलांपासून दुरावतात आणि वडिलोपार्जित व्यवसाय त्यांना मुकतो. त्यांना वाईट सवयी लागतात, शहरी राहणीचे रंगढंग ती उचलतात, त्यांना काही गोष्टींचे ज्ञान होते, पण ते इतके उथळ असते की, त्याला इतर काहीही नाव द्या - पण आपण त्याला शिक्षण मात्र म्हणू शकणार नाही. माझ्या मते त्यावर एकच उपाय आहे आणि तो म्हणजे या मुलांना हस्तव्यवसायाद्धारा वा उद्योगाद्धारा शिक्षण देणे. या प्रकारच्या शिक्षणाचा मला थोडासा अनुभव आहे. मी दक्षिण आफ्रिकेत 'टॉलस्टॉय आश्रमात' माझ्या स्वतःच्या व इतर अनेक जातींच्या धर्मांच्या मुलांना उद्योगाद्धारा शिक्षण दिले होते. उदा. सुतारकाम वा चांभारकाम यांचा उपयोग करण्यात आला होता. कॅलनबॅक-पासून मी ते काम शिकलो होतो व स्वत: कॅलनबॅक ट्रॅपिस्ट मठातून ते काम शिकून आले होते. मी त्या मुलांना व माझ्या मुलांना समाधानकारक शिक्षण देऊ शकलो नाही हे खरे. कारण मला वेळ अपुरा पडे. माझ्यामागे कामे इतकी असत की त्यांना गणतीच नाही, तरी पण त्या शिक्षणामुळे माझ्या व इतरांच्या मुलांचे काही नुकसान झाले आहे असे मला वाटत नाही.

माझा मुख्य भर धंदा वा उद्योग यावर नसून हस्तव्यवसायाच्या माध्यमातून द्यावयाच्या शिक्षणावर आहे. साहित्य, इतिहास, भूगोल, गणित, विज्ञान इत्यादी सर्व विषयांचे ज्ञान उद्योगाच्या द्धाराच दिले जावे. यावर असा आक्षेप घेण्यात येईल की मध्ययुगात असे कुठे काय शिकवले जात असे? पण त्याला उत्तर असे की मध्ययुगात दिले जाणारे व्यावसायिक ज्ञान शैक्षणिक संस्कार घडविणारे नसे. आज स्थिती अशी झाली आहे की, लोक आपल्या घरांतला, वाडवडिलांचा व्यवसाय विसरले आहेत. लिहावाचायला शिकून कारकुनीपेशा त्यांनी स्वीकारला आहे आणि त्यामुळे खेड्यांना त्यांचा उपयोग होईनासा झाला आहे. याचा परिणाम असा झाला आहे की, कोणत्याही सर्वसाधारण खेड्यात तुम्ही जा, चांगला कुशल सुतार वा लोहार तुम्हाला मिळणे दुरापास्त झाले आहे. हस्तव्यवसाय जवळजवळ अदृश्यच झाले आहेत. कातण्याच्या धंद्याची उपेक्षा झाल्यामुळे तो लँकेशायरला निघून गेला आहे व तेथे त्याचा विकास झाला आहे. औद्योगिकरणा-संबंधी माझे विचार काही असोत, इंग्रजांनी उद्योगधंद्याचा स्वतःच्या देशात जो विकास घडवून आणला त्याबद्दल त्यांच्या बुद्धिमत्तेचे कौतुक करायला हवे. यावर उपाय एकच आहे आणि तो म्हणजे एखाद्या व्यवसायाचे शास्त्रीय ज्ञान आणि कला मुलांना प्रत्यक्ष प्रयोगांतून वा व्यवहारांतून शिकवणे आणि त्या उद्योगाच्या माध्यमातून सर्व शिक्षण देणे. उदाहरणा-दाखल टकळीवर सूत काढण्याची कला घेऊ. त्या कलेच्याद्धारा कपाशीचे वेगवेगळे प्रकार, भारतातील उद्योगांचा ऱ्हास होण्याच्या कारणांचा इतिहास, त्याची राजकीय कारणे व त्याबरोबरच भारतातील ब्रिटिशांच्या राजवटीची माहिती, अंकगणिताचे ज्ञान ही सारी शिकविता येतील. मी माझ्या छोट्या नातवावर याचा प्रयोग करीत आहे. पण आपण काही खास शिकत आहोत असे त्याला मुळीच जाणवत नाही. कारण हे सारे शिकत असता, तो हसत-खेळत असतो, मजेने गात असतो.

मी टकळीचेच उदाहरण मुद्दाम अशासाठी दिले आहे की याबद्दल आपण लोकांनी मला प्रश्न विचारावेत, टकळीशी माझा खूप संबंध आला आहे. तिचे अद्भूत सामर्थ्य मी अनुभवले आहे आणि तिचा पराक्रम पाहिला आहे. आणखी एक कारण हे आहे की वस्त्रनिर्मितीचा उद्योग हा एकच असा व्यवसाय आहे की जो सर्वत्र शिकविता येईल. शिवाय टकळीला खर्चही कमी लागतो. टकळीचे महत्त्व आणि मूल्य अपेक्षेबाहेर सिद्ध झाले आहे. आपण रचनात्मक कार्यक्रम पार पाडला म्हणूनच सात प्रांतात काँग्रेसची मंत्रिमंडळे आपण बनवू शकलो. ज्या प्रमाणात हा कार्यक्रम आपण तडीस नेऊ, त्या प्रमाणात मंत्रिमंडळे यशस्वी होतील.

अभ्यासक्रम सात वर्षांचा असावा अशी माझी योजना आहे. त्याचा टकळीशी जेवढा संबंध आहे, त्यात सूत कातण्यापासून विणकामापर्यंत (आणि त्यात रंगविणे, नक्षी काढणे यांचा समावेश आहे,) सर्व व्यावहारिक ज्ञानांत विद्यार्थी निपुण होईल. आपण जेवढे कापड बनवू, तेवढ्याला गिऱ्हाइक तर तयार आहेच.

विद्यार्थ्यांनी बनवलेल्या वस्तूंमधून शिक्षकांचा खर्च निघावा अशी मला तीव्र इच्छा आहे; कारण आपल्या देशातील हजारो बालकांना शिक्षण देण्याला दुसरा मार्गच नाही. जोपर्यंत सरकारी तिजोरीतून आपल्याला पैसा मिळत नाही, व्हाईसराय जोपर्यंत लष्करावरील खर्च कमी करीत नाही, किंवा या तऱ्हेचा आणखी काही उपाय निघत नाही, तोपर्यंत आपल्याला वाट पाहत थांबता येणार नाही. आपण एक गोष्ट लक्षात ठेवावी की, या प्राथमिक शिक्षणात स्वच्छता, आरोग्य, आहारशास्त्राचे प्रारंभिक नियम या सर्वांचा समावेश आहे. आपले काम आपण करावयाचे, घरकामात आईवडिलांना मदत करावयाची इत्यादींचे शिक्षणही त्यातून मुलांना मिळणार आहे. चालू पिढीच्या मुलांना नाही सफाईचे ज्ञान की नाही टाऊक स्वावलंबन म्हणजे काय. शारीरिक आरोग्यही कमी होऊ लागले आहे. यासाठी गायन व वादन यांच्यासमवेत त्यांना शारीरिक शिक्षणही सक्तीने देऊ इच्छितो.

मी वाङ्मयीन शिक्षणाचा द्वेष्टा आहे असा मजवर आरोप करण्यात येतो. पण तो खोटा आहे. उलट, वाङ्मयीन साहित्यिक शिक्षण चांगले कसे देता येईल याचा मार्ग मी दाखवीत आहे. वर्धा योजनेच्या स्वावलंबी स्वरुपावरही हल्ला चढविण्यात आला आहे. प्राथमिक शिक्षणावर जेथे आम्ही कोट्यवधी रुपये खर्च करावयास हवेत, तेथे आम्ही मुलांचेच शोषण करण्याचा विचार करीत आहोत असा आक्षेप आहे. अशीही शंका घेतली जात आहे की, या तऱ्हेने फार मोठ्या शक्तीचा अपव्ययच होईल. परंतु अनुभवाने ही भीती निराधार ठरविली आहे. मुलांवर लादण्याबाबतच्या शंकेबद्दल उलट असे विचारता येईल की हा बोजा सर्वनाशापासून मुलांना वाचविण्यासाठीच ना आपण लादीत आहेत? टकळी हे मुलांच्या दृष्टीने एक सुंदर खेळणे आहे. तिच्यातून काही उत्पादन निघू शकते, म्हणून ती खेळणेच नव्हे असे म्हणता येणार नाही. आजही मुले काही मर्यादेपर्यंत आपल्या आईबापांना कामात साह्य करतातच. आमच्या शेगावची मुले शेतीच्या कामात माझ्यापेक्षा अधिक माहीतगार आहेत, कारण त्यांना आपल्या आईबापांबरोबर शेतात काम करावे लागते. परंतु जेव्हा मुलांना तुम्ही सूत काता, शेतात काम करा, असे प्रोत्साहन दिले जाईल त्यावेळी त्यांना (आमच्या शाळेत) अशीही जाणीव करुन दिली जाईल की, आपला संबंध केवळ आईवडिलांशीच नाही, आपल्याला आपल्या गावाची व देशाचीही काही सेवा करावयाची आहे. मी मंत्र्यांना सांगू इच्छितो की मुलांना शिक्षणाची खैरात करुन, ते फुकट वाटून, तुम्ही आपल्या मुलांना असहाय, दुबळी बनवाल. उलट, शिक्षणासाठी त्यांना श्रम करावयास लावून तुम्ही त्यांना शूर व आत्मविश्वाससंपन्न बनवाल.

ही शिक्षणपद्धती हिंदू, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती या सर्वांना समान आहे. मी धार्मिक शिक्षणावर भर का दिला नाही असे मला विचारण्यात येते. माझे उत्तर आहे की, मुलांना 'व्यावहारिक आचारशील धर्म' शिकवू इच्छितो आणि तो म्हणजे स्वावलंबन-आत्मोद्धार.

अशा तऱ्हेने ज्या विद्यार्थ्यांना शिक्षण मिळेल, त्यांना जरूर पडली तर रोजगार देण्यास सरकार बांधलेले आहे. शिक्षकांची अडचण निर्माण होईल; त्यासाठी प्रो. शहा यांनी सक्तीच्या सेवेचा उपाय सुचविला आहेच. इटली वगैरे देशांचे उदाहरण देऊन त्या पद्धतीचे महत्त्व प्रतिपादन केलेच आहे. त्यांचे म्हणणे असे आहे की जर इटलीत मुसोलिनी देशसेवेची प्रेरणा तरुणांना देऊ शकला तर आपण का देऊ नये? आपल्या पोटापाण्याच्या व्यवसायाला लागण्यापूर्वी आमच्या तरुणांना एकदोन वर्षे सक्तीचे अध्ययनाचे कार्य करावे लागले तर त्याला गुलामगिरी म्हणणे उचित होईल काय? गेली सतरा वर्षे








अनुक्रमणिका

देशातील युवकांनी स्वातंत्र्याच्या लढ्याला खूपच हातभार लावला आहे. तेव्हा त्यांनी आपल्या आयुष्यातील आणखी एक वर्ष देशाच्या सेवेसाठी द्यावे असे आवाहन मी करु शकतो. या बाबतीत जरी कायदा करण्याची गरज पडली तरी ती जबरदस्ती ठरणार नाही, कारण असा कायदा होईल तो आपल्या प्रतिनिधींच्या बहुमताशिवाय मंजूर होऊच शकणार नाही.

तेव्हा मी आपणास विचारू इच्छितो की, शारीरिक परिश्रमाच्या द्वारा द्यावयाचे शिक्षण आपणास मान्य आहे की नाही? माझ्या दृष्टीने हे शिक्षण स्वावलंबी बनविणे ही त्याची मुख्य कसोटी आहे. सात वर्षांच्या अखेरीस मुलाला आपल्या शिक्षणाचा खर्च काढता यावा व आपल्या कुटुंबात तो ऐतखाऊ राहू नये.

कॉलेजचे शिक्षण हे प्रामुख्याने शहरी आहे. प्राथमिक शिक्षणाप्रमाणे तेही अयशस्वी झाले आहे, असे मी मुळीच म्हणत नाही. परंतु त्याचे जे परिणाम आपणासमोर आहेत ते मात्र फार निराशाजनक आहेत. नाही तर पदवीधर बेकार का राहिले असते?

टकळीचे उदाहरण मी निश्चित स्वरुपात दिले आहे. कारण त्याबाबत विनोबांना प्रत्यक्ष व्यावहारिक अनुभव आहे आणि त्याबाबत जर कुणाचे काही आक्षेप असतील तर त्यांची उत्तरे देण्यासाठी ते येथे हजर आहेत. काकासाहेब (कालेलकर) ही त्याबाबत काही सांगू शकतील; मात्र त्यांचे अनुभव अधिक तात्त्विक आहेत, त्यांनी जनरल आर्मरट्रांगने लिहिलेल्या 'जीवनासाठी शिक्षण' (एज्युकेशन फॉर लाईफ) या पुस्तकाकडे व विशेषत: त्यातील 'हाताचे शिक्षण' या प्रकरणाकडे माझे लक्ष वेधले आहे. स्व. मधुसूदन दास हे वकील होते. परंतु त्यांचा असा विश्वास होता की जर आपण आपल्या हातापायांचा उपयोग न करू तर आपला मेंदू गंजून जाईल. आणि या मेंदूने काही काम केले तर ते सैतानाचे काम ठरेल. टॉलस्टॉयने आपल्या अनेक कथांतून हीच गोष्ट शिकवली आहे.

आपल्याकडे जाती-जातीत अनेक झगडे होत आले आहेत - अर्थात हा प्रकार केवळ आपल्याकडेच घडतो असे मुळीच नाही, इंग्लंडमध्येही असे झगडे (वॉर ऑफ रोझेज्) झालेले आहेत आणि आज ब्रिटिश साम्राज्यवाद सर्व जगाचा शत्रू होऊन बसला आहे. हे जातीय व आंतरराष्ट्रीय कलह थांबवावेत अशी जर आपली इच्छा असेल तर ज्या पद्धतीचे मी प्रतिपादन केले आहे, त्या पद्धतीने मुलांना शिक्षण देऊन शुद्ध व दृढ पायावर आपण त्या कार्याला सुरुवात केली पाहिजे. माझ्या शिक्षणयोजनेची उत्पत्ती अहिंसेमध्ये आहे. राष्ट्रात सार्वत्रिक दारूबंदी व्हावी हा देशाचा निश्चय लक्षात घेऊन ही योजना मी सुचविली आहे. पण जरी आपल्या उत्पन्नात घट झाली नाही व देशाची तिजोरी भरलेली राहिली तरीही जर आपल्या मुलांना 'शहरी' - पोशाखी बनवायचे नसेल, तर ही योजना उपयोगी पडेल. या मुलांना आपली संस्कृती, आपली सभ्यता व आपल्या देशाची वैशिष्ट्ये याचे प्रतिनिधी बनवावयाचे आहे आणि त्यांना स्वावलंबी प्राथमिक शिक्षण दिल्यानेच ते कार्य होणार आहे. युरोपचे उदाहरण आपल्याला आदर्श होऊ शकत नाही, कारण युरोपचा हिंसेवर विश्वास आहे व म्हणून हिंसा हाच त्यांच्या सर्व योजनांचा आधार आहे. रशियाने जे यश संपादन केले आहे, त्याला मी कमी लेखत नाही, पण.सक्ती व हिंसा हाच त्याचा आधार आहे. ज्याअर्थी हिंदुस्थानने हिंसेचा त्याग करावयाचे ठरविले आहे त्याअर्थी ज्या शिस्तीमुळे व अनुशासनामुळे अहिंसात्मक समाज निर्माण होईल, त्या शिस्तीचा व अनुशासनाचा एक अविभाज्य घटक म्हणून ही पद्धती मी पुरस्कारली आहे. आम्हाला असे सांगण्यात येते, की इंग्लंडमध्ये शिक्षणावर लाखो रुपये खर्च करण्यात येतात आणि हीच स्थिती अमेरिकेचीही आहे; परंतु आपण हे विसरतो की, ती सारी संपत्ती शोषणातून निर्माण होते. त्यांनी या शोषणाच्या कलेचे एक शास्त्रच बनविले आहे, त्यामुळेच आपल्या मुलांना असे महागडे शिक्षण देणे त्यांना शक्य झाले असेल, परंतु आपल्याला शोषणाचा विचारही करता येणार नाही व करावयाचा नाही; तेव्हा अहिंसेचा आधार असलेली दुसरी कोठलीही योजना आज तरी आपल्यासमोर नाही.

(साम्ययोग : शिक्षण विशेषांक १६ ऑक्टोबर १९८७)

☑ ☑ ☑

ऊर्ध्वबाहुः
विरोमि एषः
न हि कश्चित्
श्रृणोति माम् ।









## शिक्षण

**वाचक :** तुम्ही इतके सगळे सांगितलेत. त्यात शिक्षणाच्या आवश्यकतेचा कोठेही निर्देश केला नाहीत. आपल्यात शिक्षणाचा अभाव असल्याची आपण नेहमी तक्रार करतो. सक्तीचे शिक्षण देण्याची चळवळ हिंदुस्थानभर सुरु असल्याचे आपण पाहतो. श्रीमंत सयाजीराव गायकवाड महाराजांनी आपल्या राज्यात सक्तीचे शिक्षण सुरू केले आहे. सर्वांचे लक्ष त्याकडे लागले आहे. महाराजांना आपण त्याबद्दल धन्यवाद देतो. हे सगळे प्रयत्न व्यर्थच समजायचे?

**संपादक :** आपली संस्कृती जर आपण सर्वोत्तम मानीत असू तर हा सगळा खटाटोप बहुतांशी व्यर्थ आहे असे मला दिलगिरीपूर्वक म्हणावे लागेल. गायकवाड महाराज आणि इतर आपले धुरंधर पुढारी हे सर्वांना शिक्षण देण्याचा प्रयत्न करीत आहेत, त्यांत त्यांचा हेतू निर्मळ आहे, म्हणून त्यांना धन्यवाद देणे योग्यच आहे. पण त्यांच्या प्रयत्नांचे जे परिणाम घडून येण्याचा संभव आहे ते लपवून ठेवता येणार नाहीत.

शिक्षण म्हणजे काय ? जर त्याचा अर्थ अक्षरज्ञान एवढाच असेल तर ते एक साधनच झाले. त्याचा सदुपयोगही होईल आणि दुरुपयोगही होईल. ज्या हत्याराने शस्त्रक्रिया करून आजाऱ्याला बरे करता येते, तेच हत्यार जीव घेण्यासाठीही वापरता येते. तसे अक्षरज्ञानाचे आहे. त्याचा दुरुपयोग पुष्कळ माणसे करतात हे तर आपण पाहतोच. त्याचा सदुपयोग त्या मानाने थोडीच माणसे करतात. हे माझे म्हणणे बरोबर असेल तर अक्षरज्ञानाने जगाला फायदा होण्याऐवजी त्यांचे नुकसानच झाले आहे असे सिद्ध होते.

शिक्षणाचा सर्वसामान्य अर्थ अक्षरज्ञान असाच मानतात. लोकांना लिहायला, वाचायला आणि हिशेब करायला शिकविणे याला प्राथमिक शिक्षण म्हणतात. एक शेतकरी इमाने इतबा शेती करून आपले पोट भरतो. त्याला जगाचे सर्वसामान्य ज्ञान आहे. वडिलांशी, बायकोशी व मुलांशी कसे वागावे, गावातल्या लोकांत आपली रीतभात कशी ठेवावी, या सर्व गोष्टींचे त्याला पुरेसे ज्ञान आहे; तो नीतीचे नियम जाणतो आणि पाळतो. पण त्याला आपली सहीसुद्धा करता येत नाही. या माणसाला अक्षरज्ञान करून देऊन तुम्ही काय करू इच्छिता? त्याच्या सुखात आणखी भर त्यामुळे काय पडणार आहे? त्याच्या झोपडीबद्दल किंवा आजूबाजूच्या परिस्थितीबद्दल तुम्हाला त्याच्या मनात असंतोष निर्माण करायचा आहे काय? त्याकरिता देखील त्याला अक्षरज्ञान देण्याची गरज आहे असे नाही. पाश्चात्त्य विचारसरणीच्या प्रवाहात ओढले जाऊन आपण तसे ठरविले आहे, की लोकाना अशा प्रकारचे शिक्षण आपण दिले पाहिजे. त्यात मागचापुढचा विचार आपण केलेला नाही.

आता उच्च शिक्षणासंबंधी विचार करू. मी भूगोल-विद्या, खगोलविद्या, बीजगणित, भूमिती, भूस्तरविद्या हे सर्व शिकलो - अगदी कोळून प्यालो. तरी त्याने काय होणार? त्यायोगे मी स्वतःचे आणि आजूबाजूच्या लोकांचे अधिक भले काय केले? कोणता हेतू धरून ते सर्व ज्ञान मी घेतले? त्यात मला काय लाभ झाला? हक्सले नावाच्या एका इंग्रज विद्वानानेच शिक्षणासंबंधी पुढीलप्रमाणे उद्गार काढले आहेत; तो म्हणतो : 'ज्या मनुष्याला तरुणपणीच असे शिक्षण मिळाले आहे की शरीराने त्याच्या ताब्यात असावे आणि अवयवांची जी काही शक्ती असेल ती वापरुन सर्व कामे सहजगत्या व आनंदपूर्वक करावी, ज्या मनुष्याची बुद्धी सुस्पष्ट रीतीने, अनासक्तीपूर्वक, सयुक्तिक रीतीने विचार करते, ज्याचे मन निसर्गनियमासंबंधीच्या ज्ञानाचे भांडार बनले आहे, ज्याची इच्छाशक्ती सत्वशील विवेकाची दासी होऊन विकारांना आपल्या ताब्यात ठेवते, आणि ज्याला सर्व प्रकारच्या दुष्टपणाचा तिटकारा करून इतर माणसांना आपल्याप्रमाणेच मानाने वागविण्याचे वळण मिळाले आहे, असा मनुष्य खरा शिकलेला असे मी मानतो. कारण त्याचे निसर्गाशी अनुसंधान असते, त्यामुळे तो निसर्गाचा आणि निसर्ग त्याचा चांगला उपयोग करुन घेतो.'

खरे शिक्षण म्हणजे जर वर सांगितलेले असेल तर मी ज्या शास्त्रांचा आणि विषयांचा उल्लेख केला त्यांचा उपयोग माझ्या शरीराला किंवा इंद्रियांना वश करून घेण्याच्या कामी मला काहीच झालेला नाही हे मी शपथेवर सांगू इच्छितो. तेव्हा प्राथमिक शिक्षण घ्या की उच्च शिक्षण घ्या त्याचा उपयोग मुख्य जे साधायचे त्या कामी होत नाही. त्याच्या योगाने आपण मनुष्य बनत नाही, त्यायोगे आपण आपले कर्तव्य करायला समर्थ होत नाही.

**वाचक :** असेच जर आहे तर एक प्रश्न तुम्हाला विचारावा लागेल. तुम्ही हे जे सर्व बोलत आहात हे कशाच्या जोरावर? तुम्ही अक्षरज्ञान आणि उच्च शिक्षण घेतले नसते तर

तुम्हाला हे समजावून देणे शक्य झाले असते का?

**संपादक :** बरा तडाखा दिलात, पण माझे उत्तर अगदी सरळ आहे. मी उच्च किंवा प्राथमिक कोणतेही शिक्षण घेतले नसते तरी मी निरूपयोगी झालो असते, असे काही मी मानीत नाही. आज या गोष्टी सांगून लोकांना उपयोगी पडण्याची मी इच्छा बाळगतो. त्या इच्छेने जे मी शिकलो ते मी कामाला लावतो, पण त्याचा उपयोग - अर्थात तो उपयोग असेल तर - माझ्या करोडो बांधवांना मी करून देऊ शकत नाही, फक्त तुमच्यासारख्या शिकलेल्यांनाच करून देतो. यातसुद्धा माझ्या म्हणण्यालाच पुष्टी मिळते. आपण दोघेही खोट्या शिक्षणाच्या पंजात अडकलो. मी त्यातून मुक्त झालो असल्याचे मी मानतो. आता माझा हा अनुभव मी तुम्हाला देत आहे आणि तो देताना मी पूर्वी घेतलेल्या शिक्षणाचा उपयोग करून तुम्हाला त्यातला बिघाड दाखवीत आहे.

दुसरी गोष्ट, तुम्ही मला तडाखा मारलात ही तुमची चूक आहे. कारण मी काही अक्षरज्ञान हे कोणत्याही स्थितीत वाईटच आहे असे म्हटले नाही. फक्त इतकेच सांगितले की, त्या ज्ञानाची आपण मूर्तिपूजा करणे बरोबर नाही. ती काही आपली कामधेनू नव्हे. त्याचे जे योग्य स्थान त्या स्थानी ते शोभून दिसेल. जेव्हा मी आणि तुम्ही आपल्या इंद्रियांना वश करू आणि नीतीचा पाया पक्का घालू, तेव्हा जर आपल्याला अक्षरज्ञान घेण्याची इच्छा झाली तर ते घेऊन त्याचा आपण सदुपयोग करू शकू. अलंकार म्हणून ते कदाचित साजेल. पण अक्षरज्ञानाचा हाच उपयोग असेल तर ते शिक्षण सक्तीने देण्याची जरूर राहत नाही. आपली जुनी पद्धती पुरेशी आहे. त्यात नीतीच्या शिक्षणाला पहिले स्थान ठेवलेले आहे, तेच खरे प्राथमिक शिक्षण आहे. त्याच्यावर ती रचना टिकू शकेल.

**वाचक :** तर मग स्वराज्याकरिता इंग्रजी शिक्षणाचा उपयोग तुम्ही मानीत नाही, असेच ना?

**संपादक :** 'होय' आणि 'नाही' ही, असे माझे यावर उत्तर आहे. करोडो माणसांना इंग्रजी शिक्षण द्यायचे म्हणजे त्यांना गुलामगिरीत टाकण्यासारखे आहे. मेकॉलेने ज्या शिक्षणाचा पाया घातला तो, खरे म्हणजे, गुलामगिरीचा पाया होता. त्याने त्या हेतूने आपली योजना घडविली असे मला म्हणायचे नाही, पण त्याच्या कार्याचा परिणाम मात्र तोच झाला आहे. आपण स्वराज्याविषयीसुद्धा परभाषेत बोलतो ही किती दुःखाची आणि बोलकी गोष्ट आहे!

ज्या शिक्षणपद्धती इंग्रजांनी टाकाऊ ठरविल्या त्या आपण डोक्यावर घेतल्या आहेत हे लक्षात ठेवा. त्या पद्धतीत अमुक चांगले नाही, तमुक चांगले नाही असे त्यांचेच विद्वान बोलत असतात. तेथील शिक्षणपद्धती सारख्या बदलतच असतात. इंग्रज लोक जे विसरले असतील त्यालासुद्धा आपण अज्ञानाने चिकटून राहत आहोत. त्यांच्यात आपल्या भाषांची उन्नती करण्यासाठी केवढा प्रयत्न होत आहे. वेल्स हा एक इंग्लंडचा प्रदेश. तिथे वेल्स भाषेचा जीर्णोद्धार होऊ लागला आहे. वेल्सच्या मुलांना वेल्स भाषेतच बोलायला लावायचे असा प्रयत्न सुरू आहे. इंग्लडचे अर्थमंत्री लॉइड जॉर्ज त्यात प्रमुख भाग घेत आहेत. उलट आपली स्थिती पहा. आपण एकमेकाला पत्रे लिहितो ती चुकांनी भरलेल्या इंग्रजीत. अशा चुकीच्या इंग्रजीतून आमचे सर्वसामान्य एम.ए. सुद्धा मुक्त नाहीत. आमचे उत्तमोत्तम विचार सांगण्याचे वाहन काय तर इंग्रजी. आपल्या कॉंग्रेसचे काम चालते इंग्रजीत. आपली चांगल्यापैकी वृत्तपत्रे इंग्रजीत. हे जर दीर्घकाळपर्यंत तसेच राहिले तर आपल्या पुढची प्रजा आपला तिरस्कार करील आणि त्यांचा शाप आपल्या आत्म्याला भोवेल असे माझे मत आहे.

इंग्रजी शिक्षण घेऊन आपण देशाला गुलाम बनविले आहे हे तुम्हाला समजण्यासारखे आहे. इंग्रजी शिक्षणाने दंभ, द्वेष, जुलूम इत्यदी वाढले. इंग्रजी शिकलेल्यांनी लोकाना फसविण्यात, त्रास देण्यात काही कसर ठेवलेली नाही. आज आपण त्यांच्याकरिता जे काही थोडे करीत आहो ती म्हणजे आपण घेतलेल्या कर्जाची यत्किंचित फेड समजा.

गंमत बघा, माझ्या देशात मला न्याय मिळवायचा आहे तर मला इंग्रजी भाषा वापरावी लागले. हा काय थोडा जुलूम आहे? मी बॅरिस्टर झालो की मी माझ्या भाषेत बोलता कामा नये! माझ्यापुढे दुसऱ्या माणसाने भाषांतर केले पाहिजे, हा काय थोडा दंभ आहे? ही गुलामगिरीची पराकाष्ठा नव्हे तर काय? त्यात इंग्रजांना मी दोष द्यावा की स्वतःला? हिंदुस्थानाला गुलाम बनविणारे तर आपण इंग्रजी जाणणारे 'लोक' आहोत. लोकांची हाय हाय इंग्रजांवर येणार नाही, आपल्यावर येईल.

पण मी तुम्हाला म्हटले की, माझे उत्तर 'होय' आणि 'नाही' कसे ते सांगतो. सभ्यतेच्या रोगाने आपण इतके ग्रासले गेलो आहोत की इंग्रजी शिक्षण घेतल्यावाचून आपले चालेल असा काळ राहिलेला नाही. ज्यांनी हे शिक्षण घेतलेले आहे, त्यांनी त्याचा अवश्य सदुपयोग करावा. इंग्रजांशी करावयाच्या व्यवहारात, ज्या हिंदुस्थानी माणसांची भाषा आपल्याला आज

येत नाही त्यांच्याशी व्यवहार करताना आणि इंग्रज स्वतःच्याच सभ्यतेला कसे विटून गेले आहेत ते समजून घेण्याकरिता, इंग्रजीचा उपयोग आपल्याला करता येईल. जे इंग्रजी शिकले आहेत त्यांच्या मुलांना अगोदर नीती शिकवावी, त्यांना स्वभाषा शिकवावी, त्यांना हिंदुस्तानातील आणखी एखादी भाषा शिकवावी, मुले मोठी झाली म्हणजे त्यांनी खुशाल इंग्रजी शिक्षण घ्यावे. तेसुद्धा तिचे उच्चाटन करण्याच्या हेतूने, त्यातून पैसे मिळविण्याच्या हेतूने नव्हे. तितकी इंग्रजी शिकतानासुद्धा त्यातून आपल्याला काय शिकायचे आहे आणि काय शिकायचे नाही याचा आपल्याला विवेक करावा लागेल. कोणत्या शास्त्रांचा अभ्यास करायचा त्याचाही विचार करावा लागेल. थोडा विचार केला तर समजून येईल की, इंग्लिश डिग्री घेण्याची आपण पर्वा केली नाही तर इंग्रज सत्ताधारी सावध होतील आणि आपल्याकडे लक्ष देतील.

वाचक : तर मग शिक्षण कोणते द्यावे म्हणता?

संपादक : त्याचे उत्तर वर थोडेसे येऊन गेले आहे. तरी त्याचा अधिक विचार करू या. मला तर असे वाटते की आपण आपल्या सर्व भाषांना उजळविणे जरूर आहे. आपल्या भाषेतून आपण शिक्षण घ्यायचे म्हणजे काय, याचा विस्तार करण्याचे हे स्थळ नव्हे. जी इंग्रजी पुस्तके आपल्या उपयोगाची आहेत त्यांचे भाषांतर करावे लागेल. पुष्कळ शास्त्रे शिकण्याचा मिथ्या आव आणि समज सोडून द्यावा. सर्वप्रथम तर धर्मशिक्षण किंवा नीतीशिक्षण हेच द्यायला हवे. प्रत्येक शिकलेल्या हिंदी माणसाला स्वभाषा, आणि हिंदूला संस्कृत, मुसलमानाला अरबी, पारशाला फारसी आणि सर्वांना हिंदी या भाषांचे ज्ञान असले पाहिजे. काही हिंदूंनी अरबी आणि काही मुसलमान-पारशांनी संस्कृत शिकून घेतले पाहिजे. आणि काही पश्चिमेकडच्या हिंदी माणसांनी तमिळ शिकले पाहिजे. सगळ्या हिंदुस्तानसाठी सर्वसामान्य भाषा तर हिंदीच असली पाहिजे. ती उर्दू किंवा नागरी लिपीत लिहिण्याची मुभा असणे इष्ट आहे. हिंदू-मुसलमानांचे संबंध योग्य रहावेत म्हणून त्या दोन्ही लिपी पुष्कळ लोकांनी शिकून घेण्याची जरूर आहे. असे झाले म्हणजे आपण एकमेकांशी करावयाच्या व्यवहारात इंग्रजीला फाटा देऊ शकू.

आणि हे सारे कोणाकरिता? आपण जे गुलाम झालो आहोत त्यांच्याकरिता. आपल्या गुलामीमुळे सर्वसामान्य लोक गुलाम झाले आहेत. आपण मुक्त झालो की लोक मुक्त झालेच समजा.

वाचक : तुम्ही धर्मशिक्षणाविषयी सांगितलेत ते कठीण आहे.

संपादक : तरी त्याशिवाय सुटका नाही. हिंदुस्तान कधीही नास्तिक होणार नाही. नास्तिकतेचे पीक हिंदभूमीला आवडत नाही. काम अवघड निश्चित आहे. धर्माच्या शिक्षणाचा विचार करताना डोके फिरायला लागते. धर्माचार्य दांभिक आणि स्वार्थी दिसून येतात. त्यांचे मन आपल्याला वळवावे लागेल. मुल्ला, दस्तूर आणि ब्राह्मण यांच्या हाती त्याची किल्ली आहे. पण जर त्यांना सद्बुद्धी झाली नाही, तर इंग्रजी शिक्षणाने जो उत्साह आपल्यात उत्पन्न झाला आहे तो वापरुन आपल्याला लोकांना नीतीचे शिक्षण देता येण्याजोगे आहे. ही फार कठीण गोष्ट नाही. हिंदुस्तानी लोकसमुद्राच्या कंठाशीच कुठेतरी मळ जमा झाला आहे. त्या मळाने जे मळले आहेत, त्यांनी स्वच्छ व्हावयाचे आहे. आपल्या प्रयत्नांनीसुद्धा बहुतांशी आपण स्वच्छ होऊ शकतो. माझी टीका ही सर्वसामान्य करोडो लोकांना लागू नाही. हिंदुस्तानाला योग्य मार्गावर आणण्याकरिता आपण स्वतः योग्य मार्गावर आले पाहिजे. बाकी करोडो लोक योग्य मार्गावरच आहेत. त्यांच्यात सुधारणा, उन्नती, अवनती ही कालानुक्रमे होत राहीलच. पाश्चात्त्य सभ्यतेला घालवून देणे हाच प्रयत्न अगोदर करायचा आहे. बाकी सगळे मग ठीक होईल.

(हिंद-स्वराज्य, गांधीजी)

☑ ☑ ☑

**माझा उद्देश केवळ देशाची सेवा करण्याचा, सत्य शोधण्याचा आणि त्यानुसार आचरण करण्याचा आहे. म्हणून ते विचार चुकीचे ठरले तरी त्यांना चिकटून राहण्याचा माझा आग्रह नाही. पण ते बरोबर ठरले तर इतरांनीही त्यानुसार चालावे अशी देशहिताच्या दृष्टीने माझी भावना राहील...**

**- गांधीजी, हिंद-स्वराज्य**

अनुक्रमणिका

# भारतातील शिक्षणपद्धतीची पुनर्रचना

## जे० पी० नाईक

## आशयानुवाद : सुमन दाभोलकर

[जे० पी० नाईक यांच्या अखेरच्या कालखंडातील एका कच्च्या आराखड्यातील काही भागाचा सुमन दाभोलकर यांनी केलेला हा आशयानुवाद आहे.]

या प्रकरणात श्री. जे. पी. नाईक यांनी भारतातील शिक्षणव्यवस्था अशी असावी की, ज्यामुळे सर्वसामान्य लोकांच्या गरजा आणि त्यांच्या आकांक्षा (aspirations) साध्य होऊ शकतील, ते सांगितले आहे. या प्रकरणाचे शीर्षक आहे, 'भारतीय शिक्षण-व्यवस्थेची पुनर्रचना' (१९८१-२०००)

**शिक्षणपद्धती आणि राष्ट्राचा विकास :**

शिक्षण आयोगाने आपल्या अहवालाला 'शिक्षण आणि राष्ट्राचा विकास' हे शीर्षक दिले आहे, ते पूर्णत: योग्य आहे. कारण शिक्षण आणि राष्ट्राचा विकास हे दोन्ही एकमेकांशी निगडित आहेत. या अहवालाद्वारे त्यांनी असेही दाखवून देण्याचा प्रयत्न केला आहे की, सध्याच्या भारतीय शिक्षणपद्धतीत पूर्णपणे बदल झाला पाहिजे. ती अधिक सुधारीत झाली पाहिजे. आणि भारताचा विकास होण्याच्या दृष्टीने ती सर्वदूर पसरली पाहिजे. या आधीच्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे आतापर्यंत यासाठी जे प्रयत्न झाले ते फारसे यशस्वी झाले नाहीत. त्यामुळे आज भारताला भेडसावणाऱ्या प्रश्नाबद्दल अधिक खोलात जाऊन विचार-विनिमय झाला पाहिजे. यासाठी त्यांनी काही मार्ग सुचविले आहेत. यापैकी महत्त्वाच्या मार्गांचा येथे थोडक्यात परामर्ष घेतलेला आहे.

१. हा आयोग आपल्यासमोर विकासाचे स्पष्ट चित्र उभे करीत नाही. भविष्यात आपल्याला कुठल्या प्रकारचा समाज निर्माण करावयाचा आहे, आणि त्यासाठी आपल्याला काय पाऊले उचलावी लागतील, याविषयी स्पष्टता नाही. ही स्पष्टता येण्यासाठी काय करण्याची जरूरी आहे, याविषयी परत एकदा विचार करणे गरजेचे आहे. अशा प्रकारचा विचार-विनिमय संपूर्ण देशभर होणे गरजेचे आहे. यासाठी वेगवेगळ्या राज्यांतून मोठ्या प्रमाणात चर्चासत्रे भरवावी लागतील व यासाठी काही वर्षे खर्च करावी लागतील.

२. भारतीय शिक्षणपद्धतीविषयी आयोगाने जो अहवालाचा मसुदा (blue-print) मांडला आहे तो बऱ्यापैकी चांगला आहे. परंतु आयोगाचा अंतिम अहवाल, शिक्षणपद्धती आणि समाज याविषयी फारसे काही मांडत नाही. एका बाजूला शिक्षण-पद्धती, समाजात ज्या प्रथा आहेत त्यांचा पाठपुरावा करते, तर दुसऱ्या बाजूला समाजात बदल घडून यावा व समाजाचा विकास व्हावा यासाठी प्रयत्न करते. शिक्षण-पद्धती व समाजाचा विकास या दोन गोष्टींत जे द्वंद्व दिसून येते, त्या बाबतीत या अहवालात स्पष्टपणे काही मांडलेले दिसत नाही. हे द्वंद्व मिटावे यासाठी एक स्वतंत्र प्रस्ताव मांडणे गरजेचे आहे. या प्रस्तावानुसार भारतातील शिक्षण-पद्धतीचे पुनरुज्जीवन आणि प्रस्थापित समाजरचना यांविषयी सखोल विचार झाला पाहिजे.

३. सध्याच्या शिक्षण-पद्धतीत पूर्णपणे बदल करून, त्याची सध्या आहे त्यापेक्षा वेगळी पुनर्रचना करणे गरजेचे आहे. त्याखेरीज सामाजिक-आर्थिक परिवर्तन (transformation) होणे शक्य नाही. आमूलाग्र बदललेली शिक्षण-पद्धती आणि आपले सामाजिक-आर्थिक बदल, हातात हात घालून एकाच वेळी झाले पाहिजेत. पुष्कळ वेळा, समाजात अशी भावना असते, की शिक्षण-पद्धतीत महत्त्वाचे बदल केले म्हणजे झाले, त्यासाठी सामाजिक-आर्थिक परिवर्तन त्याच वेळी झाले पाहिजे असे नाही. अशी भावना व अशा पद्धतीची विचारप्रणाली समाजाला उपयुक्त ठरणार नाही. हा भ्रम-निरास सुरुवातीलाच झाला पाहिजे.

४. राष्ट्रीय स्तरावरील एकात्म शिक्षण-पद्धती तयार करण्यासाठी समाजाला फार मोठी किंमत मोजावी लागते. पुष्कळ वेळा, ही किंमत काही फार नाही असा समज होतो. तसेच, पुष्कळ वेळा लोकांना असे वाटते की, ही किंमत राष्ट्राच्या आर्थिक गुंतवणुकीवर अवलंबून आहे, म्हणजे फार फार तर राष्ट्रीय उत्पन्नाच्या सहा टक्के! हा गैरसमज दूर करण्यासाठी, विद्यार्थ्यांना शिक्षण मिळावे यासाठी समाजाला जी किंमत मोजावी लागते, त्यात 'पैसा' हा अतिशय दुय्यम घटक आहे. उत्तम शिक्षण-पद्धती निर्माण करण्यासाठी

अनुक्रमणिका






समाजाला खूप अधिक काही मोजावे लागते. शिक्षण-पद्धतीत बदल करावयाचा झाल्यास 'पैसा' गरजेचा आहेच, यात शंका नाही. परंतु केवळ पैसा, मग तो कितीही प्रमाणात मोजलेला असो, आपल्याला आपल्या 'आमूलाग्र बदल' या ध्येयाप्रत नेऊ शकत नाही. शिक्षण-पद्धतीतील बदलासाठी आपल्याला जी किंमत मोजावी लागेल, त्यांत सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे 'विचार-विनिमय' ही होय. हा 'विचार-विनिमय' शिक्षक, विद्यार्थी, शिक्षण-संस्था चालक आणि समाजातील इतर विचारवंत या सर्वांनी 'विचार-मंथन' करून घडवून आणावयाचा आहे.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे, हे बदल पुष्कळ वेळा कटू असणार आहेत, प्रचलीत शिक्षण-पद्धतीत मुरलेल्या जनतेला नकोसे वाटणार आहेत. तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे सध्याच्या शिक्षण-पद्धतीत आमूलाग्र बदल करण्यासाठी, समाजाची पूर्वापार चालत आलेली घडी मोडून, नव्याने फेरबांधणी करावी लागणार आहे. यासाठी सर्वसामान्य जनतेचा या बदलाला पाठिंबा असणे जरूरीचे आहे.

५. आपल्याला हेही लक्षात घेतले पाहिजे की, प्रत्येक नागरिक व प्रत्येक सामाजिक गट, शिक्षण-पद्धतीतील घटक आहेत. प्रत्येकाच्या स्वतंत्र भूमिका आहेत. एवढेच नव्हे, तर एकत्र येऊन शिक्षण-पद्धतीत बदल करु इच्छिणाऱ्या व्यक्तींच्याही या बाबतीत वेगवेगळ्या भूमिका असू शकतात. प्रत्येक व्यक्ती आणि प्रत्येक सामाजिक गट, एकत्र येऊन आपापल्या भूमिका समजून सामोपचाराने पार पाडतील, तेव्हाच शिक्षण-पद्धतीत आमूलाग्र बदल होऊ शकेल.

हे पाच महत्त्वाचे धडे आपल्याला आत्मसात केले पाहिजेत. यांपैकी पहिले तीन धडे महत्त्वाचे आहेत. आपल्याला जे प्रश्न सोडवावयाचे आहेत, त्यांच्याविषयी स्पष्ट समज (conceptual clarification); आणि संपूर्ण राष्ट्रासाठी एक आराखडा निर्माण करण्याची जरुरी आहे. त्यासाठी आपण पहिले तीन धडे, अधिक बारकाईने तपासूया. शेवटचे दोन धडे आपल्याला, हे पहिले तीन धडे प्रत्यक्षात कसे आणावयाचे याविषयीचे विचार मांडणारे आहेत. ते आपण नंतर पाहूया.

### भविष्यकाळातील समाज

भविष्यकाळातील समाज कसा असावा याविषयी अनेक दृष्टिकोन असू शकतात, तरी आपण एका सोप्या दृष्टिकोनातून या प्रश्नाकडे पाहूया. त्यासाठी, सध्याच्या आपल्या समाज-पद्धतीत (social order) काय दोष आहेत, हे निश्चित करून, ते शक्य तितक्या लौकर नाहीसे केले पाहिजेत, हे लक्षांत घेणे गरजेचे आहे. हे केले की आपल्या लक्षात येईल की, भविष्यकाळात आपल्याला कशा स्वरुपाचा समाज घडवावयाचा आहे, आणि असा समाज घडवून आणण्यासाठी आपल्याला कशा स्वरूपाचा कार्यक्रम आखला पाहिजे. या दृष्टिकोनातून बघितल्यास आपल्याला समाजातील तीन गंभीर दोष दिसून येतात.

१. अभिजनवर्ग (Elitism) - आपल्या समाजातील हा सर्वात महत्त्वाचा दोष आहे. समाजातील एका गटाकडे धुरिणत्व असल्यामुळे, हा गट आपली सर्वसामान्य जनतेवरील पकड राखण्यासाठी, आपापसातल्या लहानमोठ्या कुरबुरी बाजूला ठेवून, समाजासमोर आपण पूर्णत: एक आहोत (united front) असे दाखवितात. प्रसंगी एक होतातही. या गटापुढे सर्वसामान्य जनता हतबल होते व स्वत:चे भवितव्य स्वत: घडविण्याची क्षमता त्यांच्यात राहत नाही. ही जी आपली समाज-रचना आहे ती कित्येक शतकांपासून चालू आहे. पूर्वापार सर्व सत्ता तीन प्रमुख जातींत (म्हणजेच समाजातील गटांत) विभागली गेली होती. त्यांना 'द्विज' असे ओळखले जात होते. या तीन जातींपैकी ब्राह्मण जातीच्या हातात ज्ञानाची शक्ती होती; क्षत्रियांच्या बातात राजकीय सत्ता होती आणि वैश्यांच्या हातात संपत्तीची सत्ता होती. या तीन जातींनाच त्यांच्या त्यांच्या व्यवसायांचे ज्ञान मिळविण्याचा हक्क होता. शेवटची तळागाळातली जात शुद्र म्हणून ओळखली जात होती. ही जात, वरील तिन्ही जातींची सर्व प्रकारची सेवा करण्यात, कधीकधी गुलाम बनून राहण्यात मग्न होती. कारण त्यांना कुठल्याही प्रकारचे ज्ञान मिळविण्याचा अधिकार नव्हता. त्यांना 'अंत्यज' असे संबोधले जात होते. त्यांची राहण्याची जागादेखील गावाबाहेर असे. अशा प्रकारची अन्याय्य पद्धती आपल्या समाजाने स्वीकारली कारण त्या पद्धतीला धार्मिक व सामाजिक पाया होता. हा पाया आपल्या अध्यात्मिक तत्त्वज्ञानाने (Philosophical base) घालून दिला होता. त्यामुळे अंत्यजांचा गट, जरी समाजातील सर्वात मोठा गट असला तरी तो मुकाट्याने भारतीय तत्त्वज्ञान स्वीकारीत होता. आणि या विपरित परिस्थितीविरुद्ध बंड






करून उठत नव्हता.

मुस्लिमांचे आक्रमण झाल्यानंतरही या पद्धतीत बदल झाला नाही, कारण मुस्लिम समाज स्वतःच गटात विभागला गेला. त्यांच्यातही वरिष्ठ आणि कनिष्ठ असे गट पडले. हिंदू आणि मुस्लिम यांच्यातील वरिष्ठ गटांनी हातमिळवणी करून, अंत्यजांना अंत्यजच राहू दिले. हिंदू आणि मुस्लिम धर्मियांत युद्धे होत होती, परंतु ती, देशावर वर्चस्व स्थापन करण्यासाठी होती, सामाजिक बदलांशी त्यांचे प्रयत्न नव्हते. ब्रिटिशांच्या काळात आपण त्यांची शिक्षण-पद्धती स्वीकारली, तसेच लोकशाही पद्धत व इहवादही स्वीकारण्याचा प्रयत्न झाला, परंतु सामाजिक परिस्थिती 'जैसे थे'च राहिली. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे समाजात वर्चस्व असलेला गट, जो ब्रिटिश इथे येण्याच्या आधीपासूनच होता, त्या गटांच्या हातात सत्ता-स्थाने होती. त्या गटांना सामाजिक प्रतिष्ठा होती, जमीनदारी पद्धती आणि व्यापार व उद्योग-निर्मितीची शक्ती होती. तसेच, या गटांच्या हातात ब्रिटिश इथे येण्याच्या आधीपासूनच सरकार, दरबारी राजकीय सत्ता होती व लढाया करण्याची शक्ती होती.

या गटांच्या अगदी सुरुवातीलाच लक्षात आले की, ब्रिटिशांच्या राज्यात मान्यता मिळवावयाची असेल तर नवीन पद्धतीचे शिक्षण व नवीन पद्धतीची राहणी स्वीकारली पाहिजे. ब्रिटिशांना देखील हे समजून आले की, यात त्यांचा फायदा आहे. ब्रिटीश आणि सर्वसामान्य जनता यांच्यात सामंजस्य निर्माण करण्यासाठी मध्यस्थांची गरज त्यांना होती. सर्व-सामान्य जनता त्यांना अनुकूल झाली तर त्यांचे राज्य अधिक सुस्थिर होणार होते.

जसे जसे पाश्चिमात्य पद्धतीचे शिक्षण समाजातील सर्व स्तरांत पसरत गेले, आणि जसे जसे त्या पद्धतीतील इहवादी व लोकशाहीवादी विचार समाजात फैलावत गेले, तीन महत्त्वाचे बदल समाजात घडून आले. आणि ते बदल समाजातील सर्वात वरिष्ठ स्तरांत घडून आले. या वरिष्ठ गटांत आतापर्यंत वरिष्ठ जातीच समाविष्ट होत्या. आणि कनिष्ठ जातीतील काही व्यक्ती या गटात सामावून घेतल्या होत्या, त्याचे कारणही त्यांचे पाश्चिमात्य पद्धतीचे शिक्षण झाले होते, हे होते. त्यामुळे या शिक्षण-पद्धतीला महत्त्व प्राप्त होऊ लागले होते.

२. जसजशा नवीन, नवीन व्यक्ती या गटात सामील होऊ लागल्या, तसतशी पूर्वीच्या वरिष्ठ जातींतील व्यक्तींची संख्या कमी कमी होऊ लागली, कारण, त्यापैकी काही गट बाजूला होऊ लागले.

३. हा जो नवशिक्षितांचा गट तयार होऊ लागला, त्याला, त्या गटातील व्यक्तींचे गुण पारखून मान्यता मिळू लागली. पूर्वीप्रमाणे 'पूर्वसुकृताप्रमाणे तुम्हाला गुण प्राप्त होतात' हे समर्थन लंगडे पडू लागले. आजच्या भारतीय समाजात, सत्ताधारी Elite व्यक्ती केवळ ब्राह्मणच नव्हे तर इतर जातींतील, उदाहरणार्थ, श्रीमंत शेतकरी, क्षत्रिय, श्रीमंत व्यापारी ही आहेत. इथे क्षत्रिय म्हणजे अलिकडच्या काळातील क्षत्रिय, उदाहरणार्थ, राजकीय सत्ताधारी, नोकरशाही, लष्करा-तील अधिकारी वगैरे अभिप्रेत आहेत. त्याचप्रमाणे अलि-कडच्या काळातील वैश्य, उदाहरणार्थ मोठमोठे कारखानदार, बडे व्यापारी वगैरे. हे व्यापारी संघटना बांधतात. तसेच अलिकडच्या काळातील ब्राह्मण म्हणजे, उच्चशिक्षित, विद्वान, विचारवंत होत. त्यांच्या ताब्यात मोठमोठ्या शिक्षणसंस्था आहेत. हे सर्व समाजातील वरच्या स्तरातील लोक आहेत. उरलेले ७० ते ८० टक्के लोक अतिशय गरिबीत, कुठल्याही प्रकारच्या सुविधा नसलेले जीवन कंठीत आहेत.

त्यांच्या हातात कुठल्याही प्रकारची सत्ता नाही. राजकीय सत्ता नाही, आर्थिक सत्ता नाही आणि सामान्य प्रतीच्या ज्ञानापासूनही त्यांना वंचित ठेवले गेलेले आहे. कुठल्याही प्रकारचे ज्ञान मिळत नसल्यामुळे ते सर्वसाधारण सुखांनाही व सुविधांनाही वंचित आहेत.

आजच्या आधुनिक काळात, वेगवेगळ्या प्रकारचे ज्ञान, विशेषत: विज्ञान आणि तंत्रज्ञान असणे आवश्यक झाले आहे. परंतु हे ज्ञान, विज्ञान सर्वसामान्य जनतेपासून खूप दूर आहे, कारण ते या अभिजन वर्गांनाच (elite) मिळविणे शक्य आहे, आणि त्याप्रमाणे हे वर्ग त्याचा भरपूर फायदा उठवीत आहेत. परंतु सर्वसामान्य जनतेसाठी या ज्ञान, विज्ञानाची कवाडे बंद आहेत. त्यांच्यासाठी ती कवाडे उघडावीत असे प्रयत्न, एकतर, शिक्षणसंस्था करीत नाहीत, किंवा त्यांना तसे प्रयत्न जाणून बुजून करू दिले जात नाहीत.

ब्रिटिशांपासून स्वातंत्र्य मिळवून घेण्याच्या प्रयत्नात या वंचित वर्गाचा सहभाग जरूरीचा होता, म्हणून त्या वर्गाशी आपुलकीचे संबंध जोडले गेले. सर्वसामान्य जनता, स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या वरीष्ठ वर्गीयांच्या पाठीशी उभी

नसती तर स्वातंत्र्य मिळविणे शक्य झाले नसते. परंतु एकदा स्वातंत्र्य पदरात पडल्यानंतर, परत पूर्वीचीच परिस्थिती दिसून येऊ लागली. फक्त वरीष्ठ वर्ग स्वतःच्या हातात सत्ता व मत्ता काबिज करून घेऊ लागला. अर्थात, वर वर, समतेच्या व समरसतेच्या घोषणा देणे चालू राहिले. ही जी आताची या समाजाची परिस्थिती आहे, ती पूर्वीपेक्षाही भयानक आहे. पूर्वीच्या काळी लोक परंपरा जपणारे होते, आधुनिक विज्ञानाशी त्यांची ओळख झाली नव्हती, त्यामुळे गरिबी व श्रीमंती यातील सीमारेषा पुसट होती. गरीबांना गरिबीतून वर येण्यासाठी मदत करणे योग्य समजले जात होते. आताच्या आधुनिक काळाप्रमाणे त्यांच्या हातात सत्ता गाजविण्याची आणि दडपशाही करण्याची आधुनिक हत्यारे आली नव्हती.

आपल्या समाजातील, दुसरा महत्त्वाचा दोष म्हणजे, आपल्या समाजाचे 'स्तरीकरण' हा आहे. आपला समाज केवळ वरिष्ठ आणि कनिष्ठ अशा दोन गटांत विभागलेला नाही. प्रत्यक्षात, हजारो तुकड्या, तुकड्यांत विभागलेले समाजातील गट आहेत. त्यामुळे आपल्या डोळ्यांसमोर आपल्या समाजाचे जे चित्र उभे राहते, त्याप्रमाणे आपल्या समाजात सर्वत्र minority groups च आहेत की काय असा भास होतो. आणि हे छोटे, छोटे गट एकमेकांशी वेगवेगळ्या स्वरूपाचे संबंध ठेऊन आहेत असे वाटते. या वेगवेगळ्या संबंधांचेही स्तरीकरण झालेले आहे हे लक्षात येते. कुठलाही गट स्वतःला दुसऱ्या गटाच्या समान मानत नाही, त्या दुसऱ्या गटापेक्षा स्वतःला वरिष्ठ तरी मानतो किंवा कनिष्ठ तरी मानतो. उदाहरणार्थ, सर्वांत खालचा असा समजला गेलेला गट - शिड्युल्ड कास्टस् - देखील एक एकजिनसी (homogeneous) नाही. त्या गटात अनेक छोटे, छोटे गट आहेत. जे एकमेकांना एकमेकांपासून वेगळे समजतात व अलिप्त राहतात. त्यामुळे या गटांतील कुणाला मदत करावीशी वाटली, तरी ही मदत त्यांच्यातील वरिष्ठ गटाच्या हातात पडते. ही जी स्तरीकरणाची परंपरा आपल्या समाजात इतक्या खोलवर रुजली आहे की, ती लोकशाही मूल्ये समाजात रुजविण्यासाठी आणि सामाजिक न्याय (social justice) वंचितांना मिळवून देण्यासाठीच्या मार्गातील मोठे धोंडे आहेत.

३. आपल्या समाजातील स्तरीकरणामुळे निर्माण होणारा तिसरा महत्त्वाचा दोष म्हणजे गरिबी. आपल्या देशातल्या गरिबीइतकी भयानक गरिबी क्वचितच इतर देशांत आढळते. आपल्या समाजातील बहुसंख्य लोक दारिद्र्य रेषेखाली राहतात. एवढेच नव्हे, तर त्यापैकी बहुतेकजण पशुवत् जिणे जगतात. आपल्या समाजातील बहुतेक गुन्हेगारी (evils) या गरिबीमुळे निर्माण झालेली आहे. अत्यंत निकृष्ट प्रतीचे अन्न त्यांना मिळते, आणि निवाऱ्याची सोय जवळजवळ नसतेच. मग, इस्पितळे, शिक्षणसंस्था अशा स्वरूपाच्या सुविधा दूरच राहतात. हा समाजातील दोष दूर करण्यासाठी केवळ उत्पादन वाढ करणेच पुरेसे नाही. उत्पादनवाढीची जरूरी आहेच, कारण वाढत्या लोकसंख्येपुढे उत्पादनवाढ अपुरी पडत आहे. परंतु याच्याही पलीकडे जाऊन पाहिले तर असे लक्षांत येते की, उत्पादनवाढीच्या प्रश्नाबरोबरच उत्पादन - वितरणाचाही प्रश्न येतो. गोदामे भरून वाहत असतात. पण सर्वसामान्य गरीब लोकांपर्यंत ते अन्नधान्य पोहोचत नाही, मधल्यामधेच गडप होते.

आपल्या समाजात दुसरी दोन क्षेत्रे अशी आहेत की, बदलत्या काळात त्या क्षेत्रांचे स्वरूप गंभीर होत चालले आहे. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपण इहवादी विचारसरणी स्वीकारून योग्य तेच केले आहे. हिंदूंची परंपरा दुसऱ्या धर्मांचा आदर करावा व त्यांच्या बाबतीत सहिष्णु असावे असाच आहे. आणि गेल्या दीडशे वर्षांत आपण याबाबतीत अधिक प्रगती केलेली आहे. परंतु अलीकडच्या काही वर्षांत आपल्या समाजात जातीयवादी व इतर धर्मियांच्या बाबतीत असहिष्णु वृत्ती जोर धरू लागल्या आहेत. विशेषत: हिंदू आणि मुस्लीम यांच्यातील परस्पर द्वेषांत हे दिसून येऊ लागले आहे. ही परिस्थिती धोकादायक आहे. त्यामुळे परस्परांत ताणतणाव निर्माण होऊ लागले आहेत, एवढेच नाही तर छोट्या मोठ्या चकमकींही होऊ लागल्या आहेत. त्यामुळे आपले सामाजिक स्थैर्य नाहीसे होऊ लागले आहे. परिणामत: आपल्या समाजाची प्रगती खुंटू लागली आहे.

समाजातील दुसरे महत्त्वाचे क्षेत्र म्हणजे लोकशाही - राजकीय क्षेत्र. आपण स्वीकारलेल्या लोकशाही समाजरचनेत हुकुमशाही वृत्ती शिरू/घुसू लागलेल्या आहेत. आधीच आपल्या समाजात लोकशाही नव्यानेच स्थापन होत आहे. प्राचीन कालखंड वगळता, आपल्या देशात सरंजामशाही व्यवस्थाच होती. हुकुमाचे मुकाट्याने पालन करण्याची वृत्ती आपल्या समाजात परंपरेने इतकी रुजलेली आहे की लोकशाही मूल्ये आपण अजूनही पूर्णपणे मान्य केलेली नाहीत. स्वातंत्र्य

मिळाल्यानंतर, लगेचच्या कालखंडात लोकशाहीवादी प्रवृत्ती काही प्रमाणात तरी दिसून येत होत्या. परंतु लोकशाही प्रवृत्ती अजूनही आपल्या समाजात पूर्णत: रुजलेल्या दिसून येत नाहीत. त्या रुजविण्यासाठी आपल्याला बरेच प्रयत्न करावे लागणार आहेत.

आपल्या समाजाचे हे विश्लेषण आपल्याला मान्य आहे, असे धरून चालले तर समाजाचा विकास घडवून आणण्यासाठी आपला कार्यक्रम काय असावा?

सुरुवातीलाच एक महत्त्वाची गोष्ट लक्षात घेणे जरुर आहे. विकास कसा साधावा यासाठी दोन पद्धती - models- समाजात विचारात घेतल्या जात आहेत. पहिली पद्धत म्हणजे भांडवलशाही समाज-व्यवस्था. ती आज अस्तित्वात आहेच आणि ती बहुसंख्यांना मान्य आहे. आणि दुसरी पद्धत म्हणजे समाजवादी समाजव्यवस्था. ती फारशी मान्य पावलेली नाही. आमच्या मते, भांडवलशाही पद्धती आपल्या समाजासाठी योग्य नाही. आम्हाला समाजवादी समाज-व्यवस्था अधिक मान्य आहे. ही आमची विचारसरणी बऱ्याच जणांना मान्य होणार नाही. आणि याबाबतीत आम्ही त्यांच्याबरोबर वाद करू इच्छित नाही, कारण त्यांच्याही म्हणण्यात काही तथ्यांश आहेत. त्यामुळे आमच्या मते या दोन्ही प्रकारच्या समाज-व्यवस्थांऐवजी, आणखी एक तिसरी समाजव्यवस्था असू शकते. पाश्चिमात्य देशांत भांडवलशाही व्यवस्था प्रबल आहे, परंतु काही राष्ट्रांत साम्यवादी व्यवस्थाही आहे. (हे रशियाचे विघटन होण्याआधी लिहिलेले आहे.) समाजव्यवस्था कुठलीही असो, परंतु या दोन्ही व्यवस्थांत चंगळवाद शिरलेला आहे आणि हा चंगळवाद संपूर्ण जगाच्या पर्यावरणाला धोकादायक ठरत आहे. या चंगळवादामुळे जगातील सर्व समाजातील, जगण्यास आवश्यक असलेले स्रोत पाणी, जंगल, खनिज संपत्ती आणि पर्यावरणीय साखळी जपण्यासाठी आवश्यक असलेले लहानमोठे जीव व प्राणी कमीकमी होत चाललेले आहेत. परिणामत: निरनिराळ्या राष्ट्रांतील सामाजिक व राजकीय तणाव वाढत चाललेले दिसतात. एवढेच नव्हे तर प्रत्येक राष्ट्रांतर्गत असे तणाव वाढत आहेत. त्यामुळे निरनिराळ्या प्रकारच्या भयंकर शस्त्रांचा (उदा. अणुबॉंब, न्युक्लीअर बॉंब वगैरे) साठा राष्ट्रे करू लागली आहेत. राष्ट्राराष्ट्रांतील चंगळवादामुळे आलेली कटुता वाढत गेली तर, सर्व जगच नामशेष होण्याचा धोका संभवतो.

या सर्व बाजूंनी विचार करताना आपल्याला यांतून तिसराच मार्ग सुचतो. या विचारसरणीनुसार, चंगळवाद वाढला की आपल्या जीवनाचा पोतही बदलतो. आपल्याकडे जितक्या सुविधा अधिक, तितके आपण अधिक सुखी असे होऊ शकत नाही. आपली हाव वाढतच जाते. हे रोखण्यासाठी आपण समुचित तंत्रज्ञानाचा स्वीकार केला पाहिजे. समुचित तंत्रज्ञान स्वीकारताना आपल्या देशातील मनुष्यबळ, व इतर सर्व प्रकारची श्रीमंती (पाणी, जंगल, खनिजे वगैरे) यांचा यथायोग्य उपयोग करून घेतला पाहिजे. हा उपयोग करून घेताना आपल्या या संपत्तीचा नाश होत नाही ना याकडेही लक्ष दिले पाहिजे. केवळ आपल्या देशातच नव्हे, तर जगातील इतर सर्व देशातही अशी समुचित तंत्रज्ञान स्वीकारण्याची गरज आहे. भारतात आपल्याला हा मार्ग स्वीकारणे शक्य आहे. महात्मा गांधींचे जीवन व विचारसरणी आपल्याला या बाबतीत मदत करू शकतात. आपल्या राष्ट्राच्या भवितव्यासाठी या तिसऱ्या मार्गावर वाटचाल करणे जरुरीचे आहे.

सध्याच्या परिस्थितीत समाजातील एक छोटा गट अधिकाधिक लोकांचे भवितव्य ठरविताना दिसतो आणि हे करताना त्या सामान्य माणसांचे पुढील भवितव्य काय, या बाबतीत विचारही करीत नाही. ही परिस्थिती बदलावी म्हणून आपण एका नवीन तत्त्वज्ञानाचा स्वीकार केला पाहिजे. ते तत्त्वज्ञान म्हणजे सर्वसामान्य माणसांच्या विचारांवरती विश्वास असणे : सर्वसामान्य माणसांची आत्मप्रतिष्ठा (dignity), त्यांचे मूलगामी शहाणपण, आणि त्यांची परंपरागत चालत आलेली, कठीण परिस्थितीतून मार्ग काढण्याची स्वाभाविक प्रवृत्ती. प्रत्येक व्यक्तीचे आत्मभान (dignity) व व्यक्तिस्वातंत्र्य, आपण जपावयास शिकले पाहिजे. अर्थात्, हे जपताना दुसऱ्यांचे आत्मभान व व्यक्ती-स्वातंत्र्य यावर आपण दबाव तर आणत नाही ना, हे देखील पाहिले पाहिजे. थोडक्यात, सर्वसामान्य जनतेचा प्रत्येक महत्त्वाच्या कार्यात पुरेपूर व मनापासून सहभाग असला पाहिजे. हा सहभाग प्रत्येक राजकीय क्षेत्रात, आर्थिक क्षेत्रात व ज्ञानाच्या क्षेत्रात असला पाहिजे. कारण ही तिन्ही क्षेत्रे एकमेकांत गुंतलेली आहेत.

इथे आपण हेही लक्षात घेतले पाहिजे की, हे घडवून आणताना आपण आधुनिक समाजात दिसून येणारा टोकाचा professionalism टाळला पाहिजे. कारण यामुळे

सर्वसामान्यांना महत्त्वाचे निर्णय घेण्याच्या बाबतीत आपले मत मांडता येणे शक्य होत नाही. थोडक्यात, आपल्या देशाची प्रगती, आपल्या देशातील आजवर दबल्या गेलेल्या सर्वसामान्य जनांच्या प्रगतीवर मोजली पाहिजे. सर्व-सामान्यांना आपल्यातील जागरूकता awareness आणि आजूबाजूच्या समाजातील सामाजिक परिस्थिती लक्षात आली पाहिजे. तसेच, आपणही या देशातील महत्त्वाचे घटक आहोत, आणि आपले प्रश्न सोडविण्यास आपण तयार होऊन एकजूट केली पाहिजे, याची जाणीव झाली पाहिजे. हे नवीन तत्त्वज्ञान आपण स्वीकारले तर आजवर दबल्या गेलेल्या सर्वसामान्यांना आपला आवाज सर्वांना ऐकविता येईल. तसेच, ज्यांनी आजवर सर्वसामान्य जनतेचा आवाज दडपून टाकलेला आहे त्यांना देखील, आपल्या सध्याच्या dehumanizing role पासून सुटका मिळेल. अर्थात, हे सरळ समजण्यासारखे आहे, की हे घडवून आणणे सहजसाध्य नाही. उच्चवर्गीय (elite) आणि सर्वसामान्य जनसमुदाय यांतील संघर्ष अटळ आहे. आपले ऐषारामी, चंगळवादी जीवन सोडून सर्वसामान्यांसारखे राहणे त्यांना अतिशय अवघड जाणार आहे. त्यांचे हृदय-परिवर्तन होणे इष्ट आहे, पण शक्य नाही. कदाचित् एका बाजूला हृदय-परिवर्तनाचा मार्ग अनुसरणे, दुसऱ्या बाजूला सर्वसामान्यांची एकजूट करून, त्यांना शक्ती मिळवून देणे, आणि तिसऱ्या बाजूला शासनाने सर्वसामान्य जनतेच्या बाजूने राहणे.

गरिबी आणि असमानता (inequality) हातात हात घालून जातात. ही परिस्थिती नाहीशी होण्यासाठी निर्धारपूर्वक काही पाऊले उचलली पाहिजेत. सर्वात मूलगामी स्वरूपाचे पाऊल म्हणजे गरिबी व श्रीमंती यामध्ये असलेली खोलवर दरी कमीत कमी केली पाहिजे.

प्रत्यक्षात, समाजातील तीस टक्के लोक श्रीमंती आणि चंगळवादी जीवन घालवीत असतात, हे रोखल्याखेरीज इतर काही होणे शक्य नाही. दुसरे पाऊल हे असेल की, सर्वसामान्यांना परवडणारे साधेसोपे समुचित तंत्रज्ञान (appropriate technology) उपयोगात आणले पाहिजे. त्यामुळे त्रासदायक ठरू लागलेला प्रदूषणाचा प्रश्नदेखील सुटू शकेल. तिसरे पाऊल म्हणजे सर्वसामान्य जनतेला ज्या वस्तूंची गरज आहे (अन्न, वस्त्र, निवारा, शिक्षण, आरोग्य) त्या वस्तू अधिकाधिक प्रमाणात निर्माण करणे आणि श्रीमंतांसाठी महागड्या वस्तूंची निर्मिती थांबविणे. तसेच ज्या वस्तू गरजेच्या आहेत त्या वस्तू योग्य दरात सर्वत्र, सर्वांना मिळतील याची काळजी घेणेही जरुरीचे आहे. आणि शेवटी सर्वात महत्त्वाचे पाऊल म्हणजे प्रत्येकाच्या दैनंदिन मूलभूत गरजा भागतील एवढे वेतन प्रत्येकाला मिळेल अशी व्यवस्था करणे. असे योग्य वेतन मिळण्यासाठी रोजगार हमी योजना (guaranteed employment scheme) राबवली पाहिजे. ही सर्व पाऊले उचलताना, त्यात काही गैरप्रकार होत नाहीत ना ? यासाठी सुशिक्षित समाजाचे व शासनाचे, डोळ्यात तेल घालून लक्ष असले पाहिजे. हे सर्व केल्याखेरीज, परिणामकारक आर्थिक व सामाजिक समता अस्तित्वात येणार नाही. हे साध्य झाले तर, राजकीय सत्ता देखील सर्वसामान्यांच्या हातात येणे सहज शक्य होईल. राजकीय हक्क मिळविण्यासाठी लोकांना आपल्या संघटना बांधता येतील, आणि सार्वत्रिक मतदानाचा हक्क बजावून, व यासाठी सर्वसामान्यांना प्रशिक्षित करण्यासाठी सार्वत्रिक शिक्षण-संस्था व प्रौढांसाठी शिक्षण देणाऱ्या संस्था निर्माण कराव्या लागतील. आपल्या समोर असलेला तिसरा महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे सामाजिक आणि राष्ट्रीय एकात्मता घडवून आणणे. ज्यावेळी Education Commission ने आपला रिपोर्ट लिहिला त्यावेळी हा प्रश्न ऐरणीवर होता. अजूनही हा प्रश्न आपल्याला सतावत आहेच, आणि सध्या समाजात ज्या काही घडामोडी घडत आहेत, त्यामुळे हा प्रश्न अधिकच बिकट बनलेला दिसतो. राजकारणात दिसून येत असलेले फुटीरपण आणि अखिल भारतीय स्तरावर मान्यताप्राप्त असलेला कुठलाही राजकीय पक्ष अस्तित्वात नसल्यामुळे राष्ट्राची सुदृढ उभारणी करणे अवघड व नाजूक होऊन बसले आहे. हुकुमशाही प्रवृत्ती वाढत आहे, तसेच जाती-जमातीतले परस्पर विरोधही वाढत चाललेले दिसत आहेत. पाणी वाटपाच्या प्रश्नांपासून भाषेच्या प्रश्नापर्यंत राज्याराज्यात वाद चालू आहेत. सामाजिक व राजकीय एकात्मतेसाठी काही ठोस प्रयत्न करणे जरूरीचे झाले आहे. असे प्रयत्न करणे खूप अवघड आहे. कारण यासाठी आपल्याला सर्वसामान्य लोकांचे दृष्टिकोन (attitudes) बदलावे लागतील, समाजातील अनेकविध गटांचे स्वतःचे असे आत्मभान (dignity) न गमावता, इतर गटांशी सहकार्य करून नवसमाज निर्माण करावयाचा आहे. अशा नव-समाजात सर्वांची ध्येयधोरणे समान असतील आणि ती गाठण्यासाठी करावयाचे प्रयत्नही समान पातळीवर येऊन








केलेले असतील. अशा समान पातळीवर येताना आपापले धर्म, वर्ण (race) व जाती-जमाती बाजूला ठेवून एकत्रित प्रयत्न करणे अत्यंत जरूरीचे आहे. असे झाल्याखेरीज प्रत्येक भारतीयाला अभिमान व आत्मीयता वाटणार नाही. आणि असा अभिमान व अशी आत्मीयता वाटल्याखेरीज समाज एकसंध होणार नाही व यासाठी स्वार्थत्याग करावा असे त्याला वाटणार नाही. येत्या पुढील वर्षात सर्वात महत्त्वाचा राजकीय प्रश्न (concern) एकसंधता कशी साधावी हा असेल. आणि हे साधण्यासाठी विरोधात असणाऱ्या शक्तींना काबूत आणणे महत्त्वाचे असेल.

इथे हेही धरून चालले पाहिजे की, सामाजिक एकसंधता कशी साधावी याविषयी आमच्या नजरेसमोर असलेल्या कार्यक्रमापेक्षा वेगळा कार्यक्रम इतरांना सुचू शकेल किंवा आमचा कार्यक्रम मान्य होणार नाही. भविष्यकाळातील भारतीय समाज कसा असावा याविषयी वेगवेगळी मते व त्यानुसार कार्यक्रमही असू शकतील. परंतु भारतीय समाजाची जडणघडण कशी असावी याविषयी विचार-विनिमय तर झाला पाहिजे. तसा विचार-विनिमय, वादविवाद होत नाहीत, ही वस्तुस्थिती गंभीर आहे. यासाठी आमचा पहिला प्रयत्न असा विचारविनिमय झाला पाहिजे व तो शिक्षण-क्षेत्रातील मान्यवर, राजकीय क्षेत्रातील मान्यवर, प्रत्यक्ष शिक्षण देणाऱ्या शिक्षकांत आणि विद्यार्थ्यांत आणि सर्वसामान्य जनांतही झाला पाहिजे. असा विचार-विनिमय व वादविवाद झाले तरच आपल्या समाजासमोरील प्रश्न स्पष्ट होत जातील आणि याहून महत्त्वाचे म्हणजे आपल्या स्थितीप्रिय समाजाला पूर्ण बदलून टाकण्यासाठी सज्ज झालेले लोक यामुळे तयार होतील. आपल्याला जे अभिप्रेत आहे ते सामाजिक व आर्थिक परिवर्तन निर्माण होणे सहज शक्य होईल.



अखिल भारतीय स्वरूपाची शिक्षण व्यवस्था उभी करणे हे सोपे काम नाही. अशी शिक्षण व्यवस्था निर्माण करण्यासाठी कठोर निर्णय घ्यावे लागतील, आणि फार मोठ्या प्रमाणावर निधी उभारावा लागेल. एवढेच नव्हे, तर भारतभर एक सशक्त शैक्षणिक चळवळ उभी करावी लागेल, व त्या चळवळीच्या आड येणाऱ्या हितसंबंधी व्यक्ती व संस्थांना (vested interests) ठेचून काढावे लागेल. हे काम अतिशय अवघड आहे, कारण हे घडवून आणण्यासाठी आपली संपूर्ण समाज-रचनाच पूर्णपणे बदलून टाकावी लागेल. गेल्या तीस वर्षांचा इतिहास सांगतो की, हे घडवून आणण्यासाठी खालील प्रयत्न करणे अत्यंत गरजेचे आहे.

१. शिक्षण-व्यवस्थेत क्रांतिकरक बदल घडवून आणण्यासाठी आपल्याला संशोधन व विकास कसा करता येईल याचा शोध घ्यावयाची जरूरी आहे.

२. शिक्षण-व्यवस्थेशी संबंधित असलेल्या सर्वांना - शिक्षण-संस्था, शिक्षक, विद्यार्थी व सर्वसामान्य जनता - या बदलाची गरज समजावून देणे, आणि असा बदल घडवून आणण्यासाठी प्रत्येक नागरिकाला किती त्याग करावा लागेल, याची कल्पना द्यावी लागेल.

३. अशी कल्पना देण्यासाठी एक अखिल भारतीय स्वरूपाची व्यापक चळवळ, केवळ शहरांतच नव्हे, तर खेडोपाडीही सुरू करावी लागेल.

४. यासाठी राजकीय पक्ष-संघटना व त्यांत काम करणारे कार्यकर्ते यांचे प्रबोधन करावे लागेल. तसेच पार्टी संघटनांवरही दबाव आणून नवीन शिक्षण-व्यवस्थेला पाठिंबा मिळवावा लागेल.

५. शिक्षण-व्यवस्थेत आपल्याला जे क्रांतिकारक बदल घडवून आणावयाचे आहेत, त्यासाठी लोकांची मनोभूमी तयार करण्यासाठी सातत्याने प्रयत्न केले पाहिजेत. तशी मनोभूमी तयार झाल्यानंतरच, सर्वसामान्य जनता, शासनसंस्थेवर दबाव आणून, शासनसंस्थेला, सर्वसामान्यांच्या हिताच्या बदलांचा विचार करावा लागेल.

६. हे सर्व घडवून आणण्यासाठी आपल्याला सामाजिक आणि राजकीय क्षेत्रांतील कार्यकर्ते यांची मदत घ्यावी लागेल. त्यांना आपण शिक्षणाचे महत्त्व आणि शिक्षण व सामाजिक, राजकीय कार्यक्रम एकमेकांना पूरक कसे आहेत, हे प्रत्यक्ष कृतींनी समजावून द्यावे लागेल.

७. शिक्षण, विद्यार्थी व शिक्षण खात्यातील अधिकारी यांना, ही नव्या पद्धतीची शिक्षण-व्यवस्था, या देशातील सामाजिक बदलासाठी कशी उपयुक्त आहे, याचे यथार्थ चित्र त्यांच्या नजरेसमोर उभे करावे लागेल. त्यांना अशी स्पष्ट कल्पना आल्यानंतरच त्यांच्यावरच्या नैतिक जबाबदारीची त्यांना जाणीव होईल.

अनुक्रमणिका






हे सर्व घडून आल्यावरच या देशात असे वातावरण तयार होईल की, आपण, आपली ध्येय-धोरणे आखून, नवनिर्मित समाजासाठी, आपल्या राज्यघटनेत निर्दशित (visualized) केल्याप्रमाणे नैतिक निकषांवर आधारित समाज-रचना व शिक्षण-व्यवस्था निर्माण करू शकू.



काही बाबतीत वरील विवेचन, आहे ही बिकट परिस्थिती निर्माण करण्यास, 'मीसुद्धा दोषी आहे' असे वाटावयास लावते. तरीदेखील, ही परिस्थिती बदलण्यासाठी नवीन, नवीन सुचविलेल्या कल्पना, त्या कशा अंमलात आणता येतील याविषयीचे विवेचन, राज्यसत्तेचे वर्चस्व, आणि आजची सामाजिक, आर्थिक परिस्थिती, या सर्वांतून आपण कशा प्रकारे वेगळी समाजरचना व शिक्षणपद्धती अस्तित्वात आणू शकू याचे यथायोग्य विवेचन केले आहे.

शिक्षण कमिशनचा अहवाल माहितीपूर्ण तर आहेच, पण तो सुस्पष्ट शब्दांत, authority व integrity पूर्वक मांडला आहे. स्वतः जे० पी० नाईक कमिशनच्या कामात पूर्णतः सहभागी होते, आणि त्यासाठी सर्व प्रकारची माहिती मिळविण्यात त्यांनी पुढाकार देखील घेतला होता. ते कुणाचीही भीड-मुर्वत न ठेवता लिहितात, कारण भारतातील प्रस्थापित शिक्षण-पद्धतीचा त्यांना भरपूर अनुभव आहे. शिक्षणपद्धतीतील चढउतार, त्यांना पूर्णपणे माहीत आहेत, कारण त्यांनी त्यांचा अनेक वर्षे अभ्यास केलेला आहे. शिक्षण-पद्धती कशी कशी बदलत गेली, व त्या बदलांची कारणे काय, याचे त्यांना संपूर्ण ज्ञान आहे. त्यामुळेच ते शिक्षणविषयक तत्त्वविचार (theory) सर्वांगीण विचार करून, व्यवस्थित मांडू शकलेले आहेत. हे सर्व सुस्पष्टपणे मांडण्यासाठी त्यांना वंचितांविषयीची कणव व आहे ती परिस्थिती स्पष्टपणे मांडण्याचे धैर्य होते. त्यामुळे हा ग्रंथ ऐतिहासिक तर आहेच, पण तो पुढे निर्माण होणाऱ्या प्रश्नांविषयी अभ्यासकांना मार्गदर्शक ठरणाराही आहे. इतकेच नव्हे, तर तो शिक्षण-पद्धतीत बदल करू इच्छिणाऱ्या, व ती राजकीय शक्ती ज्यांच्या हातात आहे त्यांनाही मार्गदर्शक आहे.



# शैक्षणिक पुनर्घटनेची दिशा

## १. आव्हान

भारतात औपचारिक शिक्षणपद्धतीला आता अवाढव्य स्वरूप प्राप्त झालेले असून तीत सात लाख संस्था, पस्तीस लाख शिक्षक आणि दहा कोटी विद्यार्थी समाविष्ट झाले आहेत. या शिक्षणावर दरवर्षी अडीच हजार कोटी रुपये खर्च होत असतात. एवढा खर्च होऊनही या शिक्षणपद्धतीचा गरीब किंवा अत्यंत गरीब असलेल्या सामान्य जनतेला काहीच लाभ होत नाही. बहुसंख्य गरीब लोक अजूनही निरक्षर आहेत; त्यांची बरीचशी मुले शाळेत जात नाहीत आणि जी जातात ती लवकरच शाळा सोडून देतात. शिक्षण पूर्ण करणाऱ्या मुलांची संख्या फारच थोडी असते. त्यांना शिक्षणपद्धतीत सामावून घेण्यात येत असल्यामुळे ते तिच्याविरुद्ध बोलत नाहीत. औपचारिक शिक्षणपद्धतीचा अवास्तव भर माध्यमिक आणि उच्च शिक्षणावर असतो. एकूण शैक्षणिक खर्चापैकी साठ टक्के खर्च याच शिक्षणावर केला जातो. या शिक्षणपद्धतीचा खरा लाभ श्रीमंत आणि सुखवस्तू वर्गांनाच होतो. एकूण लोकसंख्येत या वर्गाची संख्या फक्त तीस टक्के असताना, माध्यमिक शाळांमधील सत्तर टक्के जागा आणि विद्यापीठ शिक्षणातील ऐंशी टक्के जागा मात्र या वर्गांनीच व्यापलेल्या असतात. शिवाय ही शिक्षणपद्धती राष्ट्रीय गरजा आणि आकांक्षा यांच्याशी पुरेशी निगडित झालेली नाही. ती कमालीची अकार्यक्षम असून तिच्यात पैशाचा बराच अपव्यय होतो. उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात तर ती निर्हेतुकही झालेली आहे. देशातील शैक्षणिक परिस्थिती दरवर्षी ढासळत चाललेली असल्यामुळे तिच्यात सुधारणा घडवून आणण्या-साठी व्यापक शैक्षणिक क्रांती घडवून आणल्याशिवाय गत्यंतर उरलेले नाही.

## २. नवी कार्यपद्धती

या शैक्षणिक क्रांतीची रूपरेषा अनेक समित्यांनी आणि आयोगांनी विशद केलेली असली आणि स्वातंत्र्यप्राप्ती-पासून या क्रांतीसंबंधी सतत बोलले जात असले, तरी आता-पर्यंत शिक्षणपद्धतीत फारच थोडे मूलभूत बदल करण्यात आलेले आहेत. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी येथे अमलात आणलेल्या पारंपरिक वसाहतवादी शिक्षणपद्धतीचा प्रचंड विस्तार करण्याचे कार्यच १९४७ पासून आतापर्यंत आपण पार पाडले

आहे. शैक्षणिक क्रांती घडवून आणण्यात आपल्याला जे अपयश आले त्याला सामाजिक संरचना, शैक्षणिक संरचना आणि जनआंदोलनाचा अभाव ही तीन कारणे आहेत. आतापर्यंतच्या अनुभवापासून शहाणपणा शिकून आपण आपली उद्दिष्टे साध्य करण्यासाठी खाली निर्देशित केल्याप्रमाणे तिहेरी कार्यपद्धती अनुसरली पाहिजे.

१. शिक्षणाचा अलगपणे विचार करताच येत नाही. समाजाची वैशिष्ट्ये शिक्षणात प्रतिबिंबित होत असतात. भारतीय समाज हा कमालीचा विघटित आणि विषम आहे. खरे म्हणजे दोन भिन्न गटात हा समाज चिरफाळला गेला आहे. लोकसंख्येमध्ये अवघे तीस टक्के प्रमाण असलेल्या श्रीमंत आणि सुखवस्तू वर्गाच्या हातात सारी आर्थिक आणि राजकीय सत्ता एकवटलेली आहे; याउलट बहुसंख्य जनता तुटपुंज्या उत्पन्नावर गुजराण करीत असून जीवनातील चांगल्या गोष्टी तिच्यापासून दूरच राहिलेल्या आहेत. शिक्षणपद्धतीने या 'द्विस्तरीय' समाजरचनेचेच अनुकरण केले आहे. चांगली सामाजिक आणि आर्थिक पार्श्वभूमी लाभलेल्या थोड्या व्यक्तींना या पद्धतीमुळे बरेचसे 'चांगले' शिक्षण मिळते. (याचा अर्थ असा की, शिक्षणामुळे त्यांना उच्चभ्रू समाजामध्ये प्रवेश मिळतो.) बहुसंख्य जनतेला मात्र निकृष्ट प्रतीचे आणि तेही थोडेसेच शिक्षण मिळते. अनेकांना तर मुळीच शिक्षण लाभू शकत नाही. या अशा विषम समाजरचनेमध्ये शिक्षण समाजधिष्ठित करणे अशक्य आहे. म्हणून समाजातील दारिद्र्य आणि विषमता कमी करीत असतानाच सर्व लोकांना चांगले शिक्षण मिळेल असा प्रयत्न करायला हवा. शैक्षणिक परिवर्तनाचे कार्यक्रम सामाजिक आणि आर्थिक परिवर्तनाच्या पूरक कार्यक्रमांबरोबरच अंगीकारावयास हवेत. या कार्यक्रमांचे परिणाम येत्या दहा वर्षांच्या आत दिसून यायला हवेत, असे उद्दिष्ट डोळ्यापुढे ठेवून त्यांची निर्धारपूर्वक आणि सुनियोजित कार्यवाही झाली पाहिजे.

२. आपल्याला जर खरोखरच अर्थपूर्ण प्रगती करावयाची असेल तर औपचारिक शिक्षणपद्धतीच्या सध्याच्या संरचनेमध्ये मूलभूत बदल केलेच पाहिजेत. सहकार्याने आणि समूहभावनेने कार्य करण्याची वृत्ती, बौद्धिक आणि शारीरिक श्रमांची परस्परपोषकता, कौशल्याचा विकास आणि चारित्र्यनिर्मिती या सामाजिक उद्दिष्टांचा पुरस्कार करणारी मूल्यपद्धती शिक्षणाने विकसित केली पाहिजे. अध्यापनाऐवजी अध्ययनावर भर हवा; पूर्णवेळेचे, अंश वेळेचे आणि सोयीच्या वेळेचे या तिन्ही अध्ययनप्रणालींना समान स्थान आणि दर्जा मिळाला पाहिजे. शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना वेगवेगळ्या इयत्तांमध्ये प्रवेश घेण्याची मुभा असायला हवी; अभ्यासक्रमाची निवड, आशय आणि कालावधी यात पुरेशी लवचिकता असली पाहिजे. आणि शिक्षणप्रसारासाठी सर्व सामाजिक यंत्रणांचा आणि सर्व अध्यापनसामग्रीचा वापर करावयास हवा. शिक्षणाच्या आशयातही मूलगामी बदल घडवून आणण्याची गरज आहे. तसेच त्याला विद्यमान सामाजिक परिस्थितीचा संदर्भही लाभला पाहिजे. बौद्धिक आणि शारीरिक श्रमांची संलग्नता, विकासाशी शिक्षणाचा अनुबंध, संस्कृती, विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्यावर भर, लोकशाही, सर्वधर्मसमभाव आणि समाजवाद या मूल्यांची जोपासना इत्यादी मार्गांनी हे बदल साध्य होऊ शकतील. शिक्षणाचा दर्जा सर्व पातळ्यांवर सुधारला पाहिजे आणि संपूर्ण शिक्षणपद्धती लवचिक, विविधस्वरूपी, कार्यक्षम आणि गतिशील करावयास हवी. तसे झाल्यास शासकीय शिक्षणखात्यांना, शाळांना आणि शिक्षकांना नवनवे प्रयोग करायला प्रोत्साहन मिळेल. मात्र नवनिर्मिती करताना मूलभूत राष्ट्रीय संकल्पना आणि सिद्धांत यांच्याशी ती संबंधित राहील याची दक्षता घेतली पाहिजे.

३. जनआंदोलनांचा पाठिंबा लाभल्याशिवाय अशा तऱ्हेचे मूलगामी सामाजिक आणि शैक्षणिक परिवर्तन घडून येणार नाही. गरीब लोकांचे दैनंदिन प्रश्न सोडविण्यासाठी आणि त्यांना किमान जीवनमान लाभण्यासाठी अशा आंदोलनाची नितांत आवश्यकता आहे. (गरिबांनी आपल्या हक्कांसाठी लढावे याकरिता त्यांच्यात जागृती आणि संघटना घडवून आणली पाहिजे.) हे कार्य मूलतः राजकीय आहे हे खरे आहे, परंतु शिक्षण राजकारणापासून अलिप्त राहूच शकत नाही. अशा तऱ्हेचे जनआंदोलन उभे राहिले तर ते नव्या शैक्षणिक कार्यक्रमांच्या कार्यवाहीला निश्चितच उपयुक्त ठरेल त्याचप्रमाणे शैक्षणिक परिवर्तनाच्या महान प्रयत्नांचा जनआंदोलनालाही लाभ होऊ शकेल.

**३. प्रमुख कार्यक्रम**

आपल्याला आवश्यक असलेले शैक्षणिक परिवर्तन घडवून आणण्यासाठी जे प्रमुख कार्यक्रम विकसित करायला हवेत त्यांची रूपरेषा खालीलप्रमाणे आहे :

**१. प्रौढशिक्षण**

प्रौढशिक्षणाच्या कार्यक्रमाला सर्वात अधिक प्राधान्य








मिळाले पाहिजे. या शिक्षणाला खर्च कमी येतो आणि त्याचे परिणाम लवकर आणि भरपूर दिसून येतात. प्रौढशिक्षणाच्या कार्यक्रमात १५-२१ या वयोगटातील शाळेत न जाणाऱ्या तरुणांच्या शिक्षणावर सर्वाधिक भर द्यावयास हवा. आम्ही कोणी तरी आहोत ही आत्माभिमानाची जाणीव गरिबांमध्ये निर्माण करणे हाच प्रौढशिक्षणाचा प्रधान हेतू आहे. त्यांच्यात ही जाणीव निर्माण झाली की ते आपले अधिकार बजावू शकतील आणि भय, उपासमार आणि परावलंबन यांपासून आपण स्वतंत्र होऊ शकतो हेही त्यांना जाणवू लागेल. स्थानिक परिस्थिती आणि शिकणाऱ्यांच्या गरजा नि हितसंबंध यांच्याशी प्रौढशिक्षणाचा आशय निगडित असला पाहिजे. प्रौढ-शिक्षणात साक्षरतेला महत्त्व असले तरी तेवढ्यापुरतीच ती मर्यादित राहता कामा नये. प्रौढशिक्षणाचा विशाल आणि राष्ट्रव्यापी कार्यक्रम हाती घेऊन त्यासाठी शालेय पद्धतीमधील आणि त्या पद्धतीबाहेरचीही सर्व साधनसामुग्री पूर्णपणे वापरण्यात आली पाहिजे.

**२. सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण**

प्राथमिक शिक्षण (६-१४ वयोगट) सार्वत्रिक करावयास हवे. त्यासाठी येत्या पाच-दहा वर्षांमध्ये सघन आणि सतत प्रयत्न केले पाहिजेत. मुली आणि गरीब मुले यांना या शिक्षणात दाखल करून घेण्यावर विशेष भर दिला पाहिजे. वेगवेगळ्या इयत्तांत प्रवेश देण्याची पद्धत अंगीकारली पाहिजे. ज्यांना पूर्णवेळच्या शाळेत जाणे शक्य नाही अशा सर्व मुलां-साठी शिक्षणाची सोय व्हावयास हवी. प्राथमिक शिक्षणाचा आशयही पूर्णपणे बदलला पाहिजे. मुख्य म्हणजे या शिक्षणात उत्पादक कार्य आणि समाजसेवा यांचा अंतर्भाव व्हावयास हवा. तसेच शिक्षणाचा आशय भोवतालच्या परिस्थितीशी संबंधित असला पाहिजे. आपण शाळेत जावे आणि शिकत राहावे असे मुलांना वाटण्यासाठी शिक्षणाचा दर्जा सुधारावयास हवा. या कार्यक्रमांचे (आणि त्याचबरोबर प्रौढशिक्षणाचेही) प्रशासन पूर्णतया विकेंद्रित केले पाहिजे. प्रत्येक मुलावर कराव्या लागणाऱ्या खर्चात कपात व्हावयास हवी. ज्या राज्यांमध्ये शाळेत न जाणाऱ्या मुलांची संख्या बरीच आहे आणि ज्यांच्यापाशी पुरेसा पैसा नाही अशा राज्यांना विशेष साहाय्य केले पाहिजे. समान दर्जाच्या शाळांची पद्धत सर्वत्र अनुसरावयास हवी.

**३. माध्यमिक शिक्षण**

प्राथमिकोत्तर शिक्षणाचा विकास करताना पुढील सूत्रे ध्यानात ठेवावयास हवीत.

क) माध्यमिक शिक्षण हा प्रत्येकाचा अधिकार नव्हे.

ख) एखाद्या व्यक्तीने किती शिक्षण घ्यावे याबाबत कोणताही निर्बंध नसला तरी हे शिक्षण घेणाऱ्यांनी शासकीय साहाय्याची अपेक्षा करता कामा नये. जे विद्यार्थी सामाजिक आणि आर्थिकदृष्ट्या दुर्बळ वर्गातील आहेत त्यांनाच माध्यमिक शिक्षणासाठी शासकीय निधीतून साहाय्य केले जावे.

ग) आतापर्यंत प्राथमिकोत्तर शिक्षण ही मुख्यत: श्रीमंत आणि सुखवस्तू वर्गाचीच मिरासदारी झालेली असल्यामुळे, गरीब मुलांना माध्यमिक आणि उच्च शिक्षण घेता यावे यासाठी विशेष प्रयत्न करण्याची जरुरी आहे. त्यासाठी शुल्कमाफी, शिष्यवृत्त्या, वैयक्तिक मार्गदर्शन आदी उपाय योजता येतील. तसेच अनुसूचित जाती-जमातींना सध्या ज्या सवलती आहेत त्या सामाजिक आणि आर्थिकदृष्ट्या मागास अवस्थेत असलेल्या सर्व व्यक्तींना मिळावयास हव्यात. त्या बाबतीत जात, धर्म वा लिंग यावरून कोणताही भेद केला जाता कामा नये.

घ) विशेष म्हणजे दुर्बळ घटकांमधील बुद्धिमान मुले निवडून काढण्यासाठी देशव्यापी आणि सघन प्रयत्न करायला हवा. शासनाने या मुलांचे पालकत्व स्वीकारून त्यांना हवे असेल ते शिक्षण घेण्यासंबंधी मदत केली पाहिजे.

च) प्राथमिकोत्तर शिक्षणात शुल्कासंबंधी दुहेरी पद्धत असावी. गरीब मुलांना शिक्षण हे पूर्णतया मोफत मिळाले पाहिजे, तर सुखवस्तू वर्गातील पालकांना आपापल्या ऐपतीनुसार मुलांसाठी शुल्क द्यावे लागले पाहिजे.

छ) विद्यानिकेतनसारख्या (पब्लिक स्कूल) स्वतंत्र शाळा शक्यतोवर रद्द केल्या पाहिजेत. तसे करणे ताबडतोब शक्य होणार नसेल तर त्या शाळांनी आपल्या एकूण जागांपैकी पन्नास टक्के जागा सामाजिक आणि आर्थिकदृष्ट्या दुर्बळ असलेल्या वर्गातील मुलांसाठी राखून ठेवल्या पाहिजेत, असे त्यांच्यावर बंधन घालावे.

ज) शासकीय पाठिंब्यावर वा मदतीवर चालणाऱ्या पूर्णवेळच्या सर्व उच्च माध्यमिक शाळांमधील आणि महाविद्यालयांमधील प्रवेश निवडक पद्धतीने देण्यात यावा. अशा शिक्षण-संस्थांमधील उपलब्ध जागांपेक्षा अर्जदारांची संख्या अधिक असेल तर प्रवेशपात्र विद्यार्थ्यांसाठी काही निकष निश्चित केले जावेत. मात्र दुर्बळ घटकांतील विद्यार्थ्यांसाठी

काही जागा राखून ठेवण्यात याव्यात. विद्यार्थ्यांच्या चाचणीचा दर्जाही सुधारला पाहिजे.

झ) प्राथमिकोत्तर शिक्षणातील सर्व परीक्षांना बसण्याची खाजगी उमेदवारांना परवानगी असली पाहिजे. त्यासाठी सर्व भाषांमध्ये पत्रद्वारा अभ्यासक्रमाच्या सोयी उपलब्ध करून दिल्या पाहिजेत.

ट) महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी सध्या होत असलेली गर्दी कमी करण्याच्या दृष्टीने उपाय योजले पाहिजेत. त्याचा परिणाम पदवी आणि नोकरी यांचा संबंध तोडण्यात झाला पाहिजे.

ठ) नव्या शिक्षणसंस्था स्थापन करण्याची प्रवृत्ती मर्यादित केली पाहिजे. नव्या शिक्षणसंस्था कोठे काढायच्या याचा काळजीपूर्वक विचार करावयास हवा. एखाद्या विभागाची गरज, विशिष्ट दर्जा अशी ग्वाही आणि साधनसामग्रीची उपलब्धी या गोष्टी नव्या शिक्षणसंस्था स्थापन करताना ध्यानात घेतल्या पाहिजेत.

ड) विद्यमान शिक्षणसंस्था आणि अभ्यासक्रम यांची शक्य तेवढी पुनर्रचना केली पाहिजे. सहकारी अध्यापन आणि उपलब्ध साधनसामग्रीचा समान वापर या गोष्टींना प्रोत्साहन द्यावयास हवे.

**४. उच्च माध्यमिक शिक्षण**

माध्यमिक शिक्षणाची गुणवत्ता बऱ्याच प्रमाणात वाढण्याची आणि त्याच्या आशयात मूलभूत बदल करण्याची अत्यंत गरज आहे. प्राथमिक शिक्षणानंतर तसेच दहावीनंतर आणि बारावीनंतर तांत्रिक शिक्षणाचे अभ्यासक्रम सुरू करण्याच्या प्रश्नाकडे तातडीने लक्ष दिले गेले पाहिजे. तांत्रिक शिक्षणासाठी नंतर निवड किंवा निर्णय करण्याची पद्धत अंमलात आली पाहिजे. त्याचप्रमाणे उद्योगधंद्यांवर आधारित तांत्रिक शिक्षण देण्याची सोय व्हावयास हवी.

**५. विद्यापीठीय शिक्षण आणि संशोधन**

अध्यापन, संशोधन आणि विस्तार यांचे एकात्मिक कार्यक्रम सुरू करण्यामध्ये आणि त्यांना समान दर्जा देण्यामध्ये विद्यापीठे आणि महाविद्यालये यांनी पुढाकार घेतला पाहिजे. महाविद्यालयीन अभ्यासक्रमांची पुनर्रचना करून त्यांचा दर्जा उंचावण्यात आला पाहिजे. संलग्न महाविद्यालयांना अनुदान द्यावयाच्या पद्धतीत आणि तिच्या राज्यपातळीवरील प्रशासकीय यंत्रणेत बरीच सुधारणा करायला वाव आहे. पदव्युत्तर पातळीवरच्या शिक्षणातही सुधारणा अपेक्षित आहे. पदव्युत्तर अध्यापनाची गुणवत्ता वाढणे आवश्यक असून मूलभूत आणि उपयोजित संशोधनास चालना द्यावयास हवी. विद्यार्थ्यांची वाढती संख्या आणि बदलत्या गरजा यांच्याशी सुसंवादी ठरेल अशा पद्धतीने उच्च शिक्षणाची विविधस्वरूपी संरचना केली पाहिजे. नवीन आंतरविद्याशास्त्रीय क्षेत्रे लक्षात घेऊन अभ्यासक्रमात विविधता यावयास हवी. विद्यार्थ्यांना विषयांची निवड करायला अधिक वाव असला पाहिजे. सत्र पद्धतीचा स्वीकार करायला हवा. संपूर्ण विद्यापीठ पद्धतीचे विकेंद्रीकरण करण्यात आले पाहिजे. विद्यापीठांकडून विद्यापीठीय विभागांकडे आणि महाविद्यालयांकडे आणि त्यांच्याकडून शिक्षण आणि विद्यार्थी यांच्याकडे स्वायत्तता संक्रमित झाली पाहिजे. (शासनाने या स्वायत्ततेचा आदर राखला पाहिजे. आणि समाजाचे वस्तुनिष्ठ मूल्यमापन करण्यासाठी शिक्षण-शास्त्रज्ञांनी या स्वायत्ततेचा वाढता वापर केला पाहिजे.) विद्यापीठीय शिक्षण सध्या अतिशय निर्हेतूक झालेले असून ही परिस्थिती बदलण्यासाठी आणि राष्ट्रीय गरजा नि आकांक्षा यांच्याशी उच्च शिक्षण निगडित करण्यासाठी कठोर राजकीय निर्णय आणि निर्धारी कृती करण्याची गरज आहे.

**६. भाषाविषयक राष्ट्रीय धोरण**

भाषाविषयक राष्ट्रीय धोरण निश्चित करून ते निग्रहपूर्वक कार्यवाहीत आणले पाहिजे. भारतीय भाषांचा आणखी विकास करून महाविद्यालयीन शिक्षणातही त्यांचा माध्यम म्हणून वापर करावयास हवा. तसे केल्याने इंग्रजीचा चांगला अभ्यास करण्याची गरज कमी होण्याऐवजी वाढेल. इंग्रजी शिकविण्यासाठी लवचिक, आधुनिक पद्धती अवलंबल्या पाहिजेत. एकंदरीने भाषाविषयक धोरण काळजीपूर्वक हाताळले पाहिजे. हिंदीचा विकास आणि प्रसार करण्याची गरज असली तरी केंद्रीय कारभारात आणि राष्ट्रीय पातळीवर हिंदीबरोबर इंग्रजीही दीर्घकाळ चालू राहील हे मान्य करावयास हवे.

**७. प्रशासन**

शिक्षणामध्ये सर्व समाज सहभागी झालेला असतो. सर्व व्यक्ती आणि सर्व सामाजिक संस्था शिक्षणाशी संबंधित असतात. म्हणून वेगवेगळ्या पातळीवरील शिक्षणसंस्थांनी स्वतंत्रपणे कार्य करीत बसण्याऐवजी एकत्र येऊन परस्पर सहकार्याचा कार्यक्रम अंगीकारला पाहिजे. भारतासारख्या

# ज्ञानाच्या जागतिकीकरणाच्या स्वरुपासंबंधीचे सत्यशोधन

## डॉ० अशोक केळकर

### परिचय : ग० प्र० प्रधान

गेल्या काही वर्षांमध्ये जगातील अर्थव्यवस्थेचे जागतिकीकरण होत आहे. काही जणांच्या मते ते झालेले आहे. विसाव्या शतकाच्या विनाशकारक शस्त्रास्त्रांचे स्वरुप आमूलाग्र बदलल्यानंतर राष्ट्रांच्या सीमांना अर्थ उरलेला नाही. जगात कोठेही होणारे उत्पादन आता अन्यत्र सहज उपलब्ध होऊ लागले आहे. दूरदर्शन या माध्यमामुळे आणि गेल्या काही वर्षांत माहिती-तंत्रज्ञानात जे क्रांतिकारक बदल झालेले आहेत, त्यांच्यामुळे आधुनिक जगातील माणसांची जीवनशैली बदलली असून सांस्कृतिक देवाण-घेवाण आता सुलभतेने होऊ लागली आहे. या मूलभूत बदलांचा परिणाम वेगवेगळ्या मानव समूहांच्यावर वेगवेगळा होत आहे. या परिणामांचे स्वरुप आज तरी फार गुंतागुंतीचे आहे. या संदर्भात ज्ञानाच्या जागतिकीकरणाला सामोरे कसे जावे, यासंबंधी विचारवंतांनी वेगवेगळी मते मांडली आहेत. याविषयी डॉ. अशोक केळकर यांनी 'इंडियन फिलॉसॉफिकल क्वार्टर्ली' या त्रैमासिकात जो निबंध लिहिला आहे, त्यातील विचारांचा सुलभ रीतीने परिचय करुन देण्याचा मी या लेखात प्रयत्न करणार आहे.

जगामध्ये उत्पादन साधनांची तसेच उपभोगाच्या वस्तूंची मालकी वेगवेगळ्या व्यक्तींच्याकडे वा संस्थेकडे असू शकते. परंतु जगातील ज्ञानावर, कलांवर सर्व मानव जातीचा हक्क आहे असे आपण मानत होतो. एकोणिसाव्या शतकापर्यंत प्रत्यक्षात जरी काही शाखांतील ज्ञान काही जणांनाच उपलब्ध असले, अगर लोककला एखाद्या प्रदेशापुरत्या वा लोक समुदायापुरत्याच मर्यादित असल्या, तरी त्या ज्ञानावर आणि कलांवर कोणाचीही मालकी असण्याचे कारण नाही; जीवन संपन्न करणारे ज्ञान व कला या सर्वांच्या आहेत; सर्वांच्या असल्या पाहिजेत, असे सर्वसाधारणपणे मानले जात होते. डॉ. केळकर यांनी असे त्यांच्या निबंधाच्या सुरुवातीस म्हटले आहे की, विविध स्वरुपाच्या ज्ञानपद्धतींचा योग्य रीतीने मेळ कसा घालावा, या समस्येला मानवी संस्कृतीच्या वाटचालीत आज आपण प्रथमच सामोरे जात आहोत. या पूर्वी माणसांच्या विविध प्रकारच्या श्रद्धांचा मेळ कसा घालावा ही समस्या मानवी समाजाने काही प्रमाणात हाताळली होती. या श्रद्धांचे स्वरुपही दोन वेगवेगळ्या तऱ्हेचे होते. एका बाजूला अनेक धर्म होते आणि दुसरीकडे ईश्वरनिष्ठ धर्मापेक्षा वेगळा आशय असलेला बौद्ध धर्म, कन्फ्युशिअसने सांगितलेल्या सत्याच्या स्वरुपाची विविधता मान्य करणारा सहिष्णू धर्म, मार्क्सचा द्वंद्वात्मक ऐतिहासिक भौतिकवाद अशा सेक्युलर विचारधारा होत्या, इस्लामच्या एकेश्वरी भूमिकेमुळे त्या धर्माच्या श्रद्धेपासून थोडेही विचलित होणे म्हणजे परमेश्वराशीच द्रोह आहे, ते पाखंड आहे, असे मानले जात होते. मार्क्सवादी वैचारिक शुद्धतेपासून बाजूला जाणे हा प्रमादच मानला जाई. याच्याविरुद्ध असलेला प्रवाह हा जैन धर्मामधील अनेकांत वाद, स्याद् वाद हा होता. त्यांच्यामध्ये ज्ञान हे बहुविध असल्यामुळे व्यक्तींच्या वेगवेगळ्या भूमिका असू शकतात, अशी बौद्धिक अहिंसावादी भूमिका घेतलेली होती. याचेच थोडे वेगळे स्वरुप युरोपातील बौद्धिक प्रगल्भतेतील सहिष्णुतेत व्यक्त होत होते. काही काळानंतर जगातील निरनिराळ्या भाषांतून व्यक्त झालेल्या सांस्कृतिक बहुविधतेची जाणीव झाल्यावर युरोपमधील विचारवंत तुलनात्मक पद्धतीचा वापर करु लागले. प्रथम वनस्पतीशास्त्र, प्राणीशास्त्र, व्युत्पत्तीशास्त्र यांच्यामध्ये या तुलनात्मक पद्धतीचा अवलंब करुन नंतर ती धर्म, साहित्य, कला यांच्या बाबतीत आणि अखेरीस तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातही अवलंबिली गेली. मात्र हे करताना नैसर्गिक बहुविधतेपासून आपण वैचारिक व बौद्धिक बहुविधतेकडे जात आहोत याची संपूर्ण जाणीव युरोपिअन समाजास झालेली नव्हती. अगदी अलिकडच्या काळापर्यंत विविध शाखांतील समाजात उपलब्ध असलेले बहुविध स्वरुपाचे ज्ञान खोलवर हाताळण्याचा अनुभव मानवाला आलेला नव्हता. एक संस्कृती दुसऱ्या संस्कृतीतील उपयुक्त वाटणाऱ्या गोष्टी सहजपणे स्वीकारीत होती. नंतर मात्र राजकीय क्षेत्रात विजयी झालेली आणि आर्थिक क्षेत्रात वरचढ झालेली युरोपिअन राष्ट्रे सर्वच क्षेत्रांमध्ये आक्रमक व अहंकारी बनली. 'जगातील काळ्या लोकांना सुधारणे हे गोऱ्या माणसावर येऊन पडलेले ओझे

अनुक्रमणिका






आहे,' अशा उद्धट भूमिकेतून ही आक्रमकता व्यक्त होऊ लागली. युरोपातील शास्त्रीय ज्ञान व तत्त्वज्ञान हेच श्रेष्ठ ज्ञान आहे, असे युरोपिअन राष्ट्रे मानू लागली. अन्य देशांतील भिन्न संस्कृती हीदेखील मानवी जीवन संपन्न करणारी आहे, याचे भानही साम्राज्यवादी युरोपिअन राष्ट्रांना उरले नाही. दुसऱ्या महायुद्धानंतर राजकीय क्षेत्रातील त्यांचे वर्चस्व संपले आणि साम्राज्ये विलयाला गेली. तरी आर्थिकदृष्ट्या संपन्न असल्यामुळे आणि विनाशकारी शस्त्रांची मालकी असल्यामुळे उत्तरेकडील अमेरिका आणि युरोप खंडातील सधन देश आशिया आणि आफ्रिका खंडातील विकसनशील आणि अविकसित देशांकडे, आपल्या पक्क्या मालाची बाजारपेठ आणि स्वस्त मजुरी उपलब्ध असलेले देश म्हणून तुच्छतेने पाहत होते व आजही पाहत असतात. ही उत्तर-दक्षिणेतील सधन आणि निर्धनतेतील दरी ज्ञानाच्या क्षेत्रातही आहे आणि असली पाहिजे असे अमेरिका आणि अन्य सधन युरोपिअन देश मानत असतात. आर्थिक साम्राज्यवादाचा आणि तंत्रज्ञानाच्या क्षेत्रातील सामर्थ्याचा अहंकार ज्ञानाच्या क्षेत्रातही उन्मत्तपणे होत असतो. याला एक सन्माननीय अपवाद म्हणून डॉ० केळकर यांनी 'बॉहट्लिंघ' या भाषाशास्त्रज्ञाचा उल्लेख केला आहे. त्यांनी सायबेरियातील भाषेचे विश्लेषण करताना पाणिनीची रीत आदर्श म्हणून स्वीकारली होती. अमेरिका आणि युरोपातील सधन राष्ट्रांच्या या बौद्धिक आक्रमकतेची प्रतिक्रिया म्हणजे दक्षिणेकडील काही देश या उत्तरेकडील राष्ट्रांमध्ये उपलब्ध असलेल्या ज्ञानाकडे शोषणाचे एक भीषण साधन म्हणून तरी पाहू लागली; अगर काही राष्ट्रांनी या आधुनिक ज्ञानाबद्दल कमालीची अनास्था तरी दाखवली. ज्ञानाच्या क्षेत्रातील सधन राष्ट्रांतील व गरीब देशांतील या दोनही प्रवृत्ती अनिष्ट आहेत. या दोन्ही टोकाच्या चुकीच्या भूमिका सोडून आजच्या जगातील ज्ञानवंतांच्या पिढीने विविध ज्ञानशाखांमधील वेगवेगळ्या ज्ञानाच्या पद्धती योग्य रितीने कशा हाताळावयाच्या याची आखणी करणे आवश्यक आहे, असे डॉ० अशोक केळकर यांचे प्रतिपादन आहे. डॉ० केळकर यांच्या मते जगातील ज्ञानवंतांनी यासाठी पुढील तीन गोष्टी केल्या पाहिजेत. १. वेगवेगळ्या ज्ञानशाखांचे स्वरूप नीट समजून घेणे, २. ज्ञानशाखांतील विविधता आणि परस्पर-पूरकता यांतील फरक समजून घेणे, ३. ज्ञानक्षेत्रातील बहुविध ज्ञानाची नीट आखणी करून त्याच्या साहाय्याने जाणतेपणाने, प्रगल्भपणे वाटचाल कशी करता येईल आणि मानवाला श्रेयस कसे मिळेल ते पाहणे. ही प्रक्रिया आजवर थोडीफार सुरूच आहे. या प्रक्रियेच्या अंतिम टप्प्याकडे जग जात आहे, याकडे डॉ० अशोक केळकर यांनी लक्ष वेधले आहे.

ज्ञान आणि श्रद्धा ही दोन क्षेत्रे भिन्न असली तरी त्यांना एकमेकांपासून अलग करणे मात्र शक्य नाही. श्रद्धेच्या क्षेत्रात बहुविधता स्वीकारलेली असते, तरीदेखील इतरांना आपली श्रद्धा मान्य होईल अशी आशा श्रद्धावानांना वाटत असते. ज्ञानाच्या क्षेत्रात मात्र अधिकाधिक काटेकोरपणा यावा आणि विविधतेच्या नावाखाली वाढणारा विस्कळीतपणा संपावा हीच मुख्य प्रवृत्ती आढळून येते. या दोन क्षेत्रांमध्ये अशी भिन्नता असूनही ज्ञान विकसित करण्याच्या वेगवेगळ्या प्रवृत्ती आणि वेगवेगळ्या समाजांच्या विविध श्रद्धा यांच्या एकीकरणातूनच मानवाचा जीवनविषयक दृष्टिकोन घडत असतो हे आपण लक्षात ठेवले पाहिजे, असे डॉ० केळकर यांनी स्पष्टपणे सांगितले आहे.

ज्ञानाचे विश्लेषण करून त्याची सुसूत्र मांडणी करता येते. विविध ज्ञानशाखांतील वेगवेगळ्या पद्धतींचे आलोचन आणि विश्लेषण केल्यानंतर आजच्या काळासाठी कोणती भूमिका घेणे योग्य ठरेल, याचे विवेचन करताना डॉ० अशोक केळकर यांनी पुढील तीन पद्धतींचा उल्लेख केला आहे.

१. अनाग्रही - अराजकवादी - यामध्ये हवा तितका लवचिकपणा असतो.

२. अत्याग्रही - एकांतिकवादी - यामध्ये लवचिकपणा यत्किंचितही नसतो.

३. मिताग्रही - सापेक्षतावादी - ही पद्धती मध्यममार्गी आहे. त्यामुळे संयमपूर्ण नेमस्त प्रवृत्तीची वाढ होते.

मुख्य समस्या आज जे ज्ञान उपलब्ध आहे, त्यातून समाजाला उपकारक ठरेल अशी पद्धती निर्माण करून तिचा स्वीकार कसा करावयाचा आणि योग्य दिशेने वाटचाल कशी सुरू करावयाची याचा निर्णय घेण्याबाबतची आहे.

### भाग दोन

#### तत्त्वज्ञांची जबाबदारी

तत्त्वज्ञान ही सर्वश्रेष्ठ ज्ञानशाखा आहे. आज जगात जे प्रचंड ज्ञान उपलब्ध आहे, ते एकत्र करून आणि ज्या विविध श्रद्धापद्धती वेगवेगळे मानवसमूह पवित्र मानतात त्यांच्यातील










संघर्ष टाळून मानवी जीवन सुखी, समाधानी आणि संपन्न कसे करावे याचा मार्ग, तत्त्वज्ञानाचा दीर्घकाळ व्यासंग केलेल्या ज्ञानवंतांनीच शोधून काढला पाहिजे. डॉ० अशोक केळकर यांनी हा मार्ग कसा शोधावा लागेल याचे उदाहरण म्हणून भारतातील पारंपरिक मानसशास्त्र आणि सध्याचे युरोपातील मानसशास्त्र या दोन ज्ञानशाखांचे सूक्ष्म व मूलग्राही विश्लेषण केले आहे. भारतीय मानसशास्त्रामध्ये मानवी मनाच्या सृजनशीलतेचा विचार करताना प्रज्ञा आणि प्रतिभा या संकल्पना मांडण्यात आल्या, ही वैशिष्ट्यपूर्ण कामगिरी होती असे डॉ० केळकर यांनी सांगितले आहे. त्याचप्रमाणे युरोपमधील मानसशास्त्रज्ञांनी अनुवंशिक ज्ञान आणि संपादित ज्ञान यांतील फरक तसेच व्यक्तीने मिळवलेले ज्ञान आणि समाजाने आत्मसात केलेले ज्ञान यांमधील फरक स्पष्टपणे मांडला आहे, हीदेखील वैशिष्ट्यपूर्ण कामगिरी आहे असे डॉ० अशोक केळकर यांनी लिहिले आहे.

या प्रदीर्घ विवेचनाच्या शेवटी डॉ० केळकर स्पष्टपणे लिहितात, 'खऱ्याखुऱ्या जागतिक ज्ञानपद्धतीकडे जाणे याचा अर्थ पाश्चात्य ज्ञानपद्धती हीच जागतिक ज्ञानपद्धती आहे, असा टेंभा युरोपिअन राष्ट्रांनी मिरवणे हा खासच नाही.' निबंधाच्या शेवटच्या भागाला डॉ० अशोक केळकर यांनी 'ज्ञानाच्या खऱ्याखुऱ्या जागतिकीकरणाकडे' (Towards a true globalisation of knowledge) असे सुयोग्य शीर्षक दिले आहे.

सुरुवातीस डॉ० अशोक केळकर यांनी सांगितले आहे की, आपले आजचे पहिले उद्दिष्ट हे ज्ञानशाखांच्या विविधतेचे स्वरूप, राजकीय, सामाजिक, वांशिक आदींच्या संदर्भात समजून घेऊन त्या ज्ञानाची आजच्या काळाला अनुरुप अशी मांडणी करणे हे आहे. परंतु आपले अंतिम उद्दिष्ट यापेक्षा व्यापक आहे, असे सांगून डॉ० केळकर यांनी लिहिले आहे की, आपले अंतिम साध्य म्हणजे जागतिकीकरणाच्या व्यापक प्रवाहात जागतिक ज्ञानपद्धती अस्तित्वात यावी हे असून त्यासाठी आवश्यक असलेला प्रकल्प जगातील ज्ञानवंतांनी विशेषत: तत्त्वज्ञांनी हाती घेतला पाहिजे. सुरुवातीस अशा प्रकल्पाची शक्यता किती आहे हेही अजमावून पाहिले पाहिजे, असे डॉ० केळकर यांना वाटते.

ज्ञानाच्या खऱ्याखुऱ्या जागतिकीकरणाच्या प्रक्रियेत केवळ वस्तुस्थिती निदर्शक सत्ये आणि ज्ञान मिळवण्याची कौशल्ये यांचे एकत्रीकरण करुन चालणार नाही. या प्रक्रियेतून मानवी जीवनाचे सम्यक स्वरुप ज्यांच्यामुळे समजते असे सूक्ष्म खोलवरचे ज्ञान आणि सत्यशोधनाच्या प्रवृत्ती यांना एकत्र आणले गेले पाहिजे, हे डॉ० केळकर यांनी स्पष्टपणे सांगितले आहे. अशा प्रयत्नांची सुरुवात एका बाजूला जोसेफ नीडहॅम यांच्या Science and Civilization in China या ग्रंथातून आणि दुसऱ्या बाजूला जॉन हॉफमन यांच्या Encyclopaedia mundarica या ग्रंथातून झाली आहे, असे डॉ० केळकर यांनी सांगितले आहे. युरोपिअन राष्ट्रांकडे चिकित्सक दृष्टीने पाहणाऱ्या अन्य देशांतील ज्ञानोपासकांनीही असे कार्य केले पाहिजे हे सांगून डॉ० अशोक केळकरांनी स्पष्टपणे लिहिले आहे की, भारतात 'सेंटर फॉर युरोपिअन स्टडीज्' सुरु करणे अत्यावश्यक आहे. सर्व देशांतील ज्ञानोपासकांनी परस्परांच्या देशांतील संस्कृतीच्या संदर्भातील महत्त्वपूर्ण ग्रंथांची भाषांतरे करणे, वेगवेगळ्या ज्ञानपद्धतींचा तौलनिक अभ्यास करणे अशी कामे सतत केली पाहिजेत. अशा प्रयत्नांतूनच ज्ञानाच्या जागतिकीकरणासाठी आवश्यक असलेला प्रकल्प एका शतकात साध्य होऊ शकेल. असा प्रकल्प निर्माण करण्याच्या प्रक्रियेत ज्ञाननिर्मितीचा उद्योग हळूहळू विकेंद्रित होऊ लागेल. आज युरोपिअन देशांमध्ये या ज्ञानाच्या उद्योगात जे प्रचंड भांडवल गुंतवून केंद्रीकरण करण्यात आले, त्याच्याऐवजी वेगवेगळ्या देशांमध्ये ते सुरु करून या प्रकल्पांमध्ये तरुण ज्ञानोपासकांना अधिकाधिक वाव दिला पाहिजे. त्यानंतरच त्याचे स्वरूप अधिक मानवी बनेल, असे डॉ० केळकर यांनी सांगितले आहे. ज्ञानाच्या पद्धतीच्या विविधतेचे आकलन होण्यासाठी विविध श्रद्धा, पद्धती आणि वेगवेगळ्या जीवनशैली यांच्या संदर्भात या ज्ञानपद्धतींचा सांगोपांग विचार करावा लागेल आणि तो करताना व्यक्ती, समाज आणि संस्कृती यांचे भिन्नत्व हेही लक्षात घ्यावे लागेल असे डॉ० केळकर यांचे प्रतिपादन आहे. विविधतेमुळे जीवन अधिक रंगतदार आणि लज्जतदार होते; इतकेच केवळ न मानता विविधता हे जीवनातील महत्त्वाचे मूल्य आहे हे लक्षात ठेवणे जरूरीचे आहे असे डॉ० केळकरांनी सांगितले असून वेगवेगळे मानवसमूह आपल्या भोवतालच्या परिसराशी आणि समाजाशी जुळवून घेताना वेगवेगळी जीवनशैली स्वीकारत असतात याकडेही लक्ष वेधले आहे. या संदर्भात त्यांनी लिहिलेला पुढील परिच्छेद मला फार महत्त्वाचा

वाटतो.

"योगदर्शन हा एक भारतीय धारणाव्यूह आहे - चित्तवृत्तीनिरोधापासून समनाधिरूप भेदविलोपनात परिणत होणारा आदर्शक्रम आणि ज्यात एक कार्यक्रमही आहे - शरीराचे आणि चित्ताचे आणि या दोन्हींना जोडू पाहणाऱ्या प्राणाचे निरनिराळ्या प्रकारे संचालन करण्याचा कार्यक्रम. समाजवाद, अधिक नेमकेपणानं सांगायचे तर लोकशाही समाजवाद हा एक युरोपीय धारणाव्यूह आहे. ज्यात एक आदर्शक्रम आहे, तो पुढीलप्रमाणे - प्रत्येकाकडून त्याच्या कुवतीनुसार समाजाच्या संपत्तीत भर आणि प्रत्येकाकडे त्याच्या गरजेनुसार समाजाच्या संपत्तीचा वाटा. या धारणाव्यूहात एक कार्यक्रमही आहे, ज्यानुसार काही लोकांनी आपल्या गरजेपेक्षा कितीतरी जास्त वाटा घेण्याचे थांबवले तर कुणालाही गरजेपेक्षा कितीतरी कमी वाट्यावर भागविण्याची वेळ येणार नाही. त्याचबरोबर काही लोकांनी आपल्या कुवतीपेक्षा कितीतरी कमी काम करावयाचे थांबवून योग्य तितके काम केले तर कोणावरही कुवतीपेक्षा अधिक काम लादले जाणार नाही. जागतिकीकरणाच्या संथ चालीत हे दोन धारणाव्यूह त्या त्या संस्कृतिविशिष्टतेपलीकडे गेले. बौद्धांच्यामार्फत योगदर्शनातले महत्त्वाचे अंश पूर्ण आशियाभर गेले आणि भारतीय योगशिक्षकांमार्फत काही अंश युरोपीय संस्कृतीत फैलावले; त्याचप्रमाणे लोकशाही समाजवादाचे काही अंश जगाच्या इतर भागांतही गेले. भारतीय संस्कृतीत काहींनी गांधीवादी समाजवाद आणि हिंदू समाजवाद हे संकर जन्माला घातले पण ते कार्यक्रमाच्या अभावी कागदावर राहिले."

केळकरांनी भारतातील आयुर्वेद हा ज्ञानव्यूह आणि डार्विनोत्तर जैविकी हा ज्ञानव्यूह हेही असेच आपापल्या देशाच्या वा खंडाच्या सीमा ओलांडून जगातील अन्य काही भागांत गेले हे दाखविले आहे. केळकरांच्या मते वरील दोन धारणाव्यूह आणि योग व लोकशाही समाजवाद हे दोन ज्ञानव्यूह जगभर जावयास हवे होते. परंतु मानवजात हळूहळू विविधता स्वीकारीत असली तरी त्या मार्गात अनेक अडथळे आहेत हेही डॉ० केळकर यांनी दाखविले आहे.

ज्ञानाच्या जागतिकीकरणाचा आशय मानवी (ह्युमेन) असला पाहिजे हे सांगून, तत्त्वज्ञांना या कार्यामध्ये महत्त्वाची भूमिका घेऊन मोठी जबाबदारी पार पाडावी लागेल असे मत डॉ० केळकर यांनी मांडले. या महत्त्वाच्या निबंधाचा आशय पुढीलप्रमाणे आहे - "ज्ञानाचे जागतिकीकरण हवे का ? हो ! मात्र त्याचे स्वरूप पाश्चात्त्यांच्या ज्ञानाच्या क्षेत्रातील वसाहतवाद असे असून कधीही चालणार नाही." मूळ इंग्रजी वाक्य पुढीलप्रमाणे आहे. "टू समअप् ग्लोबलायझेशन ? येस ! युरोपिअन रीलोकलायझेशन ? नो !"

(डॉ० अशोक केळकर यांचा लेख 'इंडियन फिलॉसॉफिकल' क्वार्टर्ली एप्रिल-जुलै जोडअंक २००२ मध्ये आहे. डॉ० अशोक केळकर यांचा विस्तृत मराठी लेख 'आजचा सुधारक' फेब्रुवारी २००६ मध्ये प्रसिद्ध झाला आहे.)

(डॉ० अशोक केळकर यांच्या मांडणीचा परिचय ग० प्र० प्रधान यांनी करून दिला आहे. साधना, ३१ डिसेंबर २००५)

☑ ☑ ☑

If you are planning for a year plant grain, if you are planning for a generation plant trees, and if you are planning for a century plant men.

- an old saying.

This is the challenge before the Indian Educationists and the Indian Educational system for the 21st century.

अनुक्रमणिका

# शैक्षणिक गुणवत्तेसाठी

## प्रा० लीला पाटील

एकतीस मार्च २००७ च्या टाइम्स ऑफ इंडियात डॉ. नारळीकरांचं Memory plus शीर्षकाचं एक टिपण प्रसिद्ध झालं होतं. ते शिकत असताना पायथागोरसच्या सिद्धांताची मांडणी त्यांनी वेगळ्या प्रकारे केली होती. त्यांच्या शिक्षकांनी तो मांडणीचा प्रकार पुस्तकातील मांडणीप्रमाणं नसूनही त्यांना पूर्ण गुण दिले होते. मात्र 'परीक्षेत पुस्तकाप्रमाणेच लिही' असा सावध इशारा द्यायला ते विसरले नाहीत! ही आठवण मांडून डॉ. नारळीकरांनी आजच्या शिक्षणव्यवस्थेबाबतचे समीक्षण केलं आहे. ते म्हणतात, "Our educational system remains fundamentally unchanged more than a millenium after Adi Sankara. Great deal of emphasis is laid on rote learning. The teacher giving the answers to be memorised for reproduction in the exams. Original thought is not encouraged. One who has mastered all the tricks wins, regardless of how well he has understood the subject and its wider significance in the overall scheme of what we today call knowledge ... we need exam that tests the understanding of a human being; not the memory of a parrot."

डॉ. नारळीकर या अनुभवातून आपल्याला सांगत आहेत, की शिक्षणामुळं विद्यार्थ्यांना आयुष्यभर शिकत राहण्याची प्रेरणा (motivation) मिळायला हवी. ही प्रेरणा म्हणजे काय बरं? कुणीतरी विशिष्ट इयत्तेत आवश्यक मानला गेलेला आशय ठाकून ठोकून विद्यार्थ्यांच्या डोक्यात बसविण्याच्या प्रयत्नांना शरण जाऊन ते सारं स्मरणबद्ध केलं जाणं, म्हणजे शिक्षण नव्हे. शाळेत शिकणाऱ्या जयंत नारळीकर नावाच्या मुलानं पायथागोरसचा सिद्धांत वेगळ्या पद्धतीनं मांडून विद्यार्थी हा पुस्तकात लिहिलेल्या किंवा शिक्षकांनी शिकवलेल्या आशयाचा केवळ ग्राहक (consumer) नसून तो prosumer (producer+ consumer) निर्मितीग्राहक असतो, असं दाखवून दिलं. नारळीकर या शालेय विद्यार्थ्याला गुणग्राहक शिक्षक लाभल्यामुळं त्यांनी त्याला पूर्ण गुण देऊन शाबासकीही दिली, तरी शिक्षण व्यवस्थेच्या सत्तेपुढं परीक्षेपुरतं का होईना स्वतःची निर्मिती बाजूला ठेवून त्याला चाकोरीतूनच चालावं लागेल, हा व्यावहारिक सल्लाही दिला!

'प्रोझ्युमर' हा नवा शब्द वापरताना त्याची अर्थकक्षा समजून घेणं उपयुक्त ठरेल. या शब्दाबाबतचं इंटरनेटवर मिळालेलं टिपण वाचूया.

### फक्त ग्राहक का निर्मिती ग्राहक?

The word prosumer is becoming fairly common. It was coined in 1980 by the futurist Alwin Toffler in his book 'The Third wave' as a blend of producer and consumer. He used it to decribe a possible future type of consumer who sould become involved in the design and manufacture of products, so they could be made to individual specifications.

आजचं आपलं शिक्षण फी न देता मिळणारं आहे हे सत्य मानलं तरी ते 'free' विमुक्त शिक्षण नाही. आज संस्थापक, मुख्याध्यापक, शिक्षक, पालक हे सारेच 'शिक्षण' नावाच्या मालाची जी तयार पाकिटं मिळतात ती स्वीकारणारे ग्राहक आहेत. ते जेव्हा prosumers होतील तेव्हा खऱ्या अर्थी शिक्षणात स्वातंत्र्याचा वावर सुरु होईल.

गुणवत्ता म्हणजे काय याचा समग्र व सखोल विचार करण्यापूर्वी आपण काही विद्धानांची अवतरणं वाचूया. 1. Poor student performance is symptomatic of a deeper malaise... Educational researchers must enter into partnership with teachers and students, with curriculam developers and school management to become a part of a

sustained effort to change the way student learn and the way teachers teach them - Beena Choksi. 2. Good education is not delivered. It is imbibed and created - Prof. Yashpal. 3. देशातील लोकांच्या क्षमतांचा अपुरा विकास म्हणजे दारिद्र्य - डॉ. अमर्त्य सेन.

या तीन व्यक्तींचे शैक्षणिक गुणवत्तेच्या संबंधातील विचार आपल्याला स्पष्ट होण्यासाठी शिक्षणाच्या शिडीवरील पहिली पायरी - प्राथमिक शिक्षण त्याबाबतचे एक उदाहरण समजून घेऊ या.

इयत्ता चौथीपर्यंत मुलांना वाक्यरचना करता येते, हे गृहीतक असतं. महाराष्ट्रात याबाबतची गुणवत्ता कोणत्या प्रकारची आहे यासंबंधी वर्तमानपत्रात अनेक बातम्या झळकतात. इयत्ता पाचवीत पोचणाऱ्या मुलांपैकी एक-सप्तमांश मुलांना लिहिता येत नाही. या वास्तवामुळं शैक्षणिक गुणवत्तेसाठी शिक्षणमंत्र्यांनी लेखन-वाचन हमी प्रकल्पाची योजना राबवली. नेहमीच्या शासकीय शिरस्त्यानुसार त्या योजनेचा लेखाजोखा जनतेपर्यंत पोचलेला नाही! परंतु, वर्षभर शिक्षकांनी लिहिण्याच्या क्षमता विकासासाठी काम केल्यावर जर बहुसंख्य मुलांना पुरेशी अक्षरओळखच नसेल आणि केवळ पुस्तकातील वाक्यच आहेत तशी पुन्हा उतरवण्यापर्यंतच त्यांची मजल पोचली असेल, तर शाळेचे नेहमीचे सर्व तास पूर्ण केल्यावर पुन्हा त्याच वर्गखोलीत बसून त्याच शिक्षकाकडून लिहिणं-शिकण्याच्या त्याच वाटांवर चालण्यामुळे काय होईल?

**वाक्यरचनेत एवढं काय असतं?**

परंतु, काही शाळांतील शिक्षक मुलं लिहिती व्हावीत म्हणून प्रयत्न करत असतात. वाक्यरचनेच्या बाबतीत असाच एक प्रयत्न आपण समजून घेऊ. त्या शाळेच्या प्रश्नपत्रिकेत पुढील दोन प्रश्न होते. १. कोणतेही वाक्य करण्यासाठी कोणकोणत्या अटी असू शकतात हे तू शिकला आहेस. तुला माहिती असलेल्या जास्तीतजास्त अटी लिही. २. वाक्यरचनेसाठी कोणत्याही चार अटी तूच निवड. त्या लिही आणि त्याप्रमाणं तू तयार केलेली वाक्यं लिही. त्या इयत्तेतील बहुसंख्य मुलांनी सात-आठ अटी लिहिल्या आणि त्यांपैकी चार-पाच स्वीकारून स्वत: केलेले/केलेली वाक्य/वाक्ये लिहिली. एका मुलानं इयत्ता चौथीच्या मानानं खूपच अवघड अशा अटी लिहिल्या होत्या. वाक्यरचनेबद्दलचा हा प्रश्नप्रकार अनेक प्राथमिक शिक्षकांनाही फार अवघड वाटतो, असं गेल्या वर्षी कोल्हापूर व पुणे इथं जी दोन अध्ययन-अध्यापनाबाबतची कृतिसत्रं घेतली, त्यात दिसून आलं. खासगी शाळांतील अनेक मुलांना प्रश्नच समजला नाही. असं का व्हावं? का झालं असेल? आपण ते समजून घेऊया.

१. वाक्यरचनेसंबंधी कोणकोणत्या बाबतीत अटी असू शकतात याची ओळख व जाणीव झालेली नसणं. उदाहरणार्थ वाक्य लिहिताना भाववाचक नाम, सामान्यनाम, विशेषनाम, विशेषणाचे विविध प्रकार व त्यापैकी वाक्यात कोणता प्रकार हवा याचा उल्लेख, सर्वनामाचा वापर हवा की नको याची नोंद. लिंग, वचन यासंबंधी अपेक्षा. शब्दाची अक्षरसंख्या, शब्दलेखनात ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार यांचा उपयोग, शब्दात कोणते अक्षर कोणत्या स्थानी अपेक्षित आहे याची नोंद - अशा कितीतरी बाबी अटींचे रूप घेऊन प्रश्नात येतात. या साऱ्यांची जाणीव नसल्यानेच हा प्रश्नप्रकार अनेकांना अवघड वाटणे स्वाभाविक आहे. २. अटी स्वीकारून वाक्य तयार करण्याचा सराव नसल्यानं तशी वाक्यरचना करणे जमत नाही. ३. विद्यार्थीही शिक्षकाला अटी घालून वाक्य करायला सांगतात. या आनंददायक अनुभवाचा लाभ झालेला नसणे. ४. अटी स्वीकारून वाक्य तयार करण्यात अधिक मजा/एक प्रकारचा चॅलेंज याचा न घेतलेला आस्वाद. ५. अटीत सामावलेला व्याकरणविषयक तपशील वेगवेगळ्या खेळांच्या माध्यमांतून विद्यार्थ्यांना खोलवर झिरपलेला नसणं. ६. अटी स्वीकारण्याचा सराव न झाल्यामुळं त्याबद्दल भीती/दडपण नाहीसं झालेलं नसणं. ७. अटी लक्षात घेऊन विचार करण्याची, शब्द धुंडाळण्याची, सर्व अटींची पूर्तता आहे की नाही यावर लक्ष ठेवण्याची सवय अंगवळणी पडलेली नसणे. ८. क्रमिक पुस्तकात अपेक्षित नसलेला हा भाग शिकणं हाही भाषाशिक्षणाचाच मजेशीर भाग आहे, असा अनुभव नसल्याने स्वतःचे पालक, शाळेत येणारे पाहुणे, शाळेतील इतर इयत्तांना शिकवणारे शिक्षक - या साऱ्यांवर प्रयोगाचा भडिमार करता करता मुलांना आत्मविश्वास व आत्मसन्मान मिळालेला नसतो. ९. विद्यार्थ्यांचे उत्कृष्टापर्यंत पोचण्याचे प्रयत्न झालेले नसल्याने उत्कृष्ट कामाला विशेष मान्यता मिळते याचा अनुभव मिळालेला नसतो. १०. शिक्षकांकडून सामान्यपणे जे








अपेक्षिलं जात नाही ते काही लोकांकडून केलं जातं, तसं करायला प्रतिबंध नसतो आणि सातत्यानं तसं काही करत राहण्यानं शिक्षकाला स्वतःला असं प्रत्ययास आलेलं नसतं.

अध्यापनाच्या वेगळ्या पद्धती सापडू शकतात.

११. अशा अनवट वाटांवरही मुले आनंदाने, आत्मविश्वासाने चालू शकतील याचा अनुभव नसल्याने तोच तो ... चघळण्यात आयुष्य जाते.

एका प्राथमिक शाळेत वाक्यरचनेबाबतचे झालेलं काम आपण समजून घेतलं. तसं पाहिलं तर ते फार काही असामान्य आहे असं नाही. तरीही वाक्यरचनेबाबत जी सर्वसामान्य गुणवत्ता अपेक्षित आहे त्यापेक्षा वरील कामाची उंची व सखोलता निश्चितच जास्त आहे. ज्या शिक्षकानं हे काम केलं त्याची शैक्षणिक भूक सामान्यापलीकडची असल्याने त्याच्याकडून ही धडपड झाली. त्याची ही प्रेरणा म्हणजे शिक्षणव्यवस्थेनं दिलेली देन नसून त्याच्या आंतरिक ऊर्मीचा तो परिणाम आहे. या साऱ्या कामाचं उगमस्थान शिक्षकांची आंतरिक प्रेरणा (motivation) हे आहे. शिक्षणसंस्थेला शिक्षकांमधील अशा प्रकारच्या ऊर्मीची व त्यांचा शालेय विद्यार्थ्यांवर होणाऱ्या सकारात्मक परिणामांची निकड भासली असती तर उत्कृष्ठापर्यंत पोचण्याचा आग्रह कमाल क्षमतांच्या यादीत निदान अग्रक्रमानं नोंदला गेला असता. 'किमान-समान' च्या तृप्तीची साय पुस्तकांत धरली नसती! राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखड्यामध्ये (२००५) गुणवत्तेला अडसर ठरणाऱ्या काही बाबींची नोंद आहे. आपण ती वाचू.

## आजची 'व्यवस्था'च अडसर!

१. शालेय व्यवस्थेमध्ये कोणत्याही बदलाला विरोध करणारी अंगभूत ताठरता आली आहे.

२. जीवनाच्या इतर अंगांपासून शिक्षण तुटलं आहे.

३. मुलांनी आपलं ज्ञान स्वतःच्या जीवनाशी, अनुभवांशी जैव आणि अर्थपूर्ण रीतीनं जोडावं यासाठी पोषक असं अध्यापन त्यांना लाभत नाही व ते करण्यासाठी प्रोत्साहनही मुलांना शिक्षक, पालक, समाज यांच्यामार्फत मिळत नाही.

४. मुलांतील सर्जनशीलता व विचक्षणता मारली जाईल असंच सर्वसाधारण शालेय संचालन, अध्यापन व परीक्षा यांचं स्वरूप असतं.

५. ज्ञानार्जनासाठी आवश्यक असणाऱ्या ज्ञान निर्मितीच्या क्षमतांपासून आजच्या ज्ञान निर्माणात वापरल्या जाणाऱ्या प्रक्रिया अनेक योजनं दूर आहेत.

६. मुलांच्या शिक्षणाचा केंद्रबिंदू वस्तुतः 'वर्तमान' हाच असायला हवा. पण आज त्यांचं भविष्य मध्यवर्ती मानून आपण शिक्षणाची आखणी करत आहोत.

ज्या सहा नोंदी आपण वाचल्या, त्या गुणवत्तेसाठी आवश्यक असणारी प्रेरणा (motivation) निर्माण होण्यास अपायकारक ठरतात. एक नेहमीचं उदाहरण देऊन मुद्दा स्पष्ट करूया. तुम्हाला माहीतच आहे की क्षितीज ही एक काल्पनिक संकल्पना आहे. क्षितिजापर्यंत पोचायचं असं ठरवून माणूस चालत राहिला तर त्याची वाटचाल संपणारच नाही. गुणवत्ता ही जरी काल्पनिक संकल्पना नसली तरी त्या दिशेनं होणारी वाटचाल जणू कधी संपतच नाही! १. मान्य झालेली उद्दिष्टं आणि त्या पलीकडची उद्दिष्टं. २. सर्वांसाठी किमान क्षमता आणि काही जणांसाठी अधिक उंचीवरच्या/अधिक सखोल किंवा अधिक व्याप्तीच्या क्षमता. ३. गुणवत्तेसाठी आवश्यक असणारी किमान भौतिक साधनं आणि गुणवत्तापूर्ण संपादनासाठी आवश्यक असणारी भौतिक व मानवी साधनं ४. गुणवत्तेचं मूल्यमापन करण्याची रूढ मूल्यमापनसाधनं आणि फार खर्चिक नसलेली/थोड्या प्रयत्नांनी साध्य होऊ शकणारी मानवी व भौतिक साधनं - इत्यादी सर्व बाबींची जाण मात्र गुणवत्तापूर्ण काम करू इच्छिणाऱ्या व्यक्तीला असावी लागते. प्रयत्नांची दिशा, उद्दिष्टप्राप्तीपर्यंत पोचणारे विभिन्न मार्ग, वाटचालीत येणाऱ्या अनेकविध अडचणी यांचा विचार करूनच गुणवत्तेच्या वाटेवर पावलं टाकावी लागतात. विचारपूर्वक केलेला अंदाज प्रत्यक्षात खरा ठरला, तर कदाचित थोडाफार मानसन्मान अन्यथा भरपूर हेटाळणी आपल्या वाट्याला येणार याची पूर्वकल्पना ठेवूनच अवघड वाटचाल करावी लागते.

## सात थेंब की तीन थेंब

यासंदर्भात एक उदाहरण पाहू. जॉन डी. रॉकफेलर यांनी रॉकेलच्या डब्याला सील करताना इतरांप्रमाणं सात थेंब झिंक वापरलं नाही. फक्त तीन-चार थेंब पुरेसे होतील आणि झिंकचा अपव्यय टळेल असा अंदाज सांगितला. इतरांकडून

होणारी थोडीफार अवहेलना सहन करत त्यांनी तीन थेंब झिंक वापरून उत्कृष्ट सील करून दाखवलं. प्रत्यक्षाच्या निकषावर अंदाज खरा ठरलेला पाहून इतरांनी त्यांचं अनुकरण केलं. परिणामी कंपनीला लाखो रुपयांचा फायदा झाला. तीन थेंबांची ही उर्मी जॉन रॉकफेलर यांच्या मनातच जन्मली. वास्तवाबद्दलच्या असमाधानातून हिची निर्मिती झाली. नेहमीपेक्षा वेगळं काही करून दाखवण्याचं धैर्य त्या ऊर्मीमुळं मिळावं आणि प्रथमत: ती अनवट वाट म्हणजे गुणवत्तेची कमाल असली तरी नंतरच्या काळात ती नित्याचीच वाट झाली. 'सी गल' नावाची जानाथन यांची जी कादंबरी आहे, त्यात पक्ष्याची आई पिल्लाला म्हणते, "Don't you forget that the reason to fly is to eat." आईला मूल उत्तर देतं, "I just want to know what I can do in the air and what I can't. That's all." पक्षिणीची चिंता आपल्या पिल्लाचं कसं होणार अशी, तर पिल्लाची इच्छा आपल्याला कितपत व कुठवर उंच उडता येतं हे जाणण्याची. त्यात आकाशात वेगवेगळ्या उंचीवर उडण्याचे जे प्रयत्न केले त्यास मोटिव्हेशन त्याच्या जातीच्या इतर पक्ष्यांच्या नेहमीच्या उडण्याच्या उंचीतून मिळालं नाही; ते त्याच्या हृदयातून स्फुरलेलं होतं.

शिक्षण क्षेत्रातील मान्यताप्राप्त वाट सोडून दुसऱ्याच वाटेनं जाऊ इच्छिणाऱ्या मंडळींना/संस्थांना पुढील प्रकारच्या मनस्तापांना सामोरं जावं लागते. १. 'मोठे आलेत शिक्षणतज्ज्ञ!' यासारखी हेटाळणी. २. आवश्यक सहकार्याऐवजी प्रयत्नांना खोडा घालण्यासाठी होणारे डावपेच. ३. आपण जे करीत आहोत त्याला सर्वसाधारण अनुकूल वातावरण नसल्यामुळं त्याबाबत वरिष्ठांना करावे लागणारे खुलासे. ४. शिक्षणव्यवस्था, संस्थाचालक, सहकारी शिक्षक, पालक यांचा मिळणारा अपुरा पाठिंबा, अशा विविध ताणतणावांना तोंड देत आपल्या श्रद्धांवर अढळ राहणं वाटतं तितकं सोपं नसलं, तरी ज्यांच्या मनात गुणवत्तापूर्ण शिक्षणाची ऊर्मी उसळली आहे, ती मंडळी स्वतःचा आशावाद जागवत त्या वाटेवर चालताना दिसतात. त्यामुळे पुढील ओळी किती सार्थ आहेत हे लक्षात येतं.

अंधाराच्या पार्श्वभूमीवरचे
प्रकाशाचे हे ठिपक
कधी ना कधी वाढत जातील...
आणि, ते एकमेकांत मिसळून
सारं चित्र पालटेल!

अंधार नको, प्रकाश हवा ही स्वतःच्या हृदयाची आस, त्यामुळं करून पाहिले जाणारे विविधांगी प्रयत्न, त्या प्रयत्नांचा सखोल विचार करून विचारात व आचारात करावे लागणारे बदल या साऱ्या प्रयत्नांना संबंधितांकडून मिळणारा प्रतिसाद, त्यामुळे जागवली जाणारी अधिक प्रयत्नांची उमेद असा हा विकासाचा अखंड फिरता फेरा घुमत राहिल्यानंच कोणत्याही क्षेत्रात जे नाही पण असणे जरूर आहे ते 'का नाही?' असे प्रश्नांकित होते. राजेंद्रसिंहांनी पाणीप्रश्नावर शोधलेले तोडगे आज स्तुत्य मानले गेले असले, तरी त्यांना 'पाण्याची ती कळ' सापडण्यासाठी अशाच फिरत्या फेऱ्यांतून जावं लागलं आहे. आज हॉकिंग्ज अंतराळात जाऊन जे करू पाहत आहेत तेही असामान्यत्वाच्या भुकेमुळेच! नाकासमोर पाहून चालावं आणि अंथरूण पाहून पाय पसरावे, असे उपदेश ऐकत राहिलो तर 'ठेविले अनंते तैसेची रहावे' असं मानून आजचे स्वरूप बदलून 'नवा उद्या' घडण्याचे प्रयत्न कोणाकडूनच होणार नाहीत. 'कुणी उंचीवर, कुणी भूमीवर। आनंद-शिक्षण सर्वांखातर' असा ठाम विश्वास बाळगून ज्या त्या पातळीवर असणाऱ्या विद्यार्थ्यांनाही त्यांचं त्यांचं क्षितिज खुणावत रहायला हवे आणि शिक्षणानं त्यासाठी विभिन्न प्रयत्न करत रहायला हवे.

☑ ☑ ☑

प्रा० लीला पाटील यांचे या क्षेत्रातील प्रयोगात्मक कार्य, लगन, चिंतन, लेखन, शासन व समाज यांच्या प्रबोधनासाठी प्रयत्न आदर्श आहेत.

- देवदत्त दाभोलकर

पुढील दोन पृष्ठावरील चौकटीही पाहाव्यात.








अनुक्रमणिका

## योजनांचा धो-धो पाऊस

शासनामार्फत अलीकडील काळात प्राथमिक शिक्षणासाठी ज्या योजना मांडल्या गेल्या/अमलात आल्या, त्यांचा झोत प्राथमिक शिक्षणाचा प्रसार व प्राथमिक शिक्षणाची गुणवत्ता या दोन मुद्द्यांवर दिसतो. मुलं हजेरीपटावर दाखल होणं, हा प्रसाराचा एक भाग. त्यासाठी शाळायोग्य वयोगटातील मुलांची पाहणी/सर्वेक्षण होणं हा भाग पुनःपुन्हा झालेला कागदोपत्री तरी दिसतो. त्याचा दुसरा भाग म्हणजे मुलं शाळेत येत राहणं. हजेरीपटावरची मुलं प्रत्यक्ष हजर असणं, त्यासाठी मूल शाळेत आलं नाही तर पालकांना दंड करावा, या सूचनेपासून मुलांना शाळेत यावसं वाटावं म्हणून शाळेच्या पहिल्या दिवशी त्यांना वाजत-गाजत शाळेत आणावं, त्यांना ओवाळावं व पेढा द्यावा, अशा योजनांपर्यंत आपला प्रवास झाला आहे ! याशिवाय दारिद्र्यरेषेखालील समाजाच्या आर्थिक गरजा लक्षात घेऊन पोषण आहार, उपस्थिती भत्ता अशा अनेक योजना जाहीर झाल्या. शिक्षणाच्या गुणवत्ता विकासासाठी अध्यापन प्रक्रियेत बदल घडावा म्हणून क्रमिक पुस्तकांपासून शिक्षण प्रशिक्षणापर्यंत काही नवे उपाय योजले गेले. आपण एका तक्त्याकडे नजर टाकून त्यातून हे सारं थोडक्यात समजून घेऊ.

### शैक्षणिक गुणवत्ता कशी वाढेल?

| प्रसारासाठी | शिक्षणासाठी संस्था व यंत्रणा उभारणी | गुणवत्ता विकास |
|---|---|---|
| १. सर्वेक्षणं<br>२. एका किलोमीटरच्या आत प्राथमिक शाळा असणं.<br>३. शाळेबाहेरील मुलांसाठी सेतू शाळा, वस्ती शाळा, संधी शाळा, साखर शाळा, आश्रमशाळा स्थापना.<br>४. एकशिक्षकी शाळांचे द्विशिक्षकी शाळांत रुपांतर.<br>५. शाळेच्या पहिल्या दिवशी सवाद्य मिरवणुकीनं मुलांना आणून त्यांना ओवाळणं.<br>६. मोफत पुस्तकवाटप.<br>७. मोफत पादत्राण वाटणं.<br>८.मुलांना उपस्थिती भत्ता.<br>९. सावित्रीबाई फुले दत्तकपालक योजना.<br>१०. मोफत गणवेश. | १. राज्य पातळीवर Deep, Peep या संस्थांची स्थापना.<br>२. राज्य पातळीवर प्राथमिक शिक्षणासाठी शिक्षण संचालक-पदाची निर्मिती.<br>३. जिल्हा पातळीवर प्राथमिक शिक्षण अधिकारी.<br>४. राज्य पातळीवर सर्व शिक्षा अभियान स्थापना.<br>५. केंद्रशाळा निर्मिती.<br>६. केंद्राधिकारी नेमणुका.<br>७. गटशाळा विकास अधिकारी नेमणुका.<br>८. षट्कोनी शाळा इमारतींची बांधणी. | १. आनंददायी बालकेंद्रित शिक्षण.<br>२. क्षमताधिष्ठित अभ्यासक्रम.<br>३. शिक्षकांची प्रशिक्षणं.<br>४. शिक्षकांची मासिक गटसंमेलनं.<br>५. ओझ्याविना शिक्षणयोजना.<br>६. पहिलीपासून इंग्रजी आवश्यक.<br>७. चौथीची शिष्यवृत्ती परीक्षा सर्वांना आवश्यक.<br>८. पहिली ते सातवीपर्यंत परीक्षा नको.<br>९. वर्षभरात सतरा परीक्षा हव्यात.<br>१०. लेखन-वाचन हमी प्रकल्प.<br>११. आकर्षक क्रमिक पुस्तकंय<br>१२. कौंन्टिन्जन्सी ग्रँट मुख्याध्यापकाच्या आखत्यारीत.<br>१३. मूल्यशिक्षण आवश्यक.<br>१४ मोफत अभ्यासपुस्तक. |

भारताच्या महालेखापालांनी (कॅग) सर्वांसाठी शिक्षण या युनेस्कोच्या अहवालासाठी जी माहिती दिली आहे, ती आपण पाहू.

१. २००१ ते २००५ दरम्यान अभियानासाठी दिलेली ८६% रक्कम खर्च होऊनही उद्दिष्टे साध्य करण्यात अपयश.

२. अकरा राज्यांत (यांत महाराष्ट्राचाही समावेश आहे.) ९९.१८ कोटी रुपये योजनाबाह्य बाबींवर खर्च.

३. इतर चौदा राज्ये व केंद्रशासित प्रदेशामध्येही ४७२.५१ कोटी रुपये योजनाबाह्य बाबींवर खर्च.

४. सर्व शिक्षा अभियान योजनेत शिक्षकांचे पगार व दुपारचे जेवण या योजनेअंतर्गत नसलेल्या बाबींवर १५.८० कोटी खर्च.

५. गुजरातमध्ये योजनाबाह्य बाबींवर २२.६६ कोटी रुपये खर्च झाले असून, कौन्सिल ऑफ एज्युकेशन रिसर्च अँड ट्रेनिंग सेंटरच्या इमारतीसाठी चार लाख खर्च केले गेले आहेत.

६. ज्या शाळा अस्तित्वात नाहीत, त्यांच्यासाठी निधीची तरतूद केलेली दिसते.

७. पाठ्यपुस्तके, वर्गशिक्षक व शैक्षणिक साहित्य यांची मुख्यत्वेकरुन कमतरता जाणवते.

८. इ.स. २००१ ते २००५ पर्यंत सर्वशिक्षा अभियान योजनेवर एकूण ११,१३३.५७ कोटी खर्च होऊनही भारतात ६ ते १४ वयोगटातील ४०% आणि एकूण १.३६ कोटी मुले अद्याप शाळाबाह्य आहेत.

अनुक्रमणिका

## गळक्या पिंपात पाणी भरणं

ज्या रीतीनं गेली काही वर्षं आपण गुणवत्तापूर्ण शिक्षणाची घोषणा देऊन विविध योजना मांडत आलो आहोत, त्यांकडे पाहिले की देशाचा दीर्घकालीन विकास घडविणाऱ्या आजच्या पिढीसाठी काही पायाभूत विचारांवर आधारित योजना मांडत आहोत का, असा प्रश्न पडतो. शिक्षणाचं सार्वत्रिकीकरण आणि गुणवत्ता या दोन्ही बाबींची वाटचाल हातात हात घालूनच व्हायला हवी, या विचारावर आपली ठाम श्रद्धा आहे का, अशी साशंकता वाटू लागते. आपल्यासमोर उभ्या असणाऱ्या समस्यांचा समग्र व सखोल अभ्यास करून, समस्येशी संबंधित असणाऱ्या महत्त्वाच्या घटकांचा, विचारांचा आणि वास्तवाचा मागोवा घेऊन सर्वांची सामुदायिक जबाबदारी या दृष्टीनं योजना तयार होतात का, असं आमच्यासारख्या सामान्य नागरिकांना वाटू लागतं. लैंगिक शिक्षण, शेती यांसारख्या विषयांचा अंतर्भाव अभ्यासक्रमात करणं, ही बाब आज जाहीर करायची आणि उद्या मागं घ्यायची, इतकी क्षुल्लक आहे का? जागतिकीकरणाच्या गतीशी जुळवून घेण्यासाठी पहिलीपासून इंग्रजी आवश्यक विषय म्हणून सुरु करताना या आदेशाची कागदी पानं, शाळांसाठी इंग्रजी शिकवणारे शिक्षक निर्माण करु शकतात का, याचा विचार होत नसेल, तर कागदावरच्या योजना आणि योजनांचं वास्तवातलं स्वरुप यांतच महद् अंतर राहतं. बोलाची कढी, बोलाचा भात खाऊन तृप्तता कशी साधणार? शिक्षक वर्ग खोटी आकडेवारी सादर करतात, अशी जी तक्रार आहे, त्याच्या मुळाशी असणारी कारणं खोदून पाहायची नसतील, तर काय सोळा परीक्षा घेऊनही विद्यार्थ्यांची, शिक्षकांची अथवा शिक्षणव्यवस्थेची गुणवत्ता सिद्ध होणं अवघड आहे.

कृष्ण आणि सुदामा यांचे शिक्षण एकाच गुरुकुलात झालं. म्हणून सुदाम्याला कृष्ण भेटला. तसंच जागतिक पातळीवर शैक्षणिक गुणवत्तेवर युनेस्कोची २००६ मध्ये जी आंतरराष्ट्रीय गोलमेज परिषद झाली व गुणवत्तापूर्ण शिक्षण मानवी हक्क आहे, या विचारावर आधारित गुणवत्तेची जी मीमांसा झाली, ती आपण समजून घ्यायला हवी. जग हे ग्लोबल व्हिलेज असे म्हणतात, ते शिक्षणाबाबत लागू नाही का?

## प्रगत महाराष्ट्रातील शिक्षणचित्र

नऊ सप्टेंबर २००६ च्या साधना साप्ताहिकात वास्तवाचा धांडोळा घेऊन शैक्षणिक गुणवत्तेबाबत एक अभ्यासपूर्ण लेख प्रसिद्ध झाला आहे. भारत हा खेड्यांचा देश म्हणून ओळखला जातो. आदिवासी व ग्रामीण भागातील शैक्षणिक गुणवत्ता म्हणूनच अधिक महत्त्वाची, हा दृष्टिकोन ठेवून त्या लेखातील पुढील नोंदी वाचूया.

१. इयत्ता चौथी व सातवीच्या वर्गात चंद्रपूर जिल्ह्यात 'पावसाळ्यात आम्ही रेल्वेने प्रवास करतो' या वाक्यातील जोडाक्षरी शब्द मुलांना लिहिता आले नाहीत.

२. चौथीच्या मुलांनाही ५११-४९९ हे गणित येत नाही.

३. चौथीची मुलेही जोडाक्षरी शब्दांना अडखळतात आणि सातवीची मुलेही विरामचिन्हे लक्षात घेऊन वाचत नाहीत.

४. शिक्षकांच्या गुणवत्तेची काही उदाहरणे पहा - अ) ५११-४९९ = २२२. आ) 'फर्नांडिस' हा शब्द फरडणीस व 'धर्माधिकारी' हा शब्द 'धर्मधिकारी' असा लिहिला. पंधरा वर्षे नोकरी केलेला शिक्षक मेरी गो राऊंड याचा अर्थ 'मेरी नावाची मुलगी गरागरा फिरते' असा सांगतो.

५. मुलांच्या क्षमता विकसित होणे, ही जबाबदारी आपली, असे शिक्षक मानत नाहीत. फळ्यावर काहीतरी लिहून देतात व दिवसभर फक्त तेवढेच मुलांना गिरवायला सांगतात. दिवसभर मुले बेसूरपणे पाढे किंचाळत असतात व शिक्षक व्हरांड्यात उभे असतात!

डी.पी. : इ.पी. अंतर्गत व सर्वशिक्षा अभियानांतर्गत शिक्षकांना शैक्षणिक साधनांसाठी गेली तीन वर्षे ५०० रुपये दिले जातात, त्याचा विनियोग तपासला तर खोटी व्हाउचर्स मिळाली.

६. गणित शिकवताना शून्य ते नऊ अंकांना एकक म्हणतात, असे शिकवणारे शिक्षक आहेत. पण २५ या संख्येत दोनला दशक का म्हणायचं, हे मुलांना सांगता आले नाही.

७. शिक्षकांचा बोलण्याचा वेग प्रचंड असतो. देश, तुलना, घटक यांसारखे शब्द अर्थ स्पष्ट न करता वापरतात. 'कुरण' या शब्दाचा अर्थ 'गवत' असा सांगितला जातो.

८. चंद्रपूर नगर परिषदेतील शाळांना तीन वर्षे गणिताचे दर्जेदार प्रशिक्षण व गणितपेट्या दिल्या. पेट्या वापरलेल्या नाहीत. प्रशिक्षणाचा प्रत्यक्षात वापर नाही.

९. आदिवासी भागात बोली भाषांचा वापर घराघरांत होत असतो. शाळांत मराठी शिकवायचे असते. प्रत्येक शिक्षकाला स्थानिक बोली भाषा येतेच असे नाही. म्हणून युनिसेफमार्फत 'बोली भाषा व मराठी' असे शब्दकोश तयार करून ते शाळांमध्ये वाटले. पण शिक्षकांकडून वापर झाला नाही.

१०. याच लेखात गोंडी मुलांनाही इंग्रजी वाचायला शिकवणारे, मुलांमध्ये असून त्यांना शिकवणारे प्रामाणिक व तळमळीचे शिक्षक भेटल्याची नोंदही आहे.

वरील शिक्षणचित्र बदलण्यासाठी वर्गात तळमळीने शिकवावेच लागेल. शिक्षकांना ४०० रुपये रोज मिळत असूनही आपल्या व्यवसायाची बांधिलकी ते मानत नाहीत आणि ते चालवून घेतले जाते. या उघड गुपिताचा भेद लोकचळवळीतून झाला तरच 'पूरब से सूर्य उगा...' अशी भारताच्या साक्षरतेच प्रसन्न किरणं दाखवणारी दूरचित्रवाणीवरील जाहिरात थोडीफार अर्थपूर्ण ठरेल!

(साप्ताहिक सकाळ, १६ जून २००७)



अनुक्रमणिका

# Poona University-Teachers Survey

## Fifty Years Ago (1953)

D.A. Dabholkar, A.B. Shah

The fill title of the theme was -

A Study of Social, Economic and Educational problems of the Full-time College Teachers in Poona University Area.

It was conducted under the auspices of the Poona University Teachers' Association, Poona.

The forms were received mainly from the teachers working in non-technical colleges of Arts, Science, Commerce, Education and Law. The response from these colleges was merely 45 %.

**Some findings**

1. The average income from salary and allowances together was Rs. 3450/- per year.

2. Twenty teachers (out of 163) has earning mates.

3. The number of "other" dependents per family was nearly one.

4. Out of the total number of 169 teachers to possess a motor-car or a motor-cycle, 6 an electric fan, 20 a sofa-set, 26 a type writer, and 56 a radio-set. Even as regards a study only 84, that is, barely a half of the total, have a study for their own use. 91 teachers possess a bicycle, which is a common necessity.

5. 52 teachers had more than 100 books in their own subjects and 36 had more than 100 books in other subjects of their interests. 61 teachers had each a personal library worth Rs. 500 or more, and 28 had personal libraries worth Rs. 100 or less each.

6. Total work per week during Term-Time.

| Total Hrs. of Work per week | No. of Teachers |
|---|---|
| Up to 18 | 17 |
| 19 to 24 | 24 |
| 25 to 30 | 33 |
| 31 to 36 | 24 |
| 37 to 42 | 21 |
| 43 to 48 | 15 |
| 49 to 54 | 14 |
| 55 to 60 | 9 |
| above 60 | 12 |
| Total | 169 |

The total hours of work put in by the teachers per week are given in table No. 8 bellow. These figures include the time spent on lectures, tutorials, preparation for lectures, tutorial correction, laboratory or class attendance (The latter for B.T.), guiding

research students, administrative work of a regular or occasional nature, research work of one's own subject and reading in any other subject or subjects of one's interest. It does not, however, include the time compulsorily wastes between lectures (or in moving from one college to another in the case of teachers in Poona).

7. Q.No. 18 asked the teachers to state the minimum difference in salary for which they would be prepared to leave this profession. The following table provides information on the point.

Minimum Difference in Salary Per Month for Which Teachers Would Leave This Profession.

| Difference | No. of Teachers |
|---|---|
| 0 to 100 | 32 |
| 101 to 200 | 23 |
| 201 to 300 | 9 |
| 301 to 400 | 2 |
| 401 to 500 | 5 |
| Over 500 | 5 |
| Total | 76 |

68 Teachers stated that they would not leave the profession for monetary considerations. 33 teachers did not answer the question.

It may be remarked that of th 17 teachers who have taken their Doctorate, 14 clearly stated that they would not leave for monetary considerations, while the other 3 did not state anything. these figures are of course included in the numbers given in the preceding paragraph.

8. 37 teachers participated in the Life of the Community. (Social work : 16, Lectures etc. : 15, Political Work : 4, Cultural work : 2) On an average these teachers devoted 4 to 5 hours per week such work.

9. The No. of days offered by the teachers for Constructive National Work were as under.

| No. of Days Per Year | No. of teachers willing to work |
|---|---|
| Up to 15 | 30 |
| 16 to 30 | 84 |
| 31 to 45 | 5 |
| 46 to 60 | 11 |
| More than 60 | 15 |
| Total | 145 |

☑☑☑

From the vigorous social science research point of view the survey has its obvious limitations. But even then it would be of interest as a general indication of the state of affairs in 1951. I do not know, whether it would be of interest as the first (and perhaps the only one) of its type conducted by any teachers association in India during the last 50 years.

- Note by Devdatta Dabholkar, 2007.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र राज्याची शिक्षणविषयक श्वेतपत्रिका : काही विचार

महाराष्ट्रातील संकल्पित शैक्षणिक पुनर्रचनेसंबंधीचा श्वेतपत्रिकेचा मसुदा शिक्षणमंत्री माननीय श्री. मधुकरराव चौधरी यांनी विधानसभेला दि. ८ एप्रिल १९६८ रोजी सादर केला. त्यावेळी केलेल्या निवेदनात त्यांनी प्रामुख्याने खालील तीन गोष्टींचे निवेदन केले.

अ. शैक्षणिक पुनर्रचनेची गरज व उद्दिष्टे

ब. पुनर्रचनेसंबंधीचे धोरण व कार्यक्रम

क. अंमलबजावणीची पद्धती

या श्वेतपत्रिकेचा राज्यभर विविध गटांकडून विचारविनिमय व्हावा अशी अपेक्षा व्यक्त करण्यात आलेली होती. गेले तीन महिने ही श्वेतपत्रिका महाराष्ट्रापुढे विचारासाठी, चर्चेसाठी आहे.

महाराष्ट्रात या श्वेतपत्रिकेचे स्वागत काहीसे संमिश्र अशा स्वरूपाचे झाले. श्वेतपत्रिकेत मांडलेल्या धोरणाच्या ज्या भागाविषयी विशेष तीव्र अशी प्रतिक्रिया झाली असे भाग मुख्यत्वेकरून दोन होते असे म्हणावयास हरकत नाही. त्यापैकी एक भाग नव्या साच्यात इयत्ता दहावीनंतरच्या शिक्षणाच्या विस्तारासाठी जी तत्त्वे स्वीकारण्यात आलेली आहेत त्या संबंधात होता व दुसरा भाग आपल्या शिक्षणव्यवस्थेत इंग्रजीला जे स्थान दिले आहे त्या संदर्भात होता. श्वेतपत्रिकेच्या इतर अंग-उपांगांविषयी चर्चा झालेली असली तरी साहजिकच वरील दोन गोष्टींवरील चर्चेइतकी धार त्या चर्चेला आली नाही.

महाराष्ट्राच्या किंबहुना भारताच्या शैक्षणिक इतिहासात असा प्रकारची शैक्षणिक धोरणाची पत्रिका तयार होण्याची ही पहिलीच वेळ आहे. हे लक्षात घेतल्यास या घटनेचा कोणाही महाराष्ट्रीयास अभिमानच वाटावा अशी ही घटना आहे. श्री. मधुकरराव चौधरी यांच्या निवेदनाच्या शेवटी नमूद केलेले उद्‌गार कोणाच्याही भावनेला आवाहन करतील असेच आहेत. 'या महाराष्ट्रात एक भला मोठा खास हक्कदार वर्ग आहे आणि त्या वर्गासाठी सारा समाज रात्रंदिवस काबाडकष्ट करीत आहे. आणि हा विशेषाधिकार प्राप्त झालेला भाग्यवान वर्ग म्हणजे महाराष्ट्रातील मुले!' हे उद्‌गार जर यथार्थ झाले तर महाराष्ट्राने केवळ शिक्षण आणि राष्ट्रीय विकास यामधील मूलभूत संबंध ओळखला एवढेच सिद्ध होणार नसून शिक्षणाच्या समान संधीचे समाजवादी समाजरचनेमागील सर्वात महत्त्वाचे सूत्र भारतात सर्वप्रथम महाराष्ट्राने पकडले हे श्रेयही महाराष्ट्राला मिळणार आहे. परंतु हे प्रत्यक्षात घडून यावयाचे असेल तर इतर राष्ट्रे करतात त्याप्रमाणे भविष्यकालाकडे नजर ठेवून आज शिक्षणावर अधिक खर्च करण्याची तयारी ठेवली पाहिजे. इतके करूनही साधनांच्या मर्यादा ज्यावेळी जाणवू लागतील (आणि कितीही केले तरी आणखी अनेक वर्षे त्या महाराष्ट्रात व इतरत्र भारतात जाणवत ह्या राहणारच) त्यावेळी त्या साधनांचा वापर गुणवत्तेचा विकास व शिक्षणाची समान संधी हे दुहेरी सूत्र डोळ्यापुढे ठेवून जागरूकपणे व कार्यक्षमतेने करावा लागेल.

### शिक्षणाची समान संधी

या श्वेतपत्रिकेत मांडण्यात आलेली तत्त्वे अप्रगत वर्गांना शिक्षणाची संधी नाकारण्यास कारणीभूत होतील अशी अनेकांच्या मनात शंका आहे. हा निवडक प्रवेशाच्या धोरणाचा प्रश्न इयत्ता दहावीनंतरच्या शिक्षणाच्या संदर्भात निर्माण होतो. या विषयीचे धोरण निवेदनात खालीलप्रमाणे स्पष्ट करण्यात आलेले आहे.

१. मनुष्यबळाच्या गरजा व व्यावसायिक संधी लक्षात घेऊन विविध प्रकारचे व्यावसायिक, तांत्रिक व औद्योगिक शिक्षण देण्यासाठी पूर्ण वेळ अथवा अर्धवेळेचे शिक्षणक्रम आखणे.

२. सर्वसामान्य माध्यमिक शाळा व महाविद्यालये यातून बाहेर पडणाऱ्या मानवी शक्तीसंबंधीच्या समाजाच्या गरजांचा अंदाज घेणे अतिशय अवघड असते. आपल्या देशातील सद्य: परिस्थितीत तर हे प्रकर्षाने जाणवते. त्यामुळे उपलब्ध शिक्षक, पैसा व साधने यांच्यावरच शिक्षणाचा विस्तार अवलंबून राहणे अपरिहार्य असते. तथापि, सामाजिकदृष्ट्या मागासलेल्या व आर्थिकदृष्ट्या निर्बल असणाऱ्या वर्गातील मुलांना या स्तरावरील शिक्षण घेण्याची संधी अधिकाधिक






प्रमाणात मिळावी याविषयी दक्षता बाळगणे.

३. दहाव्या इयत्तेनंतर उच्च शिक्षणासाठी प्रवेश देताना विद्यार्थ्याची बुद्धिमत्ता, आधीची प्रगती आणि सामाजिक न्याय या निकषांचा विचार करावा लागेल.

बुद्धिमत्ता व आधीची प्रगती हे निकष मानले की वरिष्ठ वर्गाच्या विद्यार्थ्यांना संधी मिळण्याची शक्यता वाढते व सामाजिक न्यायाच्या तत्त्वाचा समावेश केला तरी सामाजिक न्यायाचे आचरण व्यवहारात करणे अशक्यप्राय होते. या विचारातून या प्रवेशविषयक धोरणाच्या तत्त्वांना विरोध होतो. परंतु याविषयीच्या सर्व बाजू सर्वांनी नीट लक्षात घेतल्या तर हा विरोध पूर्णपणे नाहीसा झाला नाही तरी त्याची कटु तीव्रता कमी व्हायवास पुष्कळशी मदत होईल असे वाटते.

त्या बाजू अशा :

१. विकास कार्यक्रमाचा हेतू मनात ठेवून शिक्षण देत असताना शिक्षणाच्या गुणवत्तेकडे केलेले दुर्लक्ष आत्मघातकी-पणाचे ठरते. कारण विकासाची गतीच त्यामुळे खुंटते.

२. साधने मर्यादित असताना असे योग्य दर्जाचे शिक्षण सर्वांपर्यंत पोचवणे शक्य नसते. प्रगत राष्ट्रांतून देखील हे पूर्णपणे शक्य होत नाही.

३. या निवडीमुळे सामाजिक अन्याय होऊ नये व चढाओढीत प्रगत व मागास, श्रीमंत व गरीब यांना समान संधी राहावी अशी रचना अप्रगत व गरीब वर्गांतून योग्य त्या प्रमाणात निवड करण्याचे धोरण जाणीवपूर्वक स्वीकारून व या निवड झालेल्या विद्यार्थ्यांना नंतर आवश्यक ती विशेष मदत करून घेता येते. व्यवहारतः महाराष्ट्रात पुढील दोन सूत्रे सांभाळून हे साध्य करता येईल.

अ. सामाजिक व आर्थिक अडचणींमुळे विद्यार्थ्याच्या दहावीच्या परीक्षेच्या निर्णयावर किती परिणाम झाला असेल याचा अभ्यास करून त्या प्रमाणात निवड करताना त्याला तुलनात्मक अधिक गुण देणे. सध्या ही गोष्ट करावयाची तर एस्.एस्.सी.च्या निकालाच्या आधाराने करता येईल. हे कसे करावे या विषयीचे मार्गदर्शन संख्याशास्त्रज्ञ (statisticians) देऊ शकतील. एस्.एस्.सी. बोर्डाकडे योग्य त्या पद्धतीने 'पंच' केलेली कार्डे असतील तर कॉंप्युटरला ती माहिती पुरवून काही तासांच्या अवधीत याविषयीची उत्तरे मिळू शकतील. तशी कार्डे नव्याने तयार करून घ्यावी लागल्यास सुरुवातीचे काम जिकीरीचे होणार असले तरी प्रश्नाच्या महत्त्वाच्या दृष्टीने ती गोष्ट करणे इष्ट ठरेल. या पाहणीची आखणी शास्त्रशुद्ध रीतीने करणे व आलेले निर्णय धोरणासाठी स्वीकारण्याची सामाजिक व राजकीय तयारी ठेवणे या गोष्टी मात्र कटाक्षाने कराव्या लागतील.

ब) ही निवड झाल्यानंतर जी अंतिम गुणवत्ता आपल्याला विकास कार्यक्रमाच्या गतीच्या दृष्टीने आवश्यक वाटते त्या गुणवत्तेची पातळी गाठण्यास सामाजिक व आर्थिक प्रतिकूलतेमुळे या विद्यार्थ्यांना अडचण वाटू नये इतकी अधिक मदत या विद्यार्थ्यांना पोचवली पाहिजे.

श्वेतपत्रिकेत मांडण्यात आलेली या धोरणाविषयीची सूत्रे या दृष्टीने योग्य अशीच आहेत. सामाजिक न्यायाच्या दृष्टीने या सूत्रांपासून मागे येण्याचे कारण नाही, तर चार पावले पुढेच गेले पाहिजे.

### इंग्रजी भाषेविषयीचे धोरण

इंग्रजीच्या धोरणाविषयीही अधिक तपशीलवार विचार झाला पाहिजे. या प्रश्नावरील प्रतिक्रियाही फार तीव्र स्वरूपाच्या आढळून येतात व शैक्षणिक पुनर्रचनेसंबंधी ज्यांचे विचार सामान्यपणे एक असतात अशा लोकांमध्येही या बाबतीत तीव्र मतभेद आजही आढळून येतात. पुढील वीस वर्षांच्या कालखंडात बांधून टाकू शकेल असा अंतिम निर्णय आजच याबाबत घेणे खरोखरच अवघड आहे. या दृष्टीने या प्रश्नाची विविध अंगे येथे थोडक्यात एकत्रित मांडणे कदाचित् उपयुक्त होईल. ती अंगे अशी :

१. मातृभाषेतून शिक्षण होणे हे विद्यार्थ्यांच्या दृष्टीने सर्वात इष्ट असते. शाळा-कॉलेजातील सकस शिक्षण मातृभाषेतून मिळेल अशी व्यवस्था करणे ही शासनाची व शिक्षणक्षेत्राची सर्वात प्रमुख जबाबदारी आहे.

२. इंग्रजीला भावनात्मक दृष्टिकोनातून विरोध करण्याचे कारण आता उरलेले नाही. एस्.एस्.सी. पर्यंतच्या सकस शिक्षणाला - विविध विषयांच्या अध्ययनाला, अध्यापनाला - इंग्रजीची आवश्यकता नाही ही गोष्ट आता अनुभवसिद्ध म्हणून सर्वमान्य आहे.

३. खेर मंत्रिमंडळाच्या इंग्रजीविषयक धोरणामुळे महाराष्ट्राच्या एका पिढीच्या शिक्षणाचे नुकसान झाले ही गोष्ट खरी आहे. दुर्दैवाने मधल्या पिढीचे शिक्षण कच्चे राहिले की त्या पिढीतूनच भावी पिढीचे अध्यापक-प्राध्यापक येणार

असल्यामुळे शिक्षणात आंतरिक अंगभूत कच्चेपणा निर्माण होतो. याचा प्रत्यय आज महाराष्ट्रात येत आहे. यातून बाहेर पडावयाचे तर शिक्षकवर्गाच्या अधिक शिक्षणाचे विशेष प्रयत्न व्हावयास पाहिजेत. परंतु या नुकसानीचे प्रमुख कारण हा निर्णय ज्या तयारीनिशी घ्यावयास हवा होता ती पूर्वतयारी आधी केली गेली नाही व नंतरच्या वीस वर्षातही ही तयारी पूर्ण करून घेण्याची जबाबदारी शासनाने व शिक्षणक्षेत्राने पार पाडली नाही हे होय. पदवी परीक्षेपर्यंतचे सकस शिक्षण मातृभाषेतून दिले पाहिजे यासाठी करावयाच्या तयारीला निर्धाराने प्रयत्न केला असता तर दहा वर्षांहून अधिक काल लागण्याचे कोणत्याही परिस्थितीत खरोखर कारण नव्हते व आजही नाही.

४. पदव्युत्तर शिक्षणासाठी काही दशके इंग्रजीतून वाचन करण्याची जरूरी राहील. शाळा-कॉलेजातील शिक्षकवर्ग पदव्युत्तर शिक्षण घेऊन इंग्रजीतील ज्ञानभांडार मराठीतून विद्यार्थ्यांस आणि समाजास देऊ शकेल. ह्या वर्गाचे हे कार्य मराठी माध्यमाच्या यशस्वितेसाठी आवश्यक मानले पाहिजे. पहिल्या पदवीपर्यंतसुद्धा इंग्रजीतून वाचन करण्याची प्रत्येक विद्यार्थ्याची क्षमता असली पाहिजे. ही क्षमता आपल्या डोळ्यापुढील विद्यार्थी स्वत: म्हणून कमावील (उदा. इंग्रजी शिकवणाऱ्या एखाद्या स्वतंत्र संस्थेत जाऊन तेथून अभ्यास पुरा करुन पदविका किंवा प्रमाणपत्र मिळवील.) ही शक्यता कमी आहे. ह्या दृष्टीने कॉलेजमध्ये इंग्रजी हा आवश्यक विषय म्हणून शिकवणे भाग पडते. हे खरे असले तरी शाळेतही हा विषय आवश्यक मानावा लागतो.

कोणत्या इयत्तेपासून हा विषय आवश्यक समजावा हा पुन्हा वादाचा प्रश्न बनतो. श्वेतपत्रिकेत हा विषय ५-७ इयत्तांना आवश्यक आणि त्यानंतर पुन्हा शाळा-कॉलेजात ऐच्छिक मानण्यात आला आहे. ५-७ इयत्तांना इंग्रजी विषय ऐच्छिक केला तर ८-१० इयत्ता हा विषय शिकवणे अवघड जाईल. ज्याने पूर्वी हा विषय केला नाही आणि ज्याने केला आहे त्यांना एकत्र कसे शिकवावे? दुसऱ्याच्या दर्जाने शिकवल्यास हा विषय पहिल्यास कळणार नाही आणि पहिल्याच्या दर्जाने शिकवल्यास दुसऱ्याचे आधीचे शिक्षण वाया जाते.

५. इंग्रजी शिक्षणाची भूक शिक्षणदृष्ट्या मागासलेल्या समाजात निश्चितपणे आहे. ही भूक खऱ्या गरजेतून उद्भवली आहे की नुसती भावना आहे ह्या वादात न पडणे बरे.

६. महाराष्ट्रात इंग्रजीचे स्थान काय रहावे ह्या प्रश्नाचे उत्तर काही अंशी अन्य राज्यातील इंग्रजीच्या स्थानावर अवलंबून राहील. ह्या मुद्द्याची येथे अधिक फोड करावयास हवी असे नाही.

### श्वेतपत्रिकेतील स्वागतार्ह उपक्रम

महाराष्ट्राने आजवर केलेल्या शैक्षणिक प्रगतीबद्दल उचित अभिमान बाळगत असताना महाराष्ट्र राज्याच्या आजच्या शिक्षणव्यवस्थेतील उणिवाही श्वेतपत्रिकेने मोकळेपणाने मान्य केलेल्या आहेत. शासनातर्फे मांडण्यात आलेल्या निवेदनात इतके प्रामाणिक आणि मनमोकळे आत्मनिरीक्षण सहसा आढळत नाही. हा संपूर्ण परिच्छेद (श्वेतपत्रिका, १.३) काळजीपूर्वक वाचणाऱ्याच्या ही श्वेतपत्रिका कोणत्या व्यथेवर उपाययोजना करण्याचा प्रयत्न करीत आहे हे लक्षात आल्याखेरीज राहणार नाही, व या संपूर्ण विश्लेषणाशी व उपाययोजनेशी तो शंभर टक्के सहमत होऊ शकत नाही तरी श्वेतपत्रिकेचे बहुतांश विवेचन त्याला मान्य झाल्याखेरीज राहणार नाही.

या विविध उपक्रमातही काही उपक्रमांचा विशेष निर्देश करता येईल.

१. शिक्षकांचे सल्लागार-मंडळ

२. शिक्षकांच्या प्रशिक्षणावर भर.

३. त्यासाठी प्राथमिक शिक्षकांना संकल्पिलेली मदत.

४. प्रत्येक संस्थेने स्वतःच्या कल्पनेने आपल्या विकासासाठी योजना आखावी यासाठी उत्तेजन.

५. विकास कार्यक्रम पार पाडण्याची प्रत्येक संस्थेला शक्यता राहावी यासाठी 'विकास निधी' व 'सुधारणा निधी' निर्माण करण्याची तरतूद.

६. अभ्यासक्रम सुधारण्याचा आग्रह.

७. विशेष कार्यक्षम महाविद्यालयांचा विकास करून त्यांचे स्वायत्त संस्थांमध्ये रूपांतर करण्याचे धोरण.

८. 'सामान्य' (O) व 'प्रगत' (A) अशा दोन प्रकारचे अभ्यासक्रम ८ वी ते १० वी त्याचप्रमाणे ११ वी व १२ वी या इयत्तांगटांसाठी आखण्याचे धोरण.

श्वेतपत्रिकेतील ज्या धोरणाविषयी त्यांचे नीट स्वरूप समजून न घेता टीका करण्यात आली अशापैकी 'सामान्य'-

'प्रगत' हे धोरण होय. वरिष्ठ वर्गांचे स्थान बळकट करण्याच्या प्रक्रियेचा वास या धोरणात अनेकांना प्रथमदर्शनी येतो. खरे तर या पद्धतीतून प्रत्येक विद्यार्थ्याला त्याची ज्या विषयात अधिक गती असेल त्यात अधिक प्रगतीची संधी राहणार आहे. सर्वच विषय विद्यार्थ्याने घ्यावयाचे तर 'सामान्य' नाहीतर 'प्रगत' पातळीवरच घेतले पाहिजेत असे बंधन यात मुळीच नाही. प्रगत शिक्षणक्रमाच्या अध्यापनाच्या सोयी ज्या शाळांतून उपलब्ध असतील त्यांना त्यांचे अध्यापन करण्याची परवानगी मिळेल. विद्यार्थ्याला दहावीच्या व बारावीच्याही परीक्षेत त्याच्या इच्छेप्रमाणे व कुवतीप्रमाणे एका किंवा अनेक विषयात परीक्षा देण्याची मुभा राहील. शाळांच्या व विद्यार्थ्यांचा अशा दोघांच्याही विकासाच्या दृष्टीने ही गोष्ट इष्टच आहे. आजही एस्.एस्.सी. परीक्षेसाठी गणित, भाषा इ. विषयात सामान्य-प्रगत असा भेद आहेच.

### दुसरे काही उपक्रम

आज ११ वी इयत्ता (एस्.एस्.सी.) परीक्षा उत्तीर्ण झालेला विद्यार्थी सरकारी आणि इतर नोकऱ्यांना पात्र ठरतो. आजच्या ११ वी पर्यंतचे शिक्षण यापुढे १० वी पर्यंत पुरे करता आले पाहिजे असा श्वेतपत्रिकेचा विश्वास आहे. त्या दृष्टीने प्रत्येक इयत्तेतील विषयाचा व्याप आणि खोली वाढविण्याची मोठा जबाबदारी पडते. किंबहुना, त्यासाठी काही विषयांतील अध्यापन पद्धतीही बदलावी लागेल. १० वी नंतर विद्यार्थी नोकरीस पात्र ठरतो असे आम्ही मानतो. श्वेतपत्रिकेत तसा उल्लेख नाही.

'स्कूल कॉंप्लेक्स' आणि 'पत्रव्यवहारातून शिक्षण' ह्या बाबतीत पुढे पाऊल टाकताना काळजी घेतली पाहिजे. शिक्षणसंस्थांमधील आपापसातील, आणि जेथे शाळा आहेत त्या गावागावांमधील स्पर्धा स्कूल कॉंप्लेक्सच्या आड येते. जेव्हा तेढ स्पर्धेचे स्थान घेते तेव्हा अडचणी वाढतात. पत्रव्यवहारातून शिक्षण ही कल्पना बहुधा 'मॅन-पॉवर प्लॅनिंग' ह्या कल्पनेस छेद देते. उदा. अमुक विषयाचे अधिक पदवीधर नकोत म्हणून त्या विषयाची कॉलेजे काढली नाहीत किंवा त्या कॉलेजांतील विद्यार्थी संख्या मर्यादित केली; उलटपक्षी त्या विषयातील पत्रव्यवहारातून शिक्षण वाढले तर मर्यादा घालण्याच्या योजनेस अर्थ उरत नाही. रशियात पत्रव्यवहारातून शिक्षण कामावर असणाऱ्यांसाठी त्यांच्या त्यांच्या कामातील कौशल्य वाढविण्यासाठी असते हे लक्षात घ्यावे.

परीक्षापद्धतीत सुधारणा करताना शाळा-कॉलेजांनी विद्यार्थ्यांच्या कामाप्रमाणे वर्षभर गुण देणे ही कल्पना चांगली आहे. राष्ट्रीय आणि सामाजिक सेवेची कल्पनाही चांगली आहे. पण प्रत्यक्षात ह्या कल्पनांचा पाठपुरावा करताना बरीच खबरदारी घ्यावी लागेल. नाहीतर त्यांचा विपर्यास होण्याची बरीच शक्यता असते.

### जनतेचे सहकार्य

ही एक शासनाने तयार केलेली श्वेतपत्रिका आहे व तिच्यातील कार्यक्रम पार पाडण्याची जबाबदारी केवळ शासनाची आहे, या दृष्टिकोनातून या श्वेतपत्रिकेकडे पाहणे चुकीचे ठरेल. जनतेचा समंजस पाठिंबा ही तर कोणत्याही विधायक मूलगामी सार्वत्रिक परिवर्तनाच्या कार्यक्रमाची मूलभूत गरज असते. यामुळेच टीका करताना अज्ञान किंवा पूर्वग्रह यांचा विपरित परिणाम टीकेवर होणार नाही इतकी शक्य ती दक्षता घेतली गेली पाहिजे. परिवर्तनाची निकड आजच्या इतकी पूर्वी कधीही नव्हती व या परिवर्तनाला सुजाण विधायक टीकेने व सहकारी कर्तृत्वाने साह्य केले पाहिजे.

सार्वत्रिक सद्भावनेचा पाठिंबा गृहीत धरल्यानंतर एकूण कार्यवाहीत तीन घटकांचा प्रामुख्याने सहभाग राहील.

१. शासनयंत्रणा, २. विद्यापीठे, ३. शिक्षकवर्ग.

### शासनयंत्रणेपासून अपेक्षा

शासनयंत्रणेमध्येच राज्यपातळीवरील यंत्रणेबरोबरच जिल्हा पातळीवरील यंत्रणेचाही आपण समावेश करू. 'राज्याच्या शासकीय विभागांतील शिक्षणप्रमुख जिल्हा पातळीवरील यंत्रणा यांच्याकडे आता आर्थिक व प्रशासकीय बाबतीत अधिक विस्तृतपणे अधिकार सोपविण्याचे धोरण अवलंबिण्यात येईल' असे श्वेतपत्रिकेने म्हटले आहे (श्वेतपत्रिका २२.३). असे विस्तृतपणे अधिकार देण्याचे विकेंद्रीकरणाचे धोरण अंतिम ध्येय म्हणून इष्टच आहे. परंतु तेथपर्यंत क्रमाक्रमाने जाऊन पोहोचत असताना शिक्षणाची पातळी सांभाळली जात आहे व मूलभूत धोरणाशी अनुसंधान कोठे सुटत नाही, याची दक्षता घेतली गेली पाहिजे.

राज्यपातळीवरील शासकीय यंत्रणेवरही केवळ ही जबाबदारी सोडून चालणार नाही. त्या यंत्रणेतही अधिकारी-

अनुक्रमणिका

वर्गाच्या योग्य मनोवृत्तीचा प्रतिसाद मिळाला पाहिजे. असा प्रतिसाद कार्यकारी होऊ शकेल इतकी लवचिकता तिच्यात ठेवली पाहिजे. ही प्रेरणा सध्याच्या यंत्रणेतूनच सहजस्फूर्त अशी मिळू शकेल अशी आशा बाळगणे हे थोडेसे अधिक आशावादीपणाचे व सर्वसामान्य सार्वत्रिक अनुभवाच्या विरोधी असे होईल. एखादी रुळलेली चाकोरी सोडण्याचे काम सरकारी यंत्रणा सहसा उत्साहाने अंगावर घेत नाही. यात व्यक्तीच्या प्रवृत्तीपेक्षा नोकरशाहीच्या अंगभूत प्रकृतीचाच दोष आहे. ही स्वाभाविक मर्यादा लक्षात घेऊन उचित ती कार्यवाही करण्याची दक्षता घेतली गेली पाहिजे.

कोणत्याही नव्या सरकारी कार्यक्रमाची सुरुवात नवीमंडळे आणि नवे अधिकारी नेमून होते, आणि ते साहजिक आहे. परंतु त्यांची उपयुक्तता प्रत्यक्षात प्रस्थापित करण्याकडे कटाक्षाने पाहिले पाहिजे.

### विद्यापीठांची जबाबदारी

विद्यापीठांना शैक्षणिक परिवर्तनाच्या क्षेत्रात करावयाचे कार्य फार मोठे आहे. आजच्या महाराष्ट्राच्या परिस्थितीत तर ते विशेषच महत्त्वाचे आहे. शिक्षणाचा प्रसार व गुणवत्ता यांतील संघर्ष जर आज सर्वांत तीव्रपणे कोठे जाणवत असेल तर तो या क्षेत्रात आहे. विद्यापीठाच्या शिक्षणाचा कस वाढवणे ही आजची एक अत्यंत निकडीची गरज आहे. महाविद्यालयांतून शिकवणारे प्राध्यापक विद्यापीठे तयार करणार. सर्व दुय्यम शाळांतून अध्यापन करणारे पदवीधर शिक्षकही विद्यापीठातूनच येणार. इतकेच नव्हे तर यापुढील काळात विद्यापीठे व महाविद्यालये यांनी दुय्यम शाळा व प्राथमिक शाळा यांना त्यांचा दर्जा सुधारण्याच्या दृष्टीने अधिक साह्य व मार्गदर्शन करण्याची जबाबदारीही अंशत: तरी स्वीकारली पाहिजे.

प्रत्यक्ष विद्यापीठाच्या क्षेत्रातही आज अनेक महत्त्वाचे प्रश्न सोडविले जाण्याची वाट पाहत अनेक वर्षे तसेच राहिले आहेत. परीक्षा पद्धतीत सुधारणा, अभ्यासक्रमातील सुधारणा, महाविद्यालयांच्या निर्मितीविषयीचे नियोजन, त्यांच्या वाढीसंबंधीचा शास्त्रशुद्ध विचार, उपलब्ध साधनसामुग्रीचा पुरेपूर उपयोग करून घेण्याचा दृष्टिकोन, पदवीपरीक्षेपर्यंत सर्व विषयांतील मराठी भाषेतील पाठ्यपुस्तकांची सिद्धता यासारख्या अनेक गोष्टी निकडीने पार पाडल्या जाण्याची गरज आहे. यातील निकड विद्यापीठांनी मनःपूर्वक मान्य केली व या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी सोवळ्या स्वायत्ततेच्या कल्पना बाजूस ठेवून, प्रसंगोपात सरकारचे समंजस सहकार्य आणि संयमी पुढारपण म्हणजे स्वायत्ततेवर घाला नव्हे एवढी भूमिका सर्व विद्यापीठांनी मान्य केली तर पुढील पाच वर्षांच्या कालावधीत सोडविता येणार नाही असा वरीलपैकी कोणताही प्रश्न नाही.

विद्यापीठांची मूलभूत स्वायत्तता ही एक अत्यंत महत्त्वाची अशीच गोष्ट आहे, याविषयी दुमत व्हावयाचे कारण नाही. विद्यापीठाच्या क्षेत्रात काम करणाऱ्या लोकांच्यामध्ये तर तसे दुमत होण्याचे कारण नाहीच नाही. या दृष्टीने श्वेतपत्रिकेवरील निवेदनात शिक्षणमंत्र्यांनी या संदर्भात केलेले विधान - 'अर्थात महाविद्यालयीन स्तरावरील शिक्षणासंबंधी मांडलेल्या सूचना विद्यापीठांनी विचारात घेऊन त्यांची अंमलबजावणी करावी अशी अपेक्षा आहे,'- हे अत्यंत उचित असेच विधान आहे. परंतु यामागील भावनेला विद्यापीठांच्या-कडून कर्तृत्वाचा प्रतिसाद लवकर मिळणार नसेल तर अधिक समर्थ मार्गदर्शनाचीही याबाबत आवश्यकता निर्माण होईल. महाराष्ट्रातील विद्यापीठे आपली ही जबाबदारी तोलामोलाने पार पाडतील काय?

सरकारने खालच्या स्तरांवर जबाबदारी टाकून विकेंद्रीकरणास सुरुवात केली आहे आणि ह्या श्वेतपत्रिकेत शिक्षण खात्याच्या बाबतीतला तसा स्पष्ट उल्लेख आहे. विद्यापीठांनी कॉलेजांच्या बाबतीत तीच दृष्टी ठेवण्याची जरूरी आहे.

### शिक्षकवर्ग व शिक्षक संघटना

या परिवर्तनाचा मुख्य कणा व सर्व स्तरांवर या परिवर्तनात प्रभावीपणे भाग घेऊ शकणारा वर्ग म्हणजेच शिक्षक वर्ग. आज हा सर्व वर्ग स्वस्थचित्त आहे असे म्हणता येणार नाही. (किंबहुना प्राध्यापकांच्या नवीन श्रेणी ठरविताना न सुटलेले व त्यामुळे अनेकदा अन्यायजनक असे जे अकारण घोटाळे झाले व होत आहेत त्यामुळे महाराष्ट्रातील सर्वच प्राध्यापकवर्ग अत्यंत अस्वस्थ मनस्थितीत आहे.) परंतु हे लक्षात घेऊनही सर्व शिक्षकवर्गाने श्री. मधुकरराव चौधरी यांच्या निवेदनातील शिक्षकांविषयीच्या एका विधानाच्या मुख्य आशयाशी सहमत व्हावयास हरकत नाही. 'इतर अनेक

राज्यांपेक्षा महाराष्ट्रातील शिक्षकांना मिळणारे वेतन व इतर सवलती वरच्या दर्जाच्या आहेत. त्यांच्यासाठी शासनाने बरेच कार्य केले आहे. मी असे मानीत नाही की, या संबंधात सर्व काही झाले आहे. परंतु जे काही झाले आहे त्या पार्श्वभूमीवर शिक्षकांकडून महाराष्ट्राच्या फार मोठ्या अपेक्षा आहेत.' हे ते विधान होय.

प्रत्येक शिक्षक व्यक्तिगतरित्या आपली गुणवत्ता वाढवून परिवर्तनाच्या कार्यात अधिक प्रभावीपणे सहभागी होऊ शकेल ही गोष्ट खरी आहे. परंतु याच्या पलीकडे जाऊन महाराष्ट्रातील शिक्षणक्षेत्रात शिक्षक संघटना प्रभावी करण्याची गरज आता निर्माण झाली आहे असे वाटते. शिक्षकांच्या वेतनवाढीच्या प्रश्नातच केवळ लक्ष घालणाऱ्या संघटना, किंवा शासनाशी किंवा संस्थेच्या चालकवर्गाशी सतत संघर्ष चालू ठेवणाऱ्या संघटना एवढेच केवळ त्यांचे स्वरुप राहता कामा नये. या गोष्टीत जरूर तितके लक्ष तर त्या संघटना घालतीलच व आपल्या न्याय्य हितसंबंधांच्या पाठीमागे योग्य सामर्थ्यही उभे करतील. परंतु याही पुढे जाऊन शिक्षणक्षेत्राचा गुणात्मक विकास करण्याची आपली व्यावसायिक जबाबदारीही समर्थपणे पेलण्यास त्या पुढे येतील अशी अपेक्षा ठेवली पाहिजे. श्वेतपत्रिका शिक्षकसंघटनांचा केवळ ओझरता निर्देश करते; या परिवर्तनाच्या कार्यातील एक प्रभावी सहकारी या पद्धतीने त्यांच्या वाढीचा किंवा स्थानाचा विचार करीत नाही. कदाचित् शासनाला आपल्या श्वेतपत्रिकेतून इतके सर्व करणे कठीण असेल. परंतु शिक्षकांनी, विद्यापीठांनी, शासनानेही या गोष्टीचे महत्त्व मनोमन ओळखले पाहिजे व त्या दिशेने वाटचाल केली पाहिजे.

वरिष्ठश्रेणीच्या इतर व्यावसायिक संघटनांप्रमाणे (Professional bodies) शिक्षकवर्गाची संघटना तयार होऊ शकली व राजकीय पक्षापासून दूर राहून विधायक कार्य करू लागली तर तिला शिक्षकांची व शिक्षणक्षेत्राची स्थिती सुधारण्यात प्रभावी कार्य करता येईल. शिक्षकांच्यासाठी कल्याणकारी योजना, शिक्षकांच्या प्रशिक्षणाच्या योजना, पाठ्यपुस्तके तयार करण्याचा प्रयत्न यासारख्या गोष्टीतही ती प्रभावी सहकार्य देऊ शकेल किंवा नेतृत्व करू शकेल. शिक्षकांचे वर्तन या व्यवसायाची प्रतिष्ठा सांभाळण्यासारखे होत आहे की नाही या विषयीची दक्षताही ती संघटना घेऊ शकेल.

### आर्थिक बाजू

श्वेतपत्रिकेने मुख्यत्वेकरून धोरणाच्या सूत्रांचीच मांडणी केलेली आहे. त्यांच्या कार्यवाहीचा फारसा तपशील मांडलेला नाही. हा तपशील मूळ धोरणाला धक्का लागणार नाही अशा पद्धतीने सहज करता येईल असा आत्मविश्वास त्याच्या मागे असणे साहजिक आहे. यंत्रणेतील बदल काहीसे दुष्कर वाटले तरी करता येतील. मुख्य प्रश्न शेवटी शैक्षणिक विकासासाठी एकूण किती पैसा उपलब्ध होण्याची आपण आशा बाळगू शकतो हा आहे. सर्व कार्यक्रम नीट पार पाडावयाचा तर किती पैसा लागेल याचा अंदाज आता कदाचित तयार करण्यात आला असेल. पैशाच्या उपलब्धतेची शक्यता व हा अंदाज या दोहोतील तफावत नीट तपासून पहावी लागेल.

शिक्षणमंत्री आपल्या निवेदनात म्हणतात - 'श्वेतपत्रिकेत चित्रित केलेल्या पुनर्रचनेसाठी शासनाकडून व समाजाकडून सढळपणे पैसा उपलब्ध होण्याची गरज राहील. राज्यातील शिक्षणावरील खर्च प्रतिवर्षी वाढवीत नेणे अपरिहार्य ठरणार आहे. महाराष्ट्रातील जनतेला शिक्षणाचे महत्त्व पुरेपूर माहीत आहे. त्यामुळेच नव्या योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी जी अपेक्षा केली जाईल ती लोकांकडून पूर्ण होईल याविषयी माझ्या मनात तिळमात्र शंका नाही.'

प्रसार आणि गुणवत्ता यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न करीत असताना शिक्षणावरील खर्च उत्तरोत्तर वाढत जाणे अटळ आहे ही गोष्ट उघड आहे. यापैकी बहुतांश भार शासनावरच पडणार ही गोष्ट स्पष्ट आहे. परंतु समाजाला आजच्याहूनही अधिक प्रतिसाद देणे शक्य आहे. विशेषत: आपापल्या परिसरांतील शिक्षणसंस्थांच्या सुधारणेच्या कार्यक्रमात तन मन धन ओतून स्वार्थ व परमार्थ अशा दोन्ही गोष्टी समाजाला साधता येण्यासारखे आहे. या पद्धतीचे उल्लेखनीय कार्य मद्रासकडे झालेले आहे व शिक्षणकार्यात समाजाचा भरीव हातभार लागलेला आहे. आपल्याकडेही तशा प्रेरणा कार्यवाने होऊ शकतील.

देशातील आजच्या घटकेस असणारी आर्थिक साधनांची मर्यादा लक्षात घेऊन श्वेतपत्रिकेत एक महत्त्वाचा मुद्दा मांडला आहे. तो असा की, शिक्षणाच्या ह्या नव्या कार्यक्रमात उपलब्ध साधनांचा सघन उपयोग करणे, अपव्यय

टाळणे आणि दर विद्यार्थ्यामागील चालू खर्च व इमारतसामग्रीचा खर्च कमी करणे (२३.१). ह्यासाठी काहीकाळ मोठ्या संस्थांवर भर देणे भाग पडेल. उलटपक्षी मोठी संस्था भरमसाठ वाढून ही वाढ विद्यार्थ्यांच्या बेशिस्तीस आवाहन ठरणार नाही अशी काळजी घ्यावी लागेल. सुदैवाने एखाद्या शाळा-कॉलेजच्या बेसुमार वाढीने विद्यार्थ्यांची बेशिस्त उद्भवल्याचा प्रकार महाराष्ट्रात दिसत नाही.

इतके करूनही साधनसंपत्तीची जी उणीव राहील ती मर्यादा मानूनच आपले संख्यात्मक विकासाचे कार्यक्रम, विशेषत: १० वी नंतरचे, ठेवावे लागतील. ५-७ मैलात उच्च माध्यमिक शाळा आणि १०-१५ मैलात कॉलेज ही कल्पना काही काळ पुढे ढकलावी लागेल. हे होत असताना सामाजिक न्यायाला प्रतिकूल असे काही घडत नाही अशी दक्षता घेतली पाहिजे. तशी रचना सहजपणे करणे अवघड असले तरी जाणीवपूर्वक प्रयत्नानंतरही ती अशक्य आहे असे मानण्याचे कारण नाही. सामाजिक न्याय सांभाळून हे होऊ शकते असा विश्वास जनतेच्या मनात निर्माण झाल्यासच या श्वेत-पत्रिकेच्या मुख्य सूत्राला तिची हार्दिक मान्यता मिळू शकेल. एरव्ही अल्पजन, बहुजन, हरिजन, गिरिजन या व्यावर्तात ती सापडल्याखेरीज राहणार नाही.

हे सारे घडवणे अगत्याचे आहे व त्या घडणीची जबाबदारी केवळ शासनाची नसून आपणा सर्वांची आहे, या दृष्टिकोनातूनच सर्व विधायक वृत्तीच्या लोकांनी या श्वेतपत्रिकेचे स्वागत केले पाहिजे.

(समाज प्रबोधन संस्था, १९६८)

☑ ☑ ☑

## शिक्षण आणि समाजपरिवर्तन
## माऊशो (मानवाच्या उर्जेचा शोध)

माझ्यात क्षमता असेपर्यंत मी या प्रकल्पाचे सूत्रसंचालन करीन. त्यानंतर समर्थ हातात तो दिला जाईल.

माझ्याशी संपर्क सोपा आहे. या अंकात अन्यत्र ती माहिती आहे.

प्रथम संपर्क कार्डाद्वारे करावा. आपला पत्ता कार्डावर लिहावा. आपला असल्यास टेलिफोन नंबरही कळवावा. सविस्तर टिपण माझ्याकडे पाठवावे. हे परत केले जाणार नाही. त्याची Xerox प्रत आपल्याकडे ठेवावी. मूळ प्रत माझ्याकडे पाठवावी. पुढील कार्यवाहीविषयी पंधरवड्यात कळविण्यात येईल.

आपण स्वत: या प्रयोगासाठी किती पैसा उभा करू शकतो व आवश्यक मदतीचे स्वरूप याविषयी तपशीलाने लिहावे.

निर्णय व त्या निर्णयामागील कारणे याचे कागदपत्र २ ऑक्टोबर रोजी दुपारी ३.०० ते ६.०० सर्वांना पहावयास उपलब्ध असतील.

कोणत्याही पदवीसाठी केल्या जाणाऱ्या संशोधनाचा यात समावेश नाही.

या पद्धतीच्या कार्यात रस असणाऱ्यांची बैठक २ ऑक्टोबर रोजी दुपारी २.०० ते ५.०० या वेळेत प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्या निवासस्थानावर सातारा येथे यावर्षी होईल. दरवर्षी ऑक्टोबर १ व २ रोजी होणाऱ्या कृतिचर्चासत्राचाच तो एक भाग असेल. त्या चर्चासत्राचा विषय प्रतिवर्षी 'नवभारताची जडणघडण व आपण (प्रथमपुरुषी एकवचनी)' असा असतो. त्या वृत्तीच्याच लोकांनी सहभागी व्हावयाचे असते.

- देवदत्त दाभोलकर








# स्त्री-शिक्षण - आजचे प्रश्नचिन्ह

## प्रा० कुंदा दाभोलकर

काळाच्या ओघाबरोबर प्रश्नचिन्ह बदलले. स्त्रियांना शिक्षण द्यावे का? हा एके काळी भेडसावणारा प्रश्न आता सुटला आहे. आगरकर, अण्णासाहेब कर्वे वगैरेंच्या प्रयत्नातून स्त्रीशिक्षण सुरु झाले व त्याचा आज इतका प्रसार झाला आहे की 'स्त्रियांना शिक्षण द्यावे का?' हा प्रश्न विचारणारा स्वतःला केवळ हास्यास्पदच करून घेतो.

शिक्षण हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे. मग ती व्यक्ती स्त्री असो वा पुरुष असो, याबाबतीत आज मतभेद नाहीत; पण प्रश्न आहे तो स्त्रियांना कोणत्या तऱ्हेने शिक्षण द्यावे हा आहे. स्त्री-पुरुषांना एकाच साच्याचे शिक्षण देणे योग्य आहे की नाही हे पाहण्याची वेळ आता येऊन ठेपली आहे. आज सुशिक्षित स्त्रियांमध्ये दिसून येणाऱ्या वैफल्यामुळे तर या विषयाकडे विचारवंतांचे जास्तच लक्ष वेधले गेले आहे.

आजच्या शिक्षणाच्या तत्त्वाप्रमाणे प्रत्येकाला आपल्या बुद्धीप्रमाणे, विशिष्ट विषयाच्या आवडीप्रमाणे, विशिष्ट तऱ्हेच्या कलाप्रमाणे व शारिरीक कुवतीला झेपेल त्याप्रमाणे शिक्षण देणे हे योग्य ठरेल. पण त्याच्याच अनुषंगाने भावी जीवनात स्वीकारावयाच्या जबाबदाऱ्या पार पाडण्याची पूर्वतयारीही या शिक्षणातून व्हावी लागते. शिक्षणाचे हे महत्त्वाचे उद्दिष्ट आहे व या जबाबदाऱ्या जास्तीतजास्त यशस्वी तऱ्हेने पार पाडण्याकरिता आपली बुद्धी, विशिष्ट कल, आवडीनिवडी यांचा उपयोग करता आला पाहिजे. अंगभूत गुणांचा जास्तीतजास्त विकास करण्याच्या दृष्टीने समान संधी, जास्तीतजास्त अनुकूल परिस्थिती यांकरिता आज लक्ष पुरवले जाते. पण हा विकास निसर्गाच्या विरुद्ध जाऊन पुरा होईल का? याला उत्तर नकारात्मकच द्यावे लागेल. निसर्गसिद्ध जबाबदाऱ्या जास्तीतजास्त परिणामकारक तऱ्हेने हाताळण्यास जर आपले शिक्षण आपल्याला समर्थ करणार नसेल तर ते शिक्षणच होऊ शकणार नाही. स्त्रीच्या शिक्षणातून जर तिचे स्त्रीत्व नाहीसे होणार असेल तर ते शिक्षणच नव्हे; कारण शिक्षण हे प्रगतिपथाकडे नेणारे हवे. जर उलट दिशेकडे आपण जातो आहोत असे आढळले तर ते शिक्षण या सदरातच पडू शकत नाही.

### स्त्रीशिक्षण कशासाठी?

आज शिक्षित स्त्रीकडे पाहिले तर आपण होतो कुठे, जाणार कुठे काहीच कळत नाही. तिची खिन्नता मनाला उद्विग्न केल्याशिवाय राहत नाही व मन उदास बनते, अंतर्मुख बनते.

आज स्त्रिया शिक्षण घेताना दिसतात त्यामागची कारणे जर आपण पाहावयाची ठरविले तर ती काहीशी खालीलप्रमाणे आढळतील.

१. लग्नाच्या बाजारात मुलगी किती शिकली म्हणून विचारले जाते.

२. समाजपरिस्थितीमुळे मुले लवकर विवाह करण्यास तयार नसतात. तेव्हा मुलींनाही लग्न करेपर्यंत कुठेतरी गुंतवायचे.

३. परिस्थिती पडल्यास अर्थार्जनास समर्थ करणे.

४. श्रीमंतीचे प्रदर्शन - जसे इतर दागिने त्याचप्रमाणे एक भूषण म्हणून.

५. भोवतालच्या चार मुली शिकतात म्हणून.

६. पालकांची महत्त्वाकांक्षा.

पण यामध्ये मुलीच्या आवडीचा, तिच्या कुवतीचा, तिच्या भावी जीवनाचा विचार कितीजणांनी केलेला आढळतो? जीवन हे इतके योजनाशून्य होऊ शकेल का? व योजनाशून्य झाल्यास ते यशस्वी ठरू शकेल का? या प्रश्नांची उत्तरे आपल्याला आजच्या परिस्थितीकडे डोळसपणे पाहिले असता सापडू शकतील.

### महर्षी कर्व्यांचे प्रयत्न

स्त्रीशिक्षणाच्या लाटेबरोबर समाज पुढे ओढला गेला. मुलींना शिक्षण न देणे हे मागासपणाचे लक्षण समजले जाऊ लागले व आपल्या मुलींना शिक्षण न देणाऱ्या लोकांना जुनाट, पुराणमतवादी वगैरे शेलकी विशेषणे वापरण्यात येऊ लागली. इतर लोक आपल्याला सुधारक म्हणवून घेऊ लागले. पण? हा पण खिन्न करणारा आहे. शिक्षण देताना मुलांच्या बरोबरीने त्याच्याचसारखे शिक्षण देणे हे एकच उद्दिष्ट ठेवले गेले. अण्णांनी मुलींना शिक्षण सुरू केले तेव्हा






अनाथ, विधवा, परित्यक्ता वगैरे समाजबहिष्कृत वर्गच प्रामुख्येकरुन त्यांच्या नजरेसमोर होता. समाजात त्यांचे होणारे हाल त्या जर स्वतःच्या पायावर उभ्या राहतील, आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी होतील तर काहीशा प्रमाणात कमी होतील हा विचार त्यांच्या स्त्रीशिक्षणामागे होता व यातूनच त्यांच्या हिंगणे अनाथाश्रमाची कल्पना साकार झाली असे म्हणावयास हरकत नाही. पण यामध्येही स्त्रीजीवनाचा विचार करुन, मर्यादा लक्षात घेऊन व त्याचबरोबर त्यांचे श्रेष्ठत्व कुठे आहे हे ओळखून शिक्षणकार्यक्रम आखला गेला. आयुष्यात केव्हा कोणता प्रसंग येईल ते सांगता येत नाही. तरी आपल्या मुलीबाळींना शिकवावे व स्वतःच्या पायावर उभे राहण्यास समर्थ करावे, म्हणजे कोणत्याही प्रसंगात ती टिकाव धरु शकेल ही सुप्त भावना मुलींच्या शिक्षणाला प्रेरित करु लागली व हिंगणे शिक्षणसंस्थेचा व्याप वाढत गेला. अनेक ठिकाणी कन्याशाळा निघू लागल्या, हळूहळू अण्णांनी कॉलेजचे स्वप्नही साकार केले. स्त्रियांच्या दृष्टीने यामध्ये अनेक गोष्टींचा अंतर्भाव केला गेला. स्त्रीच्या जीवनोपयोगी शिक्षणाचा त्यात अंतर्भाव करण्यात आला, गृहशिक्षण, गृहशास्त्र, बालमानसशास्त्र यांसारखे भावी जीवनात उपयुक्त ठरतील असे विषय घालण्यात आले. यात बहुसंख्य स्त्रियांच्या जीवनाचा विचार होता. त्यांना मिळणाऱ्या वेळाचा, त्यांना आवश्यक त्या ज्ञानाचा, त्यांच्या परिस्थितीचा जास्तीतजास्त विचार केला गेला होता. पण या अभ्यासक्रमाची हळूहळू प्रगती होण्याऐवजी पीछेहाट होऊ लागली. स्त्रियांना आवश्यक त्या विषयांचा अंतर्भाव होता पण त्या विषयांत खोली निर्माण करण्याचा प्रयत्न झाला नाही व त्यामुळेच अभ्यासाशिवाय पदवी मिळविण्याचे विद्यापीठ या दृष्टीने लोक या विद्यापीठाकडे पाहू लागले. येथे शिक्षणाची पातळीच खाली उतरली व त्यामुळे शिक्षण, शिक्षण या पात्रतेस पोचेनासे झाले.

स्त्रीशिक्षणाच्या प्रवाहाबरोबर वाहत जाणारा सर्वसामान्य समाज अण्णांचे स्वप्न समजावून घेण्यास असमर्थ ठरला. समानतेची लाट शिक्षणक्षेत्रातही शिरली. स्त्रीला स्त्री म्हणून शिक्षणापासून वंचित करणे योग्य नव्हे असे म्हणणे व स्त्रीला समान हक्क प्रस्थापित करण्याकरिता पुरुषांसारखेच शिक्षण द्या असे म्हणणे या गोष्टी शंभर टक्के भिन्न आहेत याची प्रवाहपतित समाजाला कल्पनाच आली नाही. दोन चांगल्या तत्त्वांची गल्लत झाली व त्यातूनच आजचा भेडसावणारा प्रश्न निर्माण झाला.

आपल्या मुलींना मुलांच्या बरोबरीने प्रत्येक गोष्टीत स्पर्धा करावयास लावावयाची व ती पुरुषापेक्षा कशी यत्किंचितही कमी नाही याची शेखी मिरवायची ही एक फॅशनच पडत चालली व यातूनच स्त्रीचे स्त्रीत्व नाहीसे होऊ लागले असे विधान केले तर ते फारसे अतिशयोक्तीपूर्ण ठरणार नाही.

'कर्वे विद्यापीठात घालून आमच्या मुलींना भात-आमटी करावयास शिकवायचे नाही' अशा प्रकारची हेटाळणी करण्यासही लोक मागेपुढे पाहत नसत व या हेटाळणीला घाबरुनही कित्येक मुलीच मुलांच्या बरोबरीने त्यांच्याचसारखे शिक्षण घेण्याचा हट्ट धरु लागल्या. तो एक संक्रमण काळ होता. थोड्या विचारवंतांखेरीज़ इतरांना त्यातूनच पुढे निर्माण होऊ घातलेल्या समस्येची कल्पना नव्हती. स्त्रीशिक्षण ही गोष्ट मान्य होत आहे या आनंदाच्या धुंदीत या शिक्षणाला कशा तऱ्हेची कलाटणी मिळत आहे या गोष्टीकडे कानाडोळा झाला.

### आजची समस्या

पण त्या वेळी अमूर्त स्वरुपात असलेली समस्या आज मूर्त स्वरुपात आपल्यापुढे उभी आहे. स्त्रीशिक्षणातून स्त्रीची होणारी प्रगती लोकांना स्पष्ट जाणवत आहे. पण त्याचबरोबर त्यामुळे निर्माण होणारे दोषही भेडसावीत आहेत. दोषांचाच काटा तर वनजदार नाही ना हा विचार सतावत आहे. स्त्रीशिक्षणापासून परावृत्त होण्यास आज लोक तयार नाहीत, पण चालू परिस्थिती आहे तशीच चालावी असेही बिनदिक्कत म्हणत नाहीत.

आजची सुशिक्षित माता विचारांच्या कात्रीत सापडलेली दिसते व त्यांच्या तोंडून काहीसे खालीलप्रमाणे उद्‌गार ऐकू येतात -

१. कशाला झालो आम्ही एम ए.? मुलांच्या बरोबरीने आम्ही जर नोकरी करु शकणार नाही तर या शिक्षणात आम्ही शक्ती घालविलीच कशाला?

२. शिक्षणात शक्ती व आयुष्य घालविले. धड शिक्षणाचाही उपयोग नाही व धड संसारही मनापासून करता येत नाही अशी त्रिशंकूसारखी परिस्थिती झाली मात्र!

३. काय होतो आमच्या शिक्षणाचा उपयोग? वर्तमानपत्र वाचायलासुद्धा वेळ मिळत नाही. एकाची 'टॅ'

संपेपर्यंत दुसऱ्याची 'पॅ' सुरू होते. शिवाय यांची टुरटूर आहेच. स्त्री कितीही शिकली तरी चूलमूल काही सुटत नाही. पूर्वीच्या बायकांची शक्ती निदान शिक्षणात तरी खर्च होत नव्हती, ती आमची होते. एक पाहुणा आला तर गोळा उठतो छातीत. कामाची सवय नाही, कामाची माहिती नाही. आजपर्यंत ज्या गोष्टी केल्या, ज्या गोष्टी शिकले त्यांचा आजच्या जीवनाशी काडीचा संबंध नाही. माझ्या बेबीला आपली मी फार शिकवणारच नाही.

४. पूर्वीच्या संसाराशी तुलना केली तर आजचा माझा संसार प्रगत वाटतो का? माझ्या शिक्षणाचा प्रभाव त्यावर कोठे दिसतो?

५. सुखी होत्या बाई पूर्वीच्या बायका! माझ्यासारखी बहुरुप्याची कामं नव्हती त्यांना! घर सांभाळू का नोकरी? शिकलेच नसते तर कोणी म्हणणार नव्हते नोकरी कर म्हणून.

या किंवा अशा प्रकारच्या उद्गारात एक प्रकारची वैफल्याची आर्तताच जाणवते. घराचे घरपण राहिले नाही, स्त्रीचे स्त्रीपण राहिले नाही. स्त्री परत अंतर्मुख होऊ लागली. समाजाला परत एक धक्का मिळाला. समाजाने डोळे थोडेसे किलकिले केले आहेत व विचारवंतांना 'स्त्रीपुरुषांना एक शिक्षण द्यावे का? फरक हवा का? कोणता?' ही प्रश्नचिन्हे भेडसावू लागली आहेत व वस्तुस्थितीचा विचार करूनच हे प्रश्न सोडवावे लागतील.

## स्त्रीचे कार्यक्षेत्र व जबाबदाऱ्या

कोणत्याही विषयावर विचार करताना असलेली परिस्थिती डावलून चालत नाही तसेच ती गोष्ट ज्या समाजात रुजवायची असते त्या समाजाची ठेवण, तेथील संस्कृती, समाजाच्या अनुषंगाने येणाऱ्या जबाबदाऱ्या या सर्व गोष्टींचा विचार करावा लागतो. भारतीय संस्कृतीचे वैशिष्ट्य टिकवायचे असेल, तिचे पाश्चात्यीकरण करावयाचे नसेल तर तेथील परिस्थितीचा विचार हा सहशिक्षणाच्या अनुषंगाने करावा लागेल. परवाच एक विदुषी मला म्हणाल्या, 'स्त्री आणि पुरुष यांच्या शिक्षणात भेद करण्याचे काय कारण?' आज आपला समाज शिकलेल्या स्त्रीला नोकऱ्या देऊ शकत नाही, दिल्यास तिच्या अडचणींचा सहानुभूतीने विचार करू शकत नाही हा समाजाचा दोष आहे. पण हे विधान अतिरेकी आहे. समाजाची विशिष्ट रचना काही प्रमाणात बदलता येईल. पण बऱ्याच प्रमाणात ही चौकट गृहीत धरूनच या पार्श्वभूमीवर स्त्रीशिक्षणाचा विचार केला पाहिजे.

'गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते!' हे खरे. पण ही गृहस्वामिनी कोणती? जी खरोखरीच घराचे नंदनवन बनवू शकते व आपणही त्या नंदनवनातील आनंद उपभोगू शकते. कमीतकमी वेळात, कमीतकमी शक्ती खर्चून जास्तीतजास्त सुबक वस्तू बनविणे, घराची व्यवस्था ठेवणे, घरची कामे जास्तीतजास्त लीलेने कशा तऱ्हेने करता येतील यावर विचार करणे, घर हेच संशोधनक्षेत्र बनविणे व मुलांच्या योग्य विकासावार लक्ष केंद्रित करणे हे सुशिक्षित स्त्रीला जमले पाहिजे. मुलाला एवढेतेवढे काय झाले की केवळ आकाशपाताळ एक करण्यापेक्षा मुलाच्या वाढीचे टप्पे, त्यांतील फरक, निर्माण होणाऱ्या समस्या यांचे अवलोकन करणे व याबाबत अनुभवाने संशोधन करणे हे कार्य स्त्रीला करता येईल. पण केव्हा? ती सुशिक्षित असेल तर व तिच्या शिक्षणात असा दृष्टिकोन तिला दिला असेल तर. केवळ परंपरागत पद्धतीनेच सर्व गोष्टी झाल्या पाहिजेत का? त्यात सहजता, सुकरता निर्माण करण्याचा प्रयत्न का होऊ नये? केवळ नोकरी करूनच शिक्षणाचे सार्थक होते का? प्रयोगशाळेत जाऊनच प्रयोग होतात का? याचा विचार झाला पाहिजे. जुन्या कल्पना बदलल्या पाहिजेत. केवळ नोकरीला तयार करणारे शिक्षण हे स्त्रीला नको आहे. परिस्थिती पडली तर तिला नोकरी करता यावी इतपतच नोकरीचा विचार यात हवा. पण स्त्रीचे शिक्षण हे स्त्रीला स्वतःच्या घरात स्वतःच्या पायावर उभे राहण्यास समर्थ करणारे हवे. ज्या समाजातील स्त्री आज शिक्षण घेते आहे, त्या समाजात अद्याप घर हेच स्त्रीचे कार्यक्षेत्र आहे. तिला घराबाहेर ओढणारे शिक्षण नको. तिला ज्ञानाचे दरवाजे खुले करा; पण घराचे दरवाजे बंद करून घराबाहेर ढकलू नका. तिच्या कोमल भावना घराभोवतीच रिंगण घालत असतात. त्या घराचाच स्वर्ग ती बनवू शकेल असे शिक्षण देणे ही आजची गरज आहे व ते कशा तऱ्हेचे असावे याचाच आज विचार करावयाचा आहे.

## काही सूचना

पूर्वप्राथमिक व प्राथमिक शिक्षण मुलामुलींचे एकाच तऱ्हेचे व एकाच पातळीवर होण्यास हरकत नाही. कारण शिक्षण घेण्यास समर्थ बनविणे हेच बरेचसे कार्य






शिक्षणामध्ये होत असते, लेखन, वाचन, हस्तव्यवसाय, चित्रकला, अंकज्ञान, साध्या बेरजा-वजाबाक्या हे ज्ञान पुढे शिक्षणाची जी इमारत उभारावयाची तिला पायाभूत ठरते. जगाची तोंडओळख यातून सुरु होते व या दृष्टीने येथे फारकत करण्याची गरज दिसत नाही. पण आठवीपासून यामध्ये तफावत केल्यास फायदेशीर ठरेल का असा प्रश्न उभा राहतो.

रसायन, विज्ञान या शास्त्रापेक्षा शरीरशास्त्र, गृहशास्त्र यांवर अधिक भर दिल्यास ते मुलींच्या दृष्टीने हिताचे ठरणार नाही का? आज शिकणारी मुलगी घरापासून जास्तीतजास्त दूर चाललेली आहे. 'जाऊ दे, मुलगी शिकते आहे. तिला कशाला त्रास! असे म्हणून घरातून मुलीला पूर्ण मोकळी सोडणारे काही पालक दिसतात. तर 'नुसतं शिकून करायचंय काय? घरातलं काही यायला नको?' असे प्रश्न विचारणारेही पालक आढळतात. आजच्या शिक्षणातील दोन्ही तऱ्हेच्या पालकांच्या मुलींची कुचंबणा होते. घरातून पूर्ण दूर ठेवलेल्या मुलीला पुढील जीवनात स्वतःला पूर्णपणे अनभिज्ञ अशा क्षेत्रात पडावे लागते व अगदीच तारांबळ होते. दुसऱ्या तऱ्हेच्या घरातील मुलींना परस्पर समन्वय नसलेल्या, घर व शाळा यांतील दुहेरी जबाबदाऱ्या उचलावयास लागल्याने त्यांच्या प्रकृतीवर, शरीरावर, मनावर परिणाम तरी होतो किंवा एक काम केवळ यांत्रिक पद्धतीने सांगकाम्याच्या पद्धतीने केले जाते.

या दृष्टीने घर व शाळा यांतील कामात जर समन्वय साधला जाईल तर मुलींच्या, समाजाच्या व पालकांच्या ते जास्त हिताचे होईल. शिक्षण म्हणजे काय? जे जगावयास समर्थ बनविते ते आणि हे जगणे कसे? तर निरोगी शरीरे व निरोगी मने यांच्या समन्वयाने साधणारे. शाळा व घर जर हातात हात घालून पुढे जाण्यास सरसावतील तर एकाच दिशेने वाहणारा जीवनओघ हा जास्त प्रबळ व प्रभावी बनेल.

या दृष्टीने मातांच्या सहकार्यातून, सुशिक्षित मातांच्या विचारविनिमयातून व स्त्रीच्या भावी जीवनाचा विचार करून जर काही योजना आखली तर ती जास्त उपयुक्त ठरेल व पडणाऱ्या जबाबदाऱ्या सुशिक्षित मुलींना जास्त डोळसपणे उचलता येतील. याकरिता महिलामंडळे, स्त्रीशिक्षणसंस्था व समाजातील विविध थरांतील अनुभवी हुषार स्त्रिया या सर्वांनी एकत्रित येऊन त्यावर चर्चा केली पाहिजे. केवळ उच्च पातळीवरून उच्चभ्रू लोकांच्या कमिट्या नेमून हे काम होणार नाही. यात अनुभवाने पोळलेल्या, परिस्थितीकडे डोळ्यांत तेल घालून पाहणाऱ्या व भावी पिढीबद्दल आस्था असलेल्या स्त्रिया व निरपेक्ष व निःस्वार्थी दृष्टीने या विषयावर विचार करणारे पुरुष असणे आवश्यक आहे. इतर देशांत काय चालले आहे हे पाहताना त्याची सहीसही अंध नक्कल न करण्याबद्दल दक्षता घेणे आवश्यक आहे.

अभ्यासक्रम आखताना सुगृहीणीची मते व विचार लक्षात घ्यावयाची तितकीच प्रत्यक्ष अभ्यासक्रम पार पाडतानाही ती घेणे हितावह ठरेल. प्रायोगिक प्रात्यक्षिके शाळा-कॉलेजातून होतीलच, पण त्याहीशिवाय प्रत्यक्ष ज्ञान व अनुभव या दृष्टींनी घराचा जर उपयोग केला तर तेही फायदेशीर ठरु शकेल. आजकाल सुट्टी-घरे, सांभाळ-घरे वगैरे कल्पना पुढे येत आहेत. त्यातच याही कल्पनेचा विचार करता येईल. भावी जीवनात उचलावयाच्या जबाबदारीची येथे उमेदवारी करावयाची व सैद्धांतिक, प्रायोगिक व प्रात्यक्षिक अशा तऱ्हेच्या आपल्यावर पुढे पडणाऱ्या प्रत्येक जबाबदारीचे बाळकडू घ्यावयाचे ही या मागची कल्पना आहे व योग्य योजना आखल्यास हे फारसे शक्य नाही. शिलाई, धुलाई, बालसंगोपन, बाळ-बाळंतिणीची निगा, निरनिराळे पदार्थ बनविताना घ्यावयाची दक्षता, टापटीप, काटकसर वगैरे अनेक गोष्टींचे अशा तऱ्हेने शिक्षण घेणे आवश्यक आहे.

'याला शिक्षण हवेच कशाला? न शिकताही या गोष्टी आमच्या जुन्या बायकांनी केल्या' असेही म्हणणारे लोक आहेत. पण त्या करीत असलेल्या बऱ्याचशा गोष्टी अंधपणाने मागील पानावरून पुढे चालू या पद्धतीनेच केल्या जात होत्या. त्यात विचार ही गोष्ट कमी होती. अंधश्रद्धा जास्त होती. शिक्षणातून डोळस श्रद्धा, डोळस अनुकरण या गोष्टी आपल्याला साधावयाच्या आहेत. बाळंतिणीची खोली कशी असावी? पूर्वीच्या बाईने परंपरागत पद्धतीनेच ती तयार केली असती. आजची सुशिक्षित स्त्री निरनिराळ्या देशांत कोणत्या पद्धती आहेत, आपल्याकडे कोणती पद्धत होती, आज त्यात बदल काय झाला आहे व कोणता बदल घडवून आणणे जरूर आहे याचा डोळसपणे विचार करेल. वाचन करून, निरीक्षण करून, चर्चा करून माहिती मिळवेल व नंतर निर्णय घेईल व घेतलेला निर्णय चुकीचा वाटल्यास निःसंकोचपणे कबूल करून त्यात परतपरत फरक करून

पाहील. ही विचारी वृत्ती, ही डोळस वृत्ती, ही संशोधक वृत्ती आपल्या शिक्षणातून दिली पाहिजे व या दृष्टीने विशिष्ट अभ्यासक्रम आखून शिक्षण झाले पाहिजे. सुशिक्षित व अशिक्षित स्त्रीमधला फरक स्पष्ट होण्याइतका प्रकर्षाने दिसला पाहिजे. या दृष्टीनेच बालविकासाचा प्रश्नही तिला हाताळता आला पाहिजे. मुलींच्या वाढीचे स्वाभाविक टप्पे कोणते, त्यात अस्वाभाविकपणा कोणत्या तऱ्हेने निर्माण होतो, त्याची कारणे काय, कोणत्या गोष्टींमुळे मुलांच्या मध्ये वर्तनसमस्या निर्माण होतात - या व अशाच तऱ्हेच्या प्रश्नांकडे शास्त्रीय दृष्टीने पाहण्याचा कल वाढविणे हे शिक्षणात साध्य करावयाचे असते व यात सैद्धांतिक शिक्षणाबरोबर प्रायोगिक व अनुभवजन्य शिक्षणही आवश्यक आहे व त्यामुळे केवळ पुस्तकी झालेल्या ज्ञानाचा एकांगीपणा हा शिक्षणावरील ठपका दूर करता येईल.

### आजचे काही प्रयत्न

स्त्रियांना अशा तऱ्हेने स्वतंत्र शिक्षण हवे आहे याची जाणीव आज झालेली दिसतेच व त्या दृष्टीने काही प्रयत्नही आपल्याकडे चालू आहेत. ते प्रयत्न प्रथम विचारात घेऊन त्यात कोणता बदल आवश्यक आहे ते आपण नंतर पाहू.

या दृष्टीने चालू असलेले प्रयत्न म्हणून खालील गोष्टी निर्देशित करता येतील.

१. अण्णांच्या शिक्षणसंस्था, २. बडोदा विद्यापीठाचा गृहशास्त्राचा अभ्यासक्रम, ३. दिल्ली विद्यापीठाचा गृहशास्त्राचा अभ्यासक्रम, ४. बालमानस-शास्त्राची निरनिराळ्या विद्यापीठांतून असलेली सोय, ५.दुय्यम शालांत परीक्षेमध्ये गृहशास्त्र, शरीरशास्त्र, चित्रकला, गायन वगैरें विषयांची सोय, ६. कोल्हापूर येथील स्त्रीशिक्षणाकरिता म्हणूनच चालविलेली गृहशिक्षणसंस्था, ७. मुंबईतील गृहिणी महाविद्यालय.

वर निर्दिष्टिलेल्या संस्थांत स्त्रियांना उपयुक्त असे विषय अभ्यासक्रमात घातले आहेत. पण त्यांमधून काही कमतरता दूर करण्याचा प्रयत्न झाला तर स्त्रीशिक्षणाला योग्य वळण मिळण्यास हरकत दिसत नाही.

या ठिकाणी अभ्यासक्रमाला बरेचसे सैद्धांतिक स्वरूप आहे. त्यात असलेल्या प्रात्यक्षिकातही व्यावहारिक दृष्टिकोन फारसा आढळत नाही. व्यवहारी जीवनाच्या कोंदणातून सैद्धांतिक शिक्षण पडताळून पाहण्याची ही संधी ही महत्त्वाची गोष्ट आहे व तिचीच आजच्या शिक्षणात कमतरता आहे. केवळ स्त्रियांकरिता म्हणून आखलेल्या या अभ्यासक्रमालाही बरेचसे परीक्षापद्धतीने जखडले आहे व इतर शैक्षणिक मूल्यांपेक्षा नोकरीच्या दृष्टिकोनातूनच त्याच्याकडे पाहिले जाते. अर्थात हे एक उद्दिष्ट यामध्ये प्रामुख्याने दिसते. तुलनात्मक वाचन, चर्चा, उपयोजन या गोष्टी अभावानेच जाणवतात. केवळ स्त्रीच्या शिक्षणातच हा दोष आहे असे नाही. आपल्या सर्वच शिक्षणपद्धतीत हा दोष आहे. पण नोकरी करून अर्थार्जन हे निदान आपल्याकडील ९० टक्के स्त्रियांचे ध्येय असत नाही व मुलाबाळांची, संसाराची खरी काळजी घ्यावयाची असेल, घराला घराचेच स्वरूप रहावयाचे असेल, जर त्याचे खानावळीत, बाजारी स्वरूपात, धर्मशाळेत रूपांतर होऊ नये असे वाटत असेल तर त्याची शिक्षणातूनच बीजे पेरली गेली पाहिजेत.

### अभ्यासक्रमाची रूपरेखा

मुलांच्या जीवनातील पहिली पाच वर्षे ही वाढीच्या व विकासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वपूर्ण ठरतात. चारित्र्याची मुहूर्तमेढ या वयातच होत असते. मुलांचे स्वभावघटक या वेळी ठरत असतात. या वेळी मूल अप्रत्यक्ष तऱ्हेनेच बऱ्याचशा गोष्टी शिकत असते व अशावेळी सूज्ञ, सुशिक्षित, सुदृढ शक्ती द्यावयास समर्थ, सोशिक माता ही मुलांच्या भोवती जास्तीतजास्त असावी लागते. मुलाच्या शरीराची व मनाची दोहोंचीही या वयातील वाढ ही फारच जलद असते व ती बरीचशी स्थायी स्वरूप धारण करते. अशावेळी ही जबाबदारी उचलण्यास पगारी माणसे जितकी असमर्थ आहेत तितकीच अज्ञ माताही असमर्थ आहे. मुलांच्या निरोगी वाढीकरिता व निकोप विकासाकरिता प्रेम हवे, पण ते डोळस प्रेम हवे. हे डोळस प्रेम असण्याकरिता स्त्रीला मुलाच्या वाढीची व विकासाची शास्त्रीय माहिती हवी. म्हणजेच, मुलाच्या आरोग्यशास्त्राची व मानसशास्त्राची माहिती हवी. सर्वसामान्य मुलाची वाढ कशी होते, त्यामध्ये बदल कसे आढळतात, हे आढळणारे बदल स्वाभाविकच केव्हा ठरतात, मुलाच्या खाण्यापिण्याच्या बाबतीत, कपड्यालत्त्यांच्या बाबतीत, झोप, खेळ, स्नान वगैरे बाबतीत अनेक अनुभवांतून बसविलेले आडाखे कोणते आहेत, त्यात देशकालमानाप्रमाणे बदल कसा होतो व कसा करावा लागतो या गोष्टींची प्रत्यक्ष निरीक्षणातून, वाचनातून, चर्चेतून



अनुक्रमणिका

माहिती मिळवलेली हवी व या माहितीत योग्य ती भर घालण्याची तयारी हवी. या बाबतीत डोळस जागरूकतेचे बाळकडूच मुलींना शिक्षणातून देणे आवश्यक आहे. 'जिच्या हाती पाळण्याची दोरी ती जगाते उद्धारी' या म्हणीतील अर्थ खरा करावयाचा असेल तर या गोष्टीला समर्थ बनविणारी स्त्री ही आपल्या शिक्षणातून बनली पाहिजे. मुलांना निजवताना म्हणावयाची गीते, मुलांच्या सान्निध्यातील मातेची वागणूक, मुलाला माता सांगत असलेल्या गोष्टी - प्रत्येकाचा मुलावर परिणाम होत असतो. आईच्या दुधातून आई मुलाला विचार आणि भावना देते म्हणतात. हे जर खरे, तर मातेचे विचार, भावना यासुद्धा या दृष्टीने बनविल्या पाहिजेत.

या दृष्टीने प्रत्येक मुलीला खालील गोष्टी अभ्यासक्रमात महत्त्वाच्या आहेत असे म्हणावयास हरकत नाही. १. बालवाङ्मय, निरनिराळ्या वयाच्या मुलांना आवडतील अशी गाणी, कविता, गोष्टी, चरित्रे ही तिला माहीत हवीत व मुलांना त्या सांगण्याचे कौशल्य तिच्यात हवे. तसेच आपल्याकडील व इतर देशांतीलही बालवाङ्मयाचा अभ्यास झाला असल्यास उपयोग होतो. यातूनच ती पुढे आपल्या मुलांची वाङ्मयीन अभिरुची वाढीला लावू शकते. २. नाट्यीकरण, संगीत, चित्रकला, हस्तव्यवसाय यांसारख्या कलाप्रधान विषयांकडे सर्वसामान्य स्त्रीचा कल असतोच. त्यात नैपुण्य मिळविल्यास मुलांच्या कृतीप्रवृत्तीच्या दृष्टीने आई त्यांना कितीतरी मदत करु शकेल. ३. शरीरशास्त्र, आहारशास्त्र, आरोग्यशास्त्र, व्यायामाचे महत्त्व, निर-निराळ्या वयास योग्य व्यायाम यांची तिला माहिती हवी. ४.निरनिराळ्या खेळांचीही तिला माहिती हवी व काही खेळांत तरी नैपुण्य हवे. विशेषतः मुलांच्यापैकीच एक होऊन त्यांच्यात समरस होऊन खेळण्याची गोडी वाढविली पाहिजे. हे कार्य शिक्षणातून साधता येईल व प्रात्यक्षिकांचीही सोय करता येईल. ५. मुलांच्या दृष्टीने विविध तऱ्हेचे संग्रह कोणते करता येतील व त्यातूनच संचय-प्रवृत्तीचे उदात्तीकरण कसे होईल याचे तिच्यातील हे छंद वाढवून शिक्षण देता येईल. ६.बालमानसशास्त्राचे सैद्धांतिक ज्ञान व त्याचबरोबर फार जवळून मुले पाहण्याची संधी व प्रत्यक्ष शिक्षण या दृष्टीने शिक्षणसंस्थांतून पाळणागृहे वगैरेंची योजना आखावयास हरकत नाही किंवा इतर काही व्यवस्था आखता येईल. ७.बाळबाळंतिणीची काळजी, बाळंतिणीची खोली याही बाबतीत सैद्धांतिक व प्रात्यक्षिक शिक्षणाची सोय हवी. ८.शरीरपोषक सत्वांचा ऱ्हास न करता रुचकर, थोडक्या खर्चात, थोड्या वेळात खाद्यपदार्थ बनविण्याचे सैद्धांतिक व प्रात्यक्षिक शिक्षण दिले पाहिजे. याशिवाय या बाबतीतील सर्वसामान्य तत्त्वांचीही ओळख करून दिली पाहिजे. ९.शिवण-टिपण, भरतकाम, विणकाम यांसारख्या उपयुक्त व स्त्रीच्या स्वाभाविक आवडीच्या विषयात अनुभव हवा. १०.भावनात्मक शिक्षण, भावनिक समतोल, समाजातील विसंवादित्व टाळण्याकरिता करावयाचे उपाय, समाज-तडजोड याबाबत सामान्य माहिती दिली जावी. ११.बालमार्गदर्शन, बालमार्गदर्शन केंद्रे यात मातेचे, शिक्षकाचे, वडिलांचे व मुलांच्या संदर्भातील इतर सर्व व्यक्ती व संस्था यांचे कार्य याची सर्वसामान्य माहिती हवी. वर्तनसमस्या व त्यांचे गांभीर्य यांची जाणीव हवी. या दृष्टीने बालमार्गदर्शनाचा अभ्यासक्रमात अंतर्भाव महत्त्वाचा ठरतो. १२. वाचनालये व त्यांचा उपयोग याचे शिक्षणही स्त्रीला आवश्यक ठरते. १३. मातृभाषा, राष्ट्रभाषा व इंग्रजी हा किंवा अशाच तऱ्हेचा अभ्यासक्रम आखून त्यातच जास्तीतजास्त खोली - डेप्थ - मिळविण्याचा प्रयत्न प्रत्येक स्त्री करेल तर ती आपला संसार चांगल्या तऱ्हेने करावयास समर्थ होईलच. शिवाय नोकरी, संशोधन, आत्मविकास या गोष्टींतही तिला वाव राहील. या दृष्टीने विचार करण्याची आज वेळ आलेली आहे. सर्वसामान्य रुपरेषा वर चर्चिलेली आहे. यावरच जास्त चर्चा व विचार करून सविस्तर अभ्यासक्रमाची मांडणी करता येईल. सुरुवातीपासून संशोधनापर्यंतच्या शिक्षणाची स्वतंत्र सोय करता येईल. यात स्त्रीची बुद्धी कमी लेखली तर जाणार नाहीच पण तिला योग्य पैलू पडतील व तिच्यातील तडफ विकसित होईल.

स्त्रीपुरुषांच्या शिक्षणाची पातळी तर तीच राखली पाहिजे; पण अभ्यासाचे क्षेत्र व विषय यांत योग्य तो बदल हवा व ही खरी गरज आहे. स्त्रीची बुद्धी कमी नाहीच, उलट चिकाटी वगैरेंसारखे गुण तिच्यात जास्तच आढळतात. तिच्या कार्यक्षेत्राचा विचार शिक्षणात व्हावा, इतकेच. जर हा विचार योग्य तऱ्हेने झाला नाही तर स्त्रीशिक्षणाचा लंबक परत दुसऱ्या टोकाला जाण्याची शक्यताच अधिक दिसते.

☑☑☑

# ग्रामीण स्त्रियांच्या शिक्षणातील अडसर

**डॉ० रोहिणी गवाणकर / उषा ठक्कर**

महात्मा जोतिबा फुले व सावित्रीबाई फुले या दंपतीने १९ व्या शतकात महाराष्ट्रात स्त्री शिक्षणाची मुहूर्तमेढ रोवली. आज त्या घटनेला १४४ वर्षाहून अधिक वर्षे झाली. शहरामधील कनिष्ठ व मध्यमवर्गीय समाजात स्त्रीशिक्षणा-बाबत आता समाजमानस तयार झाले आहे. मुलींचे स्वत:च्या पायावर उभे राहण्याइतके शिक्षण ही आज तिची व कुटुंबाची गरज झाली आहे. शहरातून अशी परिस्थिती असली तरी खेड्यात व लहान शहरात मात्र स्त्री शिक्षणाला खऱ्या अर्थाने संपूर्ण अनुकूलता आहे, असे म्हणता येणार नाही. ग्रामीण मुलीचे शिक्षण सर्वसाधारणपणे लिहिता वाचता येण्यापुरते होते. तिसरी - चौथीपासूनच मुलींची शाळातून गळती सुरु होते. शिक्षण मिळाल्या-शिवाय स्त्री खऱ्या अर्थाने मुक्त होणार नाही हे विधान आता सर्वमान्य आहे. ग्रामीण मुलीचा मुक्तीचा मार्गही शिक्षणाच्या माध्यमातूनच जातो. ग्रामीण शाळातून मुलींची भरती व गळती यांचा विचार करत असताना, ग्रामीण भागात किंवा शहरातील झोपडपट्टी भागात राहणाऱ्या ग्रामीण समाजातील मुलींच्या शिक्षणाबाबतच का अडथळे येतात, त्याचा विचार करणे आवश्यक ठरते.

आज शहरी भागातून स्त्रियांच्या शिक्षणाकडे पहायचा दृष्टिकोन व ग्रामीण भागातील लोकांचा स्त्री शिक्षणाकडे पहायचा दृष्टिकोन यात महदन्तर दिसते. शहरातून राहणाऱ्या मुलींचे शिक्षण हे नोकरी - व्यवसायाला अभिमुख असते. (Joboriented.) मुली व पालक स्त्री - पुरुषांना समान असणारा अभ्यासक्रम पसंत करतात. डॉक्टर, वकील, इंजिनियर, प्राध्यापक, पदाधिकारी इत्यादी प्रकारचा व्यवसाय करून, शिक्षणाद्धारे पैसा व प्रतिष्ठा प्राप्त करून घेणे हा शहरातील स्त्रियांचा शिक्षण प्राप्त करून घेण्यामागचा एक महत्त्वाचा हेतू असतो. इतकेच नव्हे तर पैसा व प्रतिष्ठा प्राप्त करून घेऊन अनुरुप जोडीदार मिळविण्याचे एक साधन म्हणूनही शहरातील लोक मुलींच्या शिक्षणाकडे पाहतात. कनिष्ठ - मध्यम वर्गातील पालक सोडल्यास मध्यम व वरिष्ठ वर्गातील पालक आपल्या मुलींच्या शिक्षणासाठी धडपडत असतात. ग्रामीण भागात असे चित्र दिसत नाही. मुलीला शिक्षण दिलेच पाहिजे हा आग्रह तिथे नसतो. शिकल्या तरी त्यांचे क्षेत्र चूल व मूल व न शिकल्या तरी तेच, असा विश्वास. त्यामुळे मुली सहज शिकल्या तर शिकू देत. पण त्यांना अट्टाहासाने शिकविण्याची गरज ग्रामीण जनतेला वाटत नाही. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा शासकीय उपायही इथे यशस्वी झालेला दिसत नाही. असे का होते? या भागातील मुलींच्या शिक्षणातील खरे अडसर कोणते? त्याचे स्वरुप काय? इत्यादीचा विचार होऊन त्यावर उपाययोजना होणे हे अगत्याचे आहे.

डॉ. लीला पाटील (मौनी विद्यापीठ, गारगोटी) यांनी गारगोटी व मडूर या दोन गावातील महिलांच्या सर्वेक्षणाद्धारे वरील मुद्यांचा विचार केला होता. त्यांच्या निष्कर्षाप्रमाणे ग्रामीण महिलांना आपल्या मुलींना आपल्या सारखे अडाणी राहू नये, थोडे तरी शिक्षण घ्यावे असे मनापासून वाटते. पूर्वी मुलींच्या शिक्षणाला घरातील बायकांचाही विरोध असे हे अनेकींच्या आत्मचरित्रावरुन स्पष्ट होते. म्हणून ग्रामीण भागात मुलींच्या शिक्षणाला वेग न येण्याची इतर कारणे तपासून बघणे जरुरीचे वाटते.

मुलींच्या शिक्षणाचा विचार करताना कौटुंबिक, सामाजिक, आर्थिक व राजकीय परिस्थितीकडे दुर्लक्ष करून तो विचार होऊ शकणार नाही. या सर्व गोष्टींचा एकत्रित परिणाम होऊनच ग्रामीण मुलींच्या शिक्षणाच्या मार्गात अडथळे उत्पन्न होतात. ग्रामीण समाजरचना ही शेतीप्रधान. शेतात काम करण्यासाठी जेवढे हात असतील तेवढे कमीच असतात. लहान हात लहान लहान कामांकरिता उपयुक्त असतात. थोडी का होईना त्यांना बालमजुरी मिळते. म्हणून आपल्या अपत्यांना शाळेत पाठविण्यापेक्षा आपल्याबरोबर शेतात नेऊन मजुरीला लावताना मुलगा व मुलगी असा भेद करत नाही. त्यामुळे मुलींप्रमाणे मुलांच्याही शिक्षणाला अडथळा असतोच. पण त्याचे प्रमाण कमी असते एवढेच. दोन भावंडामध्ये अंतर कमी असेल तर मोठ्या मुलीवर लहान भावंड सांभाळण्याची जबाबदारी येते. लहान भावंडांची संगोपन व्यवस्था हा कुटुंबातील मोठ्या मुलीचा धर्मच मानला जातो. शेतीला पूरक







अनुक्रमणिका

अशा कार्यात हातभार हा मुलींनाच लावावा लागतो. धान्य - सफाई, लाकूड - फाटा, शेण गोळा करणे, पशुसंगोपन, पेरणी व निंदणीसारखी कामे करण्यात ग्रामीण मुलींचा वेळ संपून जातो. ग्रामीण भागातील संयुक्त कुटुंबपद्धतीही नामशेष होत चालल्याने ग्रामीण मुलीची घरकामे मोठ्या प्रमाणावर वाढलेली आहेत. हंगामकाळात त्यांना शेतीची कामे वडीलधाऱ्यांबरोबरीने करावी लागतात. सारांश मुलींच्या सहभागामुळे ग्रामीण समाजाला शेतीसाठी आवश्यक श्रमपुरवठा होतो. अर्थार्जन करण्याच्या वयापर्यंत मुलींनी केलेल्या श्रमांचे मूल्यांकन केल्यास एक मुलगी रू. ४० हजारांपेक्षा अधिक अर्थार्जन करते, असा एका अभ्यासाचा निष्कर्ष वाचावयाला मिळतो. सक्तीचे घरकाम व शेतातील काम या दोहोंमुळे मुलींच्या शिक्षणावर आघात होऊन त्यांना शिक्षणाला पारखे व्हावे लागते. इच्छा असूनही त्यांना शिक्षण सोडावे लागते. प्राथमिक शिक्षण सक्तीचे असले तरी गावातील एक शिक्षकी शाळेतला शिक्षक मुलांच्या घरी जाऊन, मुले शाळेत का येत नाहीत, याची चौकशी करून येत नाही. ती करावी अशी त्याच्यापासून अपेक्षा असते. हा शिक्षक अशा चौकशी करता वेळ देऊ शकत नाही, याचीही कारणे आहेत. शिक्षक जर दुसऱ्या खेड्यात राहत असला तर रोज ये - जा करण्यात त्याचे २ -३ तास सहज जातात. शिवाय जिल्हा परिषदेच्या व पंचायत समितीच्या सामाजिक योजना राबविण्यात त्यांच्या सहकार्याची अपेक्षा (खरे म्हणजे सक्तीच) असते. त्याशिवाय ग्रामपंचायत, जिल्हा परिषदा व पंचायत समितीच्या प्रमुखांनी सांगितलेली कामेही त्यांना बिनतक्रार पार पाडावी लागतात. या सर्वासाठी ते इतके दबले जातात की, शाळेतील अभ्यासक्रम पार पाडणे, मुलांच्या वैयक्तिक विकासाकडे लक्ष पुरविणे या गोष्टींसाठी वेळच उरत नाही.

मुलींच्या शिक्षणाच्या मार्गात येणारा दुसरा सामाजिक अडसर म्हणजे बालविवाहाची प्रथा. बालविवाह प्रतिबंध कायदा होऊन ६२ वर्षे झाली. परिवार नियोजन व मुला - मुलींच्या स्वत:च्या आरोग्याचा प्रश्न लक्षात घेऊन लग्नासाठी मुलीचे वय १८ व मुलाचे वय २१ असावे, अशी सुधारणाही या कायद्यात करण्यात आली. प्रत्यक्षात मुलीच्या जन्माची नोंदच ग्रामपंचायतीत झालेली नसते. त्यामुळे साधारण वयात आलेली मुलगी १८ वर्षांचीच आहे असे दडपून सांगितले जाते. गावातील कोणीही त्याच्या विरोधात उभे रहात नाही व लग्न सर्वांच्या साक्षीने पार पडते. मुलगी शाळेत जात असेल तर लग्न नक्की झाल्याबरोबर ती शाळा सोडून घरी बसते. मुलीची अब्रू म्हणजे काचेचे भांडे. एकदा फुटले की, परत सांधता येत नाही. मुलगी वयात आली व काही विपरीत घडले तर केवळ तिचेच नव्हे तर सबंध कुटुंबाचे जीवन उध्वस्त होईल या भीतीने ग्रामीण भागात कायदा धाब्यावर बसवून मुलींची लग्ने केली जातात. शिक्षणापेक्षा तिच्या सुरक्षिततेचा अधिक ध्यास तिच्या आईवडिलांना असतो.

या सामाजिक अडसरांबरोबरच आर्थिक अडसरही मुलींच्या शिक्षणाच्या वाटेत येतात. १४ वर्षांखालील मुलांना कामावर न ठेवण्याबाबत कायदा कारखानदार बिनदिक्कत मोडतात. घरगुती कामासाठी तर लहान मुले अधिक पसंत केली जातात. घरातली लहान - सहान सर्व कामे, मुले सांभाळणे, बाजार हाट करणे (वर त्यांना दमात ठेवणे.) ही कामे होण्यासाठी लहान मुले अतिशय उपयुक्त असतात. लाचार पालकांसमोर मुलांना व कुटुंबाला जिवंत ठेवण्यासाठी मुलांना बालकामगार बनविण्याशिवाय दुसरा उपाय नसतो. या बालकामगारांपैकी शे. ९० मुली असतात. हे काम अवेतनिक असते. रोजमजुरीवर व पीसवर्कवर या मुली राबराब राबतात. घरी गेल्यावर घरकाम असतेच. कुटुंबाच्या आर्थिक गरजेपायी मुलींना शाळेत पाठविले जात नाही.

१९९१ मध्ये महाराष्ट्र राज्यात स्त्री शिक्षणाचा दर ५० - ५१ इतका असला तरी ग्रामीण भागात तो अतिशय कमी आहे. विशेषत: आंध्र प्रदेश, अरूणाचल प्रदेश, बिहार, हरियाणा, जम्मू काश्मिर, मध्य प्रदेश, ओरिसा, राजस्थान, सिक्कीम, उत्तर प्रदेश, दादरा व नगर हवेली राज्यांमध्ये ग्रामीण महिलांच्या शिक्षणाचा दर अतिशय कमी आहे हे लक्षात घेता ग्रामीण महिलांच्या शिक्षणामध्ये राजकीय अडसरी आहेत, असे जाणवते. भारत सरकारने मार्गदर्शक तत्त्वामध्ये मांडलेले १४ वर्षांपर्यंतच्या सर्व मुलांसाठी सार्वत्रिक प्राथमिक शिक्षणाचे ध्येय गाठणे अद्याप आपल्याला शक्य झाले नाही. पटावर नोंद न झालेल्या मुलांपैकी २/३ मुली आहेत व त्यांच्यापैकी ३/४ मुली शैक्षणिक दृष्ट्या मागासलेल्या देशातील आहेत. शिक्षणातील विषम सहभाग व विषम विकास हा स्वातंत्र्योत्तर काळातील रचनात्मक व सांस्कृतिक विषमतेस फार मोठ्या प्रमाणावर जबाबदार आहे. ग्रामीण भागातील नवशिक्षितांची वाढती गरज भागविण्यासाठी स्वातंत्र्योत्तर काळात सरकारने


अनुक्रमणिका

ग्रामीण भागात अनेक महाविद्यालये उघडली. या संस्था निघाल्या परंतु मुलींच्या प्राथमिक शिक्षणाकडे कुणाचेही लक्ष गेले नाही. ग्रामीण समाज हा परंपरावादी असल्यामुळे स्त्री शिक्षणाचे महत्त्व त्यांनी उक्तीने मानले तरी कृतीने नाकारले आहे. श्रीमंत शेतकऱ्यांना समाजात व राज्यातही महत्त्वाचे स्थान स्वातंत्र्योत्तर काळात मिळत गेले. सार्वत्रिक मतदानाच्या स्थापनेने त्यांच्या राजकीय सत्तेच्या संरचनेतील स्थानात महत्त्वाचे योगदान केले. ह्याच लोकांचा सार्वत्रिक शिक्षणाला विरोध असतो. कारण त्यामुळे ग्रामीण कामकरी वर्गाचे शोषक म्हणून असलेल्या त्यांच्या स्थानाला धक्का पोहोचतो. खालच्या स्तरातून येणाऱ्या मुलामुलींच्या शिकविण्याबाबत ते नकारात्मक भूमिका घेतात. शेतीची बहुतेक कामे स्त्रियांकरवीच होत असल्यामुळे गरीब शेतकऱ्यांच्या मुली शाळेत जाण्याऐवजी त्यांच्या स्वतःच्या घरातील कामासाठी, आपल्या नातेवाईकांच्या घरी कामाला ठेवण्यासाठी, बाहेरगावी पाठविण्यासाठी व शेतातील कामासाठीच कशा आणता येतील हे पाहण्यासाठीच ते आपल्या राजकीय भूमिकेचा आधार घेतात.

महाराष्ट्र शासनाने मुलींचे शिक्षण मोफत करुन सर्व थरातील मुलींसाठी शिक्षणाचे दरवाजे खुले केले असता ग्रामीण भागातील मुलींच्या शिक्षणाबाबत शासनाला जबाबदार कसे ठरविता येईल? शासनाच्या शैक्षणिक योजना ग्रामीण नागरिकांनी का राबवू नये? इ. प्रश्न विचारुन शासनाचे समर्थन करुन दोषांचे खापर ग्रामीण समाजाच्या माथ्यावर फोडण्यात येते. शिधा समोर ठेवला तर शिधा शिजविण्यासाठी भांडी व चूल व चूलीत इंधन असले पाहिजे. आम्ही शिधा दिला आणि तुम्ही उपाशी का हा प्रश्न विचारताना शिध्याचे अन्न बनविण्यासाठी इतर सामुग्री दिली आहे का याचा विचार जसा व्हायला हवा तसेच शासनाने शिक्षण मोफत जाहीर केल्यावर शिक्षणासाठी सुविधा त्या ग्रामीण समाजाला दिल्या आहेत की नाही हेही पाहणे आवश्यक आहे. या बाबतीत सर्वत्र कमीअधिक प्रमाणात नन्नाचा पाढा आहे. हे सार्वत्रिक शिक्षण खऱ्या अर्थाने सार्वत्रिक म्हणजे तळागाळात पोहचण्यासाठी शासनाकडून चोख व्यवस्था केली जात नाही. उदा. १४ वर्षापर्यंतच्या मुलामुलींना पायी पोहचता येईल अशा अंतरावर शाळा नसतात. शाळेच्या इमारतींची छप्परे उडालेली, जमीन खणून गेलेली, खिडक्या व तावदाने फुटलेली असतात. ती वर्षानुवर्षे तशाच अवस्थेत असतात. काही ठिकाणी तर एक शिक्षकी शाळा. तो शिक्षक आला तर शाळा सुरु राहते. तो आजारी पडला, रजेवर गेला किंवा बदलून गेला तर शाळा बंद राहते. तो शिक्षक बाहेर गावाहून येणार असेल तर त्याच्या येण्याजाण्याच्या वेळा एस. टी. च्या वेळेवर येण्याजाण्यावर अवलंबून. शाळेतील ४ वर्ग त्याला पहायचे असल्यामुळे प्रत्येक वर्गाच्या वाटेला शिक्षकांकडून १ तासापेक्षा अधिक वेळ शिकविले जात नाही, याची नोंद तर अनेक अभ्यासकांनी केली आहे. वर्गात शिकविण्याची अगदी प्राथमिक साधने म्हणजे खडू, फळा व फळा पुसण्यासाठी फडके यांचीही मारामार असते.

ग्रामीण मुलींनी जास्त संख्येने शाळेत येण्यासाठी स्त्री शिक्षिका नेमाव्यात असा विचार मांडला जातो. स्त्री शिक्षिका असली की मुलींना शाळेत पाठविणे पालकांना सुरक्षित वाटते. पण परिस्थिती अशी असते की समाजकंटक व गावगुंड यांच्यामुळे शिक्षिकाच असुरक्षित असते. वरचेवर होणाऱ्या बदल्यांमुळे स्त्रीशिक्षकांना कायमचे तणावाखाली रहावे लागते. शासनाने म्हणजे पर्यायाने जिल्हापरिषदांनी ही परिस्थिती बदलण्यासाठी ठोस पावले उचललेली नाहीत असे खेदाने म्हणावे लागेल.

शहरांना जवळ असलेल्या खेड्यातून ७ वी पर्यंत शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्या पूर्वीच्या मानाने बरी आहे. ग्रामीण मुलींचे शिक्षण जास्तीत जास्त ७ व्या इयत्तेपर्यंतच होते. त्यातल्या २ टक्के मुलीही पुढील शिक्षण मोफत असले तरी घेवू शकत नाहीत. मुलीला शिकवायला पाठवावयाचे म्हणजे बसभाडे, चप्पल, छत्री, बरा गणवेश हे खर्च ग्रामीण भागातील पालकाला पेलवत नाहीत. हेच खर्च त्याला आपल्या मुलासाठी करणे अगत्याचे वाटते. काही पालकांना हा खर्च परवडणारा असतो पण एस. टी. च्या प्रवासात ३ ते ४ मुलींची सोबत असल्याशिवाय मुलीला लांबच्या शाळेत पाठविणे भयावह वाटते. कारण मुलींच्या सुरक्षिततेची काळजी शासनाने घेतलेली नाही. काही मुलींना डोंगर पार करुन तर काहींना नद्या, ओहोळ पार करुन शाळेत जावे लागते हे लक्षात घेवून जिल्हा परिषदा आवश्यक ते पूल, रस्ते बांधण्याचा विचार करीत नाहीत.

शिक्षणावर होणाऱ्या खर्चाचा मोठा भाग प्राथमिक शिक्षणावर खर्च होईल असे शासनाने जाहीर केले आहे. वर

उल्लेखिलेली परिस्थिती ही शासनाचे धोरण जाहीर झाल्यानंतरही चालू आहे. शिक्षकांच्या नेमणुकीबाबत जिल्हा परिषदांमधून राजकारण खेळले जाते हे आता उघड गुपीत आहे. शेतीचे भरपूर उत्पन्न असणारे पदवीधर एक जोडधंदा म्हणून शिक्षकाचा व्यवसाय करतात हेही अनेक अभ्यासकांनी नजरेला आणले आहे. त्यामुळे शेतीच्या कामाच्या दिवसात रजा घेणे, गैरहजर राहणे आदी गोष्टी नित्याच्याच. यामध्ये काही फारसे गैर आहे असे ग्रामीण जनतेलाही वाटत नाही ही आणखी खेदाची गोष्ट. सर्वच शिक्षणासंबंधी ग्रामीण भागात सावळागोंधळ. त्यात स्त्रिया व दलित या दुर्बल घटकांचा विचार कोण करणार? राजकारण्यांना हा विचार भाषणाला रंगत आणण्यासाठी व आपले पुरोगामित्त्व सिद्ध करण्यासाठी मांडायचा असतो. समाजपरिवर्तनाचे राजकारणी हे मोठे शत्रू आहेत. आपल्या पायाखालची जमीन सरकू नये यासाठी ग्रामीण समाज व त्यातील अधिक करुन स्त्रिया व दलित हे शिक्षणापासून वंचित राहणे हीच गोष्ट त्यांच्या हिताची असते.

ग्रामीण भागातील मुलींच्या शिक्षणाच्या मार्गावरील हे सामाजिक, आर्थिक व राजकीय अडसर दूर होऊन खऱ्या अर्थाने त्यांच्या उंबरठ्याच्या आत शिक्षण जाण्यासाठी काही उपाय योजना सुचविता येतील.

शाळेतून गळती झालेल्या किंवा ७ वी नंतर बाहेरगावी शिक्षणासाठी जाऊ न शकणाऱ्या मुलींसाठी त्यांच्या गावात किंवा त्यांना पायी चालत जाता येईल इतक्या अंतरावर लहान लहान कुटीरोद्योगासंबंधी शिक्षणाची सोय झाली पाहिजे.

इंग्रजांच्या काळात व्ह. फा. नंतर २ वर्षाचा प्राथमिक शिक्षकाचा अभ्यासक्रम होता. अशाच प्रकारचा शिक्षणक्रम पुन्हा सुरु झाला तर ७ वी पर्यंत शिकलेल्या लेकी - सुनाना २ वर्षाचा अभ्यासक्रम पुरा करुन गावातल्या शाळेत शिकविणे शक्य होईल. जर्मन डेमोक्रॅटिक रिपब्लिक या देशात माध्यमिक शिक्षक होण्यासाठी पात्रता ही १० वी पास व तीन वर्षाचा शिक्षणविषयक शिक्षणक्रम पुरा करणे इतकीच आहे. विद्यापीठीय ज्ञानाची शाळेतील शिक्षणासाठी आवश्यकता आहे हे ते मानीत नाहीत. ४ थी पर्यंतचे शिक्षण देण्यासाठीही १० वी ते १२ वी पर्यंत शिक्षण घेण्याची जरुरी आहे असे वाटत नाही. ७ वी पर्यंत पुरेसे आहे.

ग्रामीण समाजात आता आपली मुलगी संपूर्ण निरक्षर रहावी असे जरी वाटत नसले, तरी ती फारशी शिकावी असेही वाटत नाही. याचे एक कारण म्हणजे शाळेतल्या शिक्षणाने लिहिता वाचता येण्यापलीकडे अधिक काही फायदा होतो असे त्यांना वाटत नाही. म्हणून ग्रामीण मुलींच्या शिक्षणात, शेती, बागकाम, डेअरीकाम, जनावरांचे व पिकांचे व वनस्पतींचे सामान्य रोग, कोंबड्यांची पैदास, प्राथमिक शिवणकाम, विजेच्या वापराविषयी समान्यज्ञान इ. विषय जोड विषय म्हणून शिकण्याची संधी मिळाली तर शिक्षणाचा काय उपयोग हा त्यांच्या दृष्टीने निरक्षर असलेल्या प्रश्नाला उत्तर मिळेल. दुसरे कारण जे जाणवते ते म्हणजे सध्या शहरात जाऊन शिकलेल्या मुलींमध्ये खेड्यात रहाणे, घरकाम, शेतीकाम यांचा तिटकारा दिसतो. शहरी रहणसहणाची त्यांना ओढ वाटते. ग्रामीण संस्कृती व जीवन यांच्यापासून दूर जाणाऱ्या मुली पाहून आपल्याही मुलीचे असेच घडेल, अशी भीती मनात येते व म्हणूनही पालक मुलींना बाहेर शिकायला पाठवत नाहीत असे अनेकांशी झालेल्या चर्चेतून निष्पन्न होते.

सारांश ग्रामीण स्त्रीच्या शिक्षणातील अडसर हे एकाच गोष्टीचा परिणाम नसून सामाजिक, आर्थिक व राजकीय ताणतणावांचा झालेला एकत्रित परिणाम आहे. यातून बाहेर पडण्यासाठी मदत मुख्यत: दोन मार्गाने होईल. समाज परिवर्तन व शासकीय धोरणाची काटेकोर अंमलबजावणी. ग्रामीण शिक्षणाला खरीखुरी चालना मिळण्यासाठी व राज्य सरकारने सैद्धांतिक दृष्ट्या आखलेले कार्यक्रम यशस्वी होण्यासाठी राज्य व जिल्हा या दोन्ही स्तरावर अनुकूल व प्रशासकीय यंत्रणांची अत्यंत आवश्यकता आहे. (या ठिकाणी डॉ. आंबेडकरांची आठवण येते. औरंगाबादला त्यांनी मिलिंद महाविद्यालयाची स्थापना केल्यावर गावातून येणाऱ्या मुलींच्या संख्येवर परिणाम होऊ नये म्हणून त्यांनी मुलींसाठी मोफत बससेवा सुरु केली. याला म्हणतात यंत्रणा व हाती घेतलेल्या कार्याची तळमळ.) स्थानीय शासनात आता स्त्रियांना ३० टक्के राखीव जागा मिळाल्या आहेत. पक्षीय राजकारण व पुरुषप्रधान समाजव्यवस्थेचे बळी असलेले पुरुषसदस्य स्त्रियांच्या शिक्षणाकडे लक्ष देणारच नाहीत. निवडून आलेल्या स्त्रियांनी पक्षभेद विसरुन स्त्री शिक्षणाच्या सुविधांच्या प्रश्नावर एक झाल्याशिवाय ग्रामीण मुलींच्या शिक्षणाची उर्जितावस्था कठीण दिसते!

(ग्रामीण स्त्रीशिक्षण : दशा आणि दिशा, सप्टेंबर १९९३.)

☑☑☑






# स्त्री शिक्षण : प्रश्न जुने, स्वरूप मात्र नवे

## मृणालिनी चितळे

समाजातील बालविधवांना शिक्षण देण्याच्या उद्देशाने १४ जून १८९६ रोजी महर्षी कर्वे यांनी - अण्णांनी - अनाथ बालिकाश्रमाची स्थापना केली आणि सहा-सात विद्यार्थिनींच्या शिक्षणाची जबाबदारी उचलली. हळूहळू या कामाचे महत्त्व समाजमनाला समजू लागले. विधवांच्या बरोबरीने सर्वसामान्य अविवाहित मुली आश्रमात येऊन शिकू लागल्या. अण्णांनी मग महिला विद्यालयाची स्थापना केली. त्या पाठोपाठ महिला विद्यापीठ, खेडोपाडी शाळा चालविण्यासाठी स्थापन केलेली 'महाराष्ट्र ग्राम प्राथमिक शिक्षण मंडळी' ही संस्था, निष्काम-कर्म-मठ, अध्यापिका शाळा, अशा विविध स्तरांवर अण्णांनी कामाला सुरुवात केली. त्यासाठी निधी जमविण्याची जबाबदारी त्यांनी खुशीने उचलली. हातात झोळी घेऊन अखंड पायपीट केली. त्यांनी घेतलेल्या अथक परिश्रमांमुळे फक्त द्रव्यसंचय झाला असे नाही, तर पुण्यसंचयही संस्थेच्या नावाने जमा झाला. त्याच बळावर एखाद्या महाकाय वटवृक्षाप्रमाणे आज संस्थेचा विस्तार झाला आहे.

आज बहुतेक सर्व क्षेत्रात स्त्रिया आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटवताना दिसत आहेत. चिकाटी, सहनशीलता, हुशारी, कष्ट करण्याची जिद्द आणि शिक्षणाची संधी यांमुळे शिक्षण, राजकारण, समाजकारण, अर्थकारण यांसारख्या क्षेत्रात आत्मविश्वासाने वावरणाऱ्या, निर्णयप्रक्रियेत जबाबदारीने सहभागी होणाऱ्या सुशिक्षित स्त्रियांचे प्रमाण वाढताना दिसत आहे. मात्र यावरून स्त्री-शिक्षणासंबंधी समान दृष्टिकोन समाजात रुजला आहे, असा निष्कर्ष काढता येईल का? सर्व स्त्रियांना काम करायची संधी मिळत आहे का? आत्मविश्वासाने घराबाहेर पडलेली सुशिक्षित स्त्री समाजात पूर्णपणे निर्भयतेने वागू शकते का? गुणवत्ता यादीत येणाऱ्या आणि उत्तीर्ण होणाऱ्या मुलींचे प्रमाण अधिक असले तरी सर्व मुली किमान दहावीपर्यंतचे शिक्षण घेऊ शकतात का?... असे अनेक प्रश्न उपस्थित होतात. त्यांची उत्तरे शोधण्यासाठी आणि स्त्रियांच्या शिक्षणाची सद्यःस्थिती समजून घेण्यासाठी स्वातंत्र्यप्राप्तीनंतर मुलींच्या शिक्षणासाठी सरकारी पातळीवर स्थापन केलेले आयोग, त्यांनी केलेल्या शिफारसी, हाती घेतलेल्या योजना आणि समाजातून त्याला मिळालेला प्रतिसाद समजून घ्यायला हवा.

राष्ट्रीय स्त्री-शिक्षण समितीची स्थापना १९५८ मध्ये झाली. स्त्रियांचे प्रश्न स्त्रियांनीच हाताळण्याच्या दृष्टीने नेमलेली ही पहिली समिती होती. पुढे कोठारी आयोगाने स्त्रियांना त्यांच्या सवडीच्या वेळी शिक्षणाची संधी उपलब्ध करून देण्याची व पत्राद्वारा शिक्षणाची सोय करण्याची शिफारस केली. नंतर 'शिक्षण सुधार समिती'ने मुलींसाठी स्वतंत्र आश्रमशाळा व वसतिगृहांची व्यवस्था करण्याची शिफारस केली. १९८६ च्या राष्ट्रीय शैक्षणिक धोरणात शिक्षणाद्वारे स्त्रियांच्या सबलीकरणाचे उद्दिष्ट ठेवण्यात आले. त्यासाठी १९९२ मध्ये कृतिकार्यक्रम तयार केला गेला. शिक्षणापासून वंचित घटकांना - विशेषत: मुलींना - शिक्षणाच्या प्रवाहात विशेष सवलती देण्यात आल्या. १९९४ मध्ये स्वतंत्र महिला धोरण जाहीर करणारे महाराष्ट्र हे भारतातले पहिले राज्य बनले. त्याद्वारे महिलांच्या सक्षमतेसाठी शालेय अभ्यासक्रम ज्या दहा गाभा घटकांवर आधारित आहे, त्यामधील 'स्त्री-पुरुष समानता' या घटकाकडे लक्ष पुरविले गेले. आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय, विमुक्त व भटक्या जातीतील मुलींकरिता इतर सुविधांबरोबर मोफत एस.टी. प्रवास, मोफत सायकली, शिष्यवृत्ती, शाळेत उपस्थित राहण्यासाठी प्रोत्साहन भत्ता देण्यात येत आहे. 'सर्व शिक्षण मोहिमेने'ही स्त्रीशिक्षणावर भर दिला आहे.

मुलींच्या शिक्षणाचे प्रमाण वाढण्यासाठी घेतलेल्या या योजना प्रत्यक्षात उतरल्या असतील, तर मुलींना किमान दहावीपर्यंतचे शिक्षण घेण्यात आडकाठी येऊ नये, असे मानायला हरकत नाही. प्रत्यक्षात मात्र दहावीपर्यंत शिक्षण घेतलेल्या मुलींचे प्रमाण अत्यंत कमी आहे. डिसेंबर २००४ मध्ये केलेल्या झटपट सर्वेक्षणानुसार २,२०,०५७ मुली शाळेबाहेर आहेत. महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व

अनुक्रमणिका

प्रशिक्षण परिषदेमार्फत प्रसिद्ध केलेल्या आकडेवारीनुसार पहिलीत प्रवेश केलेल्या १०० मुलींपैकी फक्त ४५ मुली दहावीपर्यंत पोचतात, अनुसूचित जमातीपैकी फक्त २३ मुली दहावीपर्यंत पोचतात. उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींचे प्रमाण ३.२ टक्के आहे.

मुलींच्या शाळागळतीची अनेक कारणे आहेत. अजूनही आपल्याकडे मुलींच्या शिक्षणाला फारसे महत्त्व नाही. अनेक ठिकाणी आर्थिक परिस्थितीमुळे लहान मुलींनाही रोजच्या मीठभाकरीसाठी मोलमजुरी करावी लागते. आईच्या मदतीसाठी स्वयंपाकपाणी, घराची स्वच्छता, लहान भावंडांचा सांभाळ, गाईगुरांचं चारापाणी, अशा अनेक कामांचा बोजा लहान मुलींवर पडतो. महाराष्ट्रात १८ वर्षे वयाखाली विवाह होणाऱ्या मुलींचे प्रमाण खेडेगावात २९ टक्के आहे, तर शहरी विभागात ११ टक्के आहे. त्यामुळे अशा मुलींचे शिक्षण थांबतेच. आजही समाजामध्ये मुलींच्या शिक्षणाकडे खुल्या मनाने पाहिले जात नाही, हेच खरे.

स्त्रियांनी शिक्षण घेऊन स्वतःच्या पायावर उभे रहावे, या उद्देशाने अण्णांनी स्त्रीशिक्षणाचा ध्यास घेतला; परंतु स्त्रियांनी शिक्षणाचा श्रीगणेशा करुन शंभर वर्षे उलटून गेल्यावरही अनेक जुने प्रश्न नव्याने उभे आहेत याची जाणीव सुशिक्षित समाजालाही नाही. त्यामुळेच आज स्त्रीच्या अस्तित्वाचा प्रश्न उभा राहिला आहे. दर हजार पुरुषांमागे घटणारी स्त्रियांची संख्या ही देशापुढील जटिल समस्या बनली आहे. महाराष्ट्रात तर ही घट जास्त आहे. १९०१ मध्ये महाराष्ट्रात १००० पुरुषांमागे ९७८ स्त्रिया हे प्रमाण होते. १९८१ मध्ये ते ९३७ झाले आणि २००१ मध्ये ते ९१७ इतके होते; परंतु २००३ च्या आकडेवारीनुसार हे प्रमाण आणखी कमी म्हणजे ८९९ झाले आहे. कुटुंबांतर्गत स्त्रियांवर होणारे अत्याचारसुद्धा सुशिक्षित कुटुंबात अधिक होत असल्याचे आढळून आले आहे. ही बाब स्त्रियांचे जीवनमान उंचावण्यासाठी पुस्तकी शिक्षण आणि कायदे यांची मर्यादा लक्षात आणून देणारी आहे.

आज महर्षी कर्वे स्त्री-शिक्षण संस्थेच्या व्यवस्थापक मंडळाची सदस्या म्हणून काम करत असताना स्त्रीशिक्षणा-संबंधीच्या अनेक अनुभवांना सामोरे जावे लागते. शाळा प्रवेशाच्या वेळी मोलमजुरी करुन हातावर पोट असलेले अनेक पालक कुदून कुदून येतात आणि त्यांच्या मुलींना शाळेत आणि संस्थेच्या वसतिगृहात प्रवेश मिळावा म्हणून गळ घालत असतात. अशा वेळी शिक्षणाचे महत्त्व सर्वदूर पसरले आहे याची जाणीव होते, पण त्याच वेळी मुलींसाठी खेडोपाडी वा डोंगराळ भागात असलेल्या शाळा पुरेशा नाहीत; शिक्षक महिनोन्महिने गैरहजर असतात, ही वस्तुस्थिती समोर येते. आज हिंगण्याच्या वसतिगृहामध्ये अनेक मुलींना शिक्षण घेणे शक्य होत असले तरी येणाऱ्या सर्व मुलींना सामावून घेण्याइतकी त्याची क्षमता नाही. अनेक मुलींचे आणि त्याच्या पालकांपुढचे प्रश्न इतके गंभीर असतात, इतके बिकट असतात, की अशा साऱ्या मुलींना शाळेत आणि वसतिगृहात सामावून घेता येण्यासाठी वसतिगृहाची क्षमता वाढवायला पाहिजे असे मनापासून वाटायला लागते. त्यासाठी प्रचंड मोठा निधी उभा करण्याची आवश्यकता आहे हेही कळते. हा निधी उभा करणे सोपे नसले तरी अशक्य नाही, याची जाणीव मनाला दिलासा देऊन जाते.

(सकाळ गुरुवार १४ जून २००७)

☑ ☑ ☑

कृष्णाची विद्या संपली आणि तो घरी जायला निघाला तेव्हा गुरुजी म्हणाले, "आशीर्वाद माग." कृष्ण म्हणाला, "तुम्हीच द्या." तेव्हा गुरुजी म्हणाले, "नाही, माझी प्रतिष्ठा राखण्यासाठी काही माग." कृष्ण म्हणाला, "बरे." आणि त्याने आशीर्वाद मागितला. म्हणाला, "मातृहस्तेन भोजनम्" मरेपर्यंत मला आईच्या हातचे जेवण मिळावे. दुसरा कोणताही आशीर्वाद त्याने मागितला नाही. सांदीपनींनी त्याला तो आशीर्वाद दिला. भगवान श्रीकृष्ण ११६ वर्षे जगले आणि ते मेल्यावर त्यांची आई मेली. भगवान श्रीकृष्णांनी "मातृहस्तेन भोजनम्" असा वर मागितला. "मातृमुखेन शिक्षणम्" असे ते म्हणाले नाहीत, तेवढेच माझ्यासाठी म्हणायचे शिल्लक ठेवले.

असे हे 'मातृहस्तेन भोजनम्' आणि 'मातृमुखेन शिक्षणम्' झाले की हिंदुस्थानची प्रभा एकदम फाकेल, जगाला आपण शिकवू शकू, चारी बाजूला ज्ञान पसरवू शकू.

- विनोबा

(शिक्षणविचार, पृष्ठ ६२-६३)

# महाविद्यालयीन शिक्षणाचे धोरण : संदर्भ आणि समस्या

देवदत्त दाभोलकर

**जागतिक पार्श्वभूमी**

विकसनशील व अतिप्रगत अशा दोन्ही राष्ट्रांतील उच्च शिक्षणाच्या संदर्भातील समस्या वेगवेगळ्या स्तरावरच्या असल्या तरी सामान्यत: एकाच पद्धतीच्या आहेत. जानेवारी १९८९ मध्ये झालेल्या जागतिक शिक्षण परिषदेने 'उच्च शिक्षण' हा आपला मुख्य चर्चाविषय ठेवला होता. युनेस्कोचे सभासद असलेल्या सर्व राष्ट्रांचे अधिकृत प्रतिनिधी या परिषदांना उपस्थित असतात. अन्यही काही तज्ज्ञ मंडळी असतात.

या परिषदेपुढे विचारासाठी असलेली उच्च शिक्षणाच्या समस्येची विविध अंगे अशी होती.

१. उच्च शिक्षणाचा प्रसार प्राथमिक व दुय्यम शिक्षणापेक्षा अधिक वेगाने होत आहे.

२. यामुळे सुशिक्षितांची संख्या वाढते परंतु सुशिक्षितांमधील बेकारी व अर्धबेकारीचे प्रमाणही वाढते असा अनुभव आहे.

३. समाजातील वंचित वर्गाकडून उच्च शिक्षणाची मागणी जोराने पुढे येत आहे. सामाजिक न्यायाच्या दृष्टीने ते इष्टही आहे. सामाजिक प्रतिष्ठा व आर्थिक लाभ या दोन्ही कारणांनी वंचित वर्गाचा उच्च शिक्षण मिळविण्यासाठी आग्रह असतो.

४. दुय्यम शाळेच्या स्तरावरील शिक्षणाचा विचार केला तर व्यावसायिक शिक्षण व महाविद्यालयीन शिक्षण असे दोन प्रवाह मानता येतील. व्यावसायिक शिक्षणाचा प्रवाह अधिक प्रभावी कसा करता येईल, ही एक प्रमुख समस्या आहे.

५. उच्च स्तरावरील शिक्षणाच्या गुणवत्तेचा प्रश्न हा राष्ट्राच्या दृष्टीने दोन कारणांसाठी महत्त्वाचा असतो. एक तर आपल्या विरोधी राष्ट्राशी संरक्षण सामर्थ्याच्या संतुलनाच्या दृष्टीने (जसे अमेरिका-रशिया, किंवा भारत-पाकिस्तान), दुसरे आंतरराष्ट्रीय व्यापारातील आर्थिक स्पर्धेत यश मिळावे यासाठी (जसे, जपान-अमेरिका-पश्चिन युरोप).

६. विज्ञान आणि तंत्रज्ञान झपाट्याने प्रगत होत आहे. उच्च शिक्षणाने ही प्रगती सतत आत्मसात करीत राहिले पाहिजे. यासाठी अभ्यासक्रम व अध्ययन-अध्यापनपद्धती अद्ययावत असावयास पाहिजे. तंत्रविकास झाला की, कालचे सुशिक्षित व प्रशिक्षितही आज अशिक्षित ठरू शकतात. हा अनुभव प्रगत राष्ट्रांमध्ये आता दर पंधरावीस वर्षांनी येत आहे. या लोकांच्या बेकारीचा किंवा नव्याने परत प्रशिक्षणाचा प्रश्न आज प्रगत राष्ट्रांपुढे उभा आहे. यांत्रिकीकरणातून येणाऱ्या बेकारीचा प्रश्न अप्रगत राष्ट्रांतही आज ग्रामोद्योग, लघुउद्योग एवढ्यांपुरताच मर्यादित राहिलेला नाही. कॉम्प्युटरच्या स्वीकाराला संघटित कामगार वर्गाकडून (बँका) आदी होणारा विरोधही याच प्रकारचा आहे.

७. उच्च शिक्षणाने व्यक्तीची किंवा एकूण समाजाचीही केवळ भौतिक समृद्धी साधून चालणार नाही, तर उच्च शिक्षणाने व्यक्तीच्या व समाजाच्या जीवनाला अर्थ प्राप्त करून देतील अशी जीवनमूल्येही शिकविली पाहिजेत असा विचार मांडला जात आहे. 'Gandhi with Satellite' अशी आवश्यकता अल्विन टॉफलर प्रतिपादन करत असतो त्यावेळी समस्येच्या याच अंगाची मांडणी करण्याचा तो प्रयत्न असतो. या समस्यांची संख्या आणखीही वाढविता येईल. परंतु या प्रश्नाचे महत्त्वाचे पैलू लक्षात येण्याच्या दृष्टीने एवढे निर्देश पुरेसे आहेत.

या समस्यांची संपूर्ण उत्तरे आजवर जगातील कोणत्याही राष्ट्राला मिळालेली नाहीत. मिळणे सहज शक्यही नाही. एक तर ज्या परिस्थितीत या समस्यांची उकल करावयाची असते ती सतत परिवर्तनीय असते. त्या परिवर्तनाला साथ देणे अवघड असते. परंतु अनेकदा अशी साथ देण्याचे राज्यकर्त्यांच्या मनातही नसते.

येथेही उदाहरण घ्यावयाचे तर आपल्या भारताचे देखील घेता येईल. परकीय सत्ता जाऊन राष्ट्र स्वतंत्र होणे हे मोठे परिवर्तन होते की नाही? त्या परिवर्तनाचा परिणाम आपल्या शिक्षणक्षेत्रावर काय झाला? आजही साठ टक्क्यांहून अधिक लोक निरक्षर आहेत, चाळीस टक्के लोक दारिद्र्यरेषेच्या खालचे जीवन जगत आहेत. व्यावसायिक

शिक्षणाच्या प्रवाहाकडे लोक वळत नाहीत, सुशिक्षितांची बेकारी वाढत आहे, राष्ट्राच्या खर्चाने प्रशिक्षित झालेले वैज्ञानिक, इंजिनिअर्स, डॉक्टर्स परदेशात जाऊन स्थायिक होत आहेत - या अशा गोष्टी स्वातंत्र्य मिळाले या परिवर्तनाचा आपल्या शैक्षणिक धोरणातही योग्य परिवर्तन झाले याचा निदर्शक मानता येतील काय?

राष्ट्रांचे अधिकृत प्रतिनिधी ज्या आंतरराष्ट्रीय परिषदेत भाग घेतात तिच्यातील चर्चेतून अशा प्रश्नांची उत्तरे मिळणे अशक्यप्राय आहे, कारण अशी परिषद राष्ट्रातील सत्तेची, वर्गवर्चस्वाची असलेली चौकट गृहीत धरूनच त्या मर्यादेत काही सुचतील ते कमीअधिक प्रमाणात जुजबी असे उपाय लक्षात घेऊ शकते.

राष्ट्रातील सत्तेची चौकट बदलली गेली पाहिजे असा विचार अशा व्यासपीठावर मांडणे सर्वजण अनौचित्याचे मानतील; काही जण तर राष्ट्राद्रोहाचेही मानतील.

परंतु मूलभूत समस्या समजून घ्यावयाची तर या अंगाचा विचार न करून चालणार नाही. भारताच्या संदर्भात तर नाहीच नाही.

आणि सत्तेची चौकट बदलणे म्हणजे 'अ' पक्ष अधिकारावरून जाऊन 'ब' पक्ष अधिकारावर येणे असा मर्यादित असू शकत नाही. अनेकदा 'अ' आणि 'ब' इत्यादी विविध पक्षही राजकीय सत्तेच्या एकाच चौकटीत अकमेकांशी स्पर्धा करीत असतात.

### भारत

१९४८ मध्ये जवाहरलाल नेहरू यांनी भारतातील शिक्षणमंत्र्यांची एक बैठक बोलावली होती.

'परतंत्र भारतात ज्या ज्या वेळी शिक्षणाचा विचार झाला त्या त्या वेळी तो परकीय राजसत्तेच्या विचारांना अनुसरून झाला व खरे शैक्षणिक परिवर्तन कधीच झाले नाही.' हा त्या मांडणीचा आशय होता.

'This must not happen now' हे असे घडता कामा नये हा त्यांचा त्या संदर्भात आदेश होता.

तरीही गेल्या चाळीस वर्षांत काय घडले?

आजही भारतात साठ टक्क्यांहून अधिक जनता निरक्षर आहे. सरकारी आकडे मानले तरी जवळजवळ चाळीस टक्के लोक दारिद्र्यरेषेच्या खाली आहेत. निरक्षरतेच्या रेषेचा आणि दारिद्र्यरेषेचा अतूट संबंध आहे. आणि दारिद्र्यरेषा जोपर्यंत खाली सरकत नाही तोपर्यंत निरक्षरतेची रेषाही खाली सरकणार नाही अशी माझी भूमिका आहे. याचा निर्देश मी अनेकदा 'The Fifty Per Cent Barrier' असा करतो. मूलभूत समस्येशी संबंध येतो तो अशा ठिकाणी येतो. त्याचे अधिक विवेचन थोडे पुढे करू.

उच्च शिक्षणाच्या संदर्भात या चाळीस वर्षांत काय घडले? महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या संख्येत या कालखंडात जवळजवळ दसपट वाढ झाली. संख्यात्मक वाढ झाली पण गुणात्मक काय झाले? महाविद्यालयीन शिक्षणाची एकेका राष्ट्रातील वैशिष्ट्ये सांगताना 'the debasement of acadamic currency in so many institutions in India.' (शैक्षणिक नाण्याचे उत्तरोत्तर होत गेलेले भारतातील अवमूल्यन) असा निर्देश करावा असे कार्नेगी कौन्सीलच्या उच्च शिक्षणावरील अहवालाला (१९८०) का वाटले?

अगदी अलीकडची परिस्थिती काय आहे? जागतिक बँकेच्या जागतिक विकासविषयक प्रतिवार्षिक अहवालात काही शिक्षणविषयक माहिती दिलेली असते. १९८६ या वर्षाचा अहवाल प्रत्येक राष्ट्रात २० ते २४ या वयोगटातील लोकसंख्येपैकी किती टक्के लोक उच्च शिक्षण घेत आहेत याची माहिती देतो. अशी १२८ राष्ट्रांची माहिती त्या अहवालात आहे. भारत आणि आपल्याला ज्या राष्ट्रांविषयी कुतूहल वाटावे अशा अन्य काही राष्ट्रांतील ही टक्केवारी पुढीलप्रमाणे आहे :

भारत ९, चीन १, पाकिस्तान २, बांगलादेश ४, इंग्लंड २०, रशिया २१, जपान ३०, पश्चिम जर्मनी ३०, स्वीडन ३९, कॅनडा ४२, अमेरिका ५६.

संख्याशास्त्राच्या दृष्टीने एवढ्या आकडेवारीवरून आपल्याला तुलनात्मक अचूक असे निष्कर्ष काढता येणार नाहीत. परंतु ढोबळ वस्तुस्थितीचे निदर्शक म्हणून वरील आकडे पुरेसे आहेत.

१९८८ मध्ये विद्यापीठे व विद्यापीठ स्तरावरील म्हणून मान्यताप्राप्त अन्य संस्थांची संख्या भारतात १५९ होती. त्यांपैकी १०५ नेहमीच्या पद्धतीची विद्यापीठे होती. २४ कृषिविश्विद्यालये होती, ४ वैद्यकीय संशोधन संस्था होत्या आणि १० तंत्रज्ञानविषयक संस्था होत्या. यांखेरीज काही व्यावसायिक, संशोधनात्मक वा अन्य काही विशेष

शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्या विद्यापीठ स्तराची मान्यता मिळालेल्याही संस्था होत्या. महाराष्ट्रातील उदाहरणे घ्यावयाची तर मुंबईचे टाटा इन्स्टीट्यूट ऑफ सोशल सायन्सेस व पुण्याचे टिळक महाराष्ट्र विद्यापीठ यांची घेता येतील.

स्वातंत्र्य मिळण्याच्या आधी भारतात केवळ अठरा विद्यापीठे होती. पुढील ४० वर्षांत संख्यात्मक केवढी वाढ झाली आहे हे वरील आकडेवारीवरून लक्षात येईल. या सर्व संस्थांतून आज सुमारे चाळीस लाख विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. महाविद्यालयांची संख्या जवळजवळ सहा हजार, महाविद्यालयांत काम करणाऱ्या प्राध्यापकांची संख्या सुमारे एक लक्ष पंचाहत्तर हजार व विद्यापीठांतून काम करणाऱ्या प्राध्यापकांची संख्या जवळजवळ पन्नास हजार आहे. विद्यार्थ्यांमध्ये मुलींची संख्या जवळजवळ एक तृतियांश आहे.

या संदर्भात नेहमी सांगण्यात येणारी आणखी काही ढोबळ माहिति सांगावयाची तर भारतात शिक्षणावर होणारा खर्च हा संरक्षणावर होणाऱ्या खर्चाच्या खालोखाल आहे व या खर्चातीलही तुलनात्मकदृष्ट्या पाहिले तर शिक्षणाच्या प्राथमिक व दुय्यम स्तरावर होणारा खर्च, उच्च शिक्षणावर होणाऱ्या खर्चाच्या तुलनेत कमी प्रमाणात होत आहे.

उच्च शिक्षणाच्या संदर्भात अनेकदा सांगितलेली गोष्ट म्हणजे जगातील राष्ट्रांत शास्त्रज्ञांच्या संख्येच्या दृष्टीने भारत हे तिसऱ्या क्रमांकाचे राष्ट्र आहे. साहजिकच मनात मग प्रश्न येतो की हे जर असे असेल तर भारत अजून इतका मागास का? आमचे सर्वोत्तम शास्त्रज्ञ अधिक अर्जन व अधिक सुविधा यांच्या शोधात परदेशात जातात व पुढेही तेथेच स्थायिक होतात हे त्याचे कारण असू शकेल काय?

की 'शास्त्रज्ञां'ची आपल्या राष्ट्राची व्याख्या आणि अन्य राष्ट्रांतील व्याख्या यांत काही फरक असू शकेल काय? तसे असण्याची खूपच शक्यता आहे; कारण तशी तफावत नसती तर आपल्या विद्यापीठांतील विद्यार्थ्याला त्याच स्तरावर प्रगत राष्ट्रातील विद्यापीठांतही सहज प्रवेश मिळाला असता, तसे होत नाही. हे थोडे तपशीलाने सांगण्याचे कारण की अशी अवधाने राखली नाहीत तर ढोबळ निष्कर्ष अनेकदा दिशाभूल करणारे ठरु शकतात.

एक आकडा मात्र असा आहे की तो कितीही ढोबळ असला तरीही निर्णायक महत्त्वाचा होऊ शकतो. शिक्षणावर होणाऱ्या एकूण खर्चापैकी ८० टक्क्यांहून अधिक खर्च शिक्षकांच्या वेतनावर होत असतो. प्राथमिक, दुय्यम, उच्च अशा स्तरांवर हे प्रमाण थोडे आगेमागे असले तरी तसेच ठळक आहे. यातून सहज निष्कर्ष निघतात ते असे :

१.शिक्षकांच्या वेतनश्रेणीचा विचार करताना एकूण शिक्षणावर त्याचा परिणाम कसा होईल याचे अवधान ठेवणे आवश्यक असते. शिक्षकांचे, प्राध्यापकांचे वेतन वाढविण्या-ऐवजी आपली गुणवत्ता त्यांना वाढविता येईल अशा सुविधा त्यांना उपलब्ध करून द्याव्यात असा विचार मी कोठारी आयोगापुढे मांडला होता. निवास, आरोग्य, प्रवास, ग्रंथखरेदी, महाविद्यालयात स्वतंत्र अभ्यासिका अशा सुविधा माझ्या मनात होत्या. नुसत्या वेतनवाढीने हे साध्य होतेच असे नाही. (भाववाढ लक्षात घेऊन जी वेतनवाढ त्या कारणामुळे करणे आवश्यक आहे ती मात्र वेळोवेळी व त्याच प्रमाणात करीत गेले पाहिजे. त्यासाठी आंदोलनाचीही आवश्यकता असू नये.)

२. या वेतनाखेरीज अन्य पूरक शिक्षणाची साधने पुरविण्याकडे लक्ष दिले गेले नाही तर एकूण सर्वच खर्च वाया जातो. आपल्या शिक्षणव्यवस्थेत हे घडले आहे व असे घडल्याचे शासनालाही मान्य आहे. Operation Blackboard ची आवश्यकता वाटावी हाच याचा पुरावा आहे. हे प्राथमिक स्तरावर आहे त्याचप्रमाणे दुय्यम व उच्च स्तरांवरही आहे. हे घडले याला जबाबदार कोण? असा प्रश्न विचारण्याचा मात्र आपल्याकडे प्रघात नाही. परंतु गुणवान शिक्षक व त्यांना आवश्यक ती पूरक साधने असा मेळ घातल्याखेरीज आपल्या शिक्षणाचा स्तर उंचावणार नाही आणि शिक्षणाचे उत्तरोत्तर अवमूल्यन होत असलेला देश या जगाने केलेल्या आपल्या मूल्यमानपनाला समर्थ उत्तर देता येणार नाही.

शेवटची महत्त्वाची आकडेवारी अशी आहे की उच्च शिक्षणावर होत असलेल्या या सर्व खर्चाचा मुख्य लाभ लोकसंख्येतील सर्वोच्च स्तरावरील वीस टक्के लोकांच्या मुलांना मिळतो. जागतिक बँकेच्या अहवालाप्रमाणे भारतात या वीस टक्के लोकांच्या हातात भारताच्या एकूण राष्ट्रीय उत्पन्नापैकी पन्नास टक्के उत्पन्न आहे.

### स्वातंत्र्यसंपादनाच्या आधी

महात्मा गांधींनी १९३७ मध्ये लिहिले होते :

"कॉलेजातील शिक्षणात देखील मी प्रचंड क्रांती करु

इच्छितो. त्याचा संबंध मी राष्ट्राच्या गरजांशी जोडू इच्छितो. यंत्रे आणि इतर कौशल्य यांच्यात प्रावीण्य संपादन करण्याबद्दल काही पदव्या असतील. कॉलेजांनी देशातील भिन्नभिन्न कारखान्यांशी संबंध राखावा आणि त्या कारखान्यांनी आपल्याला लागणाऱ्या तज्ज्ञ विशारदांच्या शिक्षणाची तरतूद करावी. सामान्यज्ञानाची (आर्टस्) कितीतरी खाजगी कॉलेजे आज स्वतःच्या पायावर उभी आहेत. त्यासाठी राज्यांना स्वतःची कॉलेजे काढण्याची गरज नाही. आयुर्वेदा-संबंधी कॉलेजे सरकारमान्य औषधालयांना जोडून काढावीत. आणि ज्या अर्थी अशी औषधालये धनिक वर्गांना लोकप्रिय होतात, त्याअर्थी त्यांनी वर्गणी गोळा करुन ती काढावीत, अशी त्यांच्याकडून अपेक्षा करावयास हरकत नाही. राहिली शेतकी कॉलेजे. त्यांना जर आपल्या नावाची लाज राखावयाचीच असेल तर स्वावलंबी व्हावेच लागेल. या शेतकी विद्यालयांतून बाहेर पडलेल्यांचा मला फार निराशाजनक अनुभव आला आहे.

मग उरला शिक्षकांचा प्रश्न. देशातील आर्थिक मान लक्षात घेऊन एका ठरावीक जीवनवेतनावर आपल्या आवडीचा विषय काही काळ, समजा पाच वर्षेपर्यंत, शिकविण्याची देशातील विद्वानांवर सक्ती करण्यात यावी. उच्चतम संस्थांतील प्राध्यापक व शिक्षक जे लठ्ठलठ्ठ पगार घेत आहेत ते बंद व्हावेत."

गांधीजींनी हे १९३७ मध्ये लिहिले. त्यावेळी विविध राज्यांत १९३५ च्या कायद्यानुसार झालेल्या निवडणुकीत कॉंग्रेस पक्ष अधिकारावर आला होता. १९३९ मध्ये त्या सर्वांनी राजीनामा दिल्यामुळे तो कालखंड आपण सोडूनदेऊ.

**आणि नंतर**

परंतु, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काय झाले?

'This must not happen now' हा जवाहरलालजींचा आदेशवजा इशारा आपण पाहिला. त्यानंतरच्या दोनतीन वर्षांतच सरदार पटेल यांनी 'आम्हाला शैक्षणिक परिवर्तन करावयाचे आहे हे खरे, परंतु आम्ही अशा एका विचित्र जाळ्यात सापडलेले आहोत की काही करता येत नाही', असा आशयाचे निराशेचे उद्‌गार एका सभेत काढले होते. त्या उद्‌गारांना उद्देशून विनोबाजींनी पुढे लिहिले होते : 'एखाद्या सामान्य किंवा असामान्यही विचारवंताने असे उद्‌गार काढले असते तर एक वेळ समजू शकले असते, परंतु देशाचे धोरण ठरविण्याचे व ते पार पाडण्याचे राज्यसूत्र ज्यांच्या हातात आहे तेच लोक ज्या वेळी असे उद्‌गार काढतात, त्यावेळी अचंबा वाटतो. जाळे कितीही बळकट व गुंतागुंतीचे असो, ते तोडलेच पाहिजे.'

ही राजकीय असमर्थता आकस्मिकपणे निर्माण झालेली होती असे नाही, ती एकूण भारतीय वर्ग-वर्ण वर्चस्वाच्या परिस्थितीतच अनुस्यूत होती. गांधीजींना याचे प्रथमपासून भान होते. १९२२ मध्ये अहमदाबाद कोर्टात त्यांच्यावर चाललेल्या खटल्यात दिलेल्या आपल्या निवेदनात गांधीजींनी भारतीय जनतेच्या दारिद्र्याला दोघांकडून होणारे शोषण जबाबदार धरले होते. एक म्हणजे परकीय ब्रिटिश सत्तेकडून होणारे शोषण व दुसरे भारतातीलच वरिष्ठ वर्गाकडून होणारे शोषण. स्वातंत्र्यसंपादनानंतर पहिल्या प्रकारचे शोषण थांबले होते. परंतु वरिष्ठ वर्गाकडून होणारे शोषण मात्र चालूच होते. ब्रिटिश गेल्यानंतर आपण मतदानाचा अधिकार प्रत्येक एकवीस वर्षे वयाच्या वरच्या स्त्री-पुरुषाला दिला असला तरी प्रत्यक्षात राज्यसत्ता मात्र या वरिष्ठ वर्गाच्याच हातात राहिली.

हे जाळे म्हणूनच तुटत नव्हते; किंबहुना तोडण्याचा खरा प्रयत्नही होत नव्हता.

१९७८ मध्ये राजकोट येथे भारतातील विद्यापीठांच्या कुलगुरूंची वार्षिक परिषद होती. त्या वेळचे पंतप्रधान श्री. मोरारजी देसाई अर्धा दिवस उपस्थित होते. आपल्या प्रदीर्घ भाषणात शेवटी त्यांनी शिक्षणाच्या माध्यमाच्या प्रश्नाचा निर्देश केला. शिक्षणाचे माध्यम महाविद्यालयीन स्तरांवर प्रादेशिक भाषाच राहिले पाहिजे हा विचार त्यांनी आग्रहाने मांडला आणि भाषणाच्या शेवटी विचारले -

'या विचाराच्या कोण विरोधी आहेत?'

सर्वजण स्वस्थ राहिले. मी उभा राहून म्हणालो :

'ही आपली विचारण्याची पद्धत चूक आहे.'

'चूक असे तुम्ही का म्हणता?' मोरारजींच्या आवाजात ते आपला राग झाकू शकले नाहीत.

मी म्हणालो :

'असा प्रश्न तुम्ही विचारलात तर 'मी' असे कोण म्हणेल? खरा प्रश्न वेगळा आहे. कुलगुरू बदलतात, शिक्षणमंत्री बदलतात, पंतप्रधानदेखील बदलतात. परंतु गेली तीन दशके निदान एकच राजकीय पक्ष तर अधिकारावर आहे.

असे असतानादेखील इतक्या कालावधीत ही गोष्ट का घडून येऊ शकली नाही हा खरा प्रश्न आहे.'

मोरारजींनी या प्रश्नाचे उत्तर दिले नाही.

ज्या वरिष्ठ वर्गाच्या हातात सत्ता आहे त्या वर्गाची शिक्षणातील मूलभूत परिवर्तनाला मान्यता नाही हे याचे खरे कारण आहे. कारण असे मूलभूत परिवर्तन झाले तर आपल्या आर्थिक व राजकीय सत्तेला धक्का पोचल्याखेरीज राहणार नाही याची कदाचित प्रकट नसली तरी अप्रकट जाणीव त्या वर्गाला आहे.

**समस्या : काही उत्तरे**

भारताच्या शैक्षणिक समस्यांच्या संदर्भात काय व कसे घडवावे याचा साक्षेपी विचार सुमारे दहा वर्षांपूर्वी करण्यात आला होता. Citizens for Democracy या संस्थेने या प्रयत्नाला चालना दिली होती. या निवेदनाचा प्राथमिक मसुदा कै. जे. पी. नाईक यांनी तयार केला होता. छोट्या छोट्या चर्चासत्रांत देशातील अडीचशेहून अधिक शिक्षणतज्ज्ञांनी त्या मसुद्यावर चर्चा केल्यानंतर अखेरचे निवेदन तयार करण्यात आले. भारतातील सुमारे चाळीस विख्यात विचारवंतांच्या व समाजधुरीणांच्या सह्यांसह १९७८ मध्ये हे निवेदन प्रसिद्ध करण्यात आले. Education for Our People : A Policy Frame for the Development of Education (१९७८-१९८७) असे त्या निवेदनाचे शीर्षक आहे. 'भारतीय जनतेचे शिक्षण' या शीर्षकाखाली या सुमारे शंभर पृष्ठांच्या निवेदनाचे भाषांतर 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन, पुणे' या संस्थेने प्रसिद्ध केले आहे.

उच्च शिक्षणाच्या संदर्भात या निवेदनाचा आशय काय आहे? निवेदन सांगते :

१. दहाव्या इयत्तेपर्यंत सर्वांना मुक्त प्रवेश असावा. त्यानंतर मात्र आवश्यक तेथे निवडीचे तत्त्व अवलंबावे लागेल.

२. अशा निवडीच्या तत्त्वामुळे आपल्याला संधी नाकारण्यात येते अशी समाजातील खालच्या वर्गातील लोकांच्या मनातील रास्त भावना आहे, या भावनेला वाव राहणार नाही. त्या वर्गातील बुद्धिमान विद्यार्थ्यांना वाव मिळेल अशाच पद्धतीने निवड केली गेली पहिजे. बुद्धिमापनाच्या योग्य कसोट्या यासाठी तयार कराव्या लागतील.

३. समाजाच्या सर्व वर्गातून अशी निवड होणे इष्ट आहे. कारण बुद्धिमान मुले सर्वच वर्गात, जातिजमातींत सारख्याच प्रमाणात जन्माला येत असतात. त्यांना संधी मिळणे हे केवळ त्यांच्या स्वतःच्या, त्यांच्या कुटुंबाच्या, समाजाच्याच हिताचे आहे असे नाही तर असा गुणवत्तेचा सार्वत्रिक शोध आणि विकास संपूर्ण राष्ट्राच्याच हिताचा आहे.

४. गरिबांना हे शिक्षण मोफत तर असावेच, परंतु शिवाय अशा विद्यार्थ्यांना ते शिक्षण पूर्ण करण्यासाठी इतर पूरक सहाय्यही देण्यात यावे. वरिष्ठ व श्रीमंत वर्गातील विद्यार्थ्यांकडून या शिक्षणाचा जितका खर्च फी रूपाने घेतला जाणे शक्य असेल, तितक्या प्रमाणात घेतला जावा. सरसकट समान फी-सवलतीचे धोरण असू नये. ते धोरण श्रीमंतांसाठी अनावश्यक व गरिबांसाठी अन्यायकारक आहे.

५. राष्ट्राच्या विविध क्षेत्रांतील मनुष्यबळाच्या गरजेचा विचार करून त्या क्षेत्रांतील विविध शाखांच्या विस्ताराचा व आवश्यक तेथे अशा विस्तारावर बंधने घालण्याचा विचार व्हावा. परंतु अशी बंधने घालतानादेखील सामाजिक न्यायाचे तत्त्व दृष्टिआड होऊ देऊ नये.

६. अगदी अटळ असेल तेथेच पदवी आणि नोकरी यांचा संबंध जोडला जावा. एरवी नोकरीचा व पदवीचा संबंध ठेवू नये.

७. ज्यांना उच्च शिक्षण घेता येणार नाही त्यांच्यासाठी निम्न स्तरावरील अन्य व्यावसायिक शिक्षणाच्या संधी उपलब्ध असाव्यात. अशा व्यवसायातून त्यांना योग्य जीवनमान उपलब्ध होऊ शकेल अशी राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेची रचना व आर्थिक विकासाची गती असावी लागते.

८. महाविद्यालयांतून ज्यांना उच्च शिक्षण घेता आले नाही अशांच्यासाठीही त्यांच्या आवडी-सवडीप्रमाणे उच्च शिक्षण घेण्याची सोय मुक्त विद्यापीठे (Open University) स्थापून करण्यात आली पाहिजे.

या निवेदनावर माझी स्वाक्षरी आहे आणि मी या निवेदनाशी आजही सहमत आहे.

उच्च शिक्षणातील खरे कळीचे प्रश्न : १. सामाजिक न्यायाचा संदर्भ न तोडता प्रसार, २. आंतरराष्ट्रीय स्पर्धेत टिकू शकेल अशी गुणवत्ता आणि ३. प्रगतीपर सामाजिक मूल्यांचे पोषण हे आहेत. सामाजिक परिवर्तन व शैक्षणिक परिवर्तन ही दोन्ही साथसाथ व एकमेकांना पूरक आणि पोषक पद्धतीने

चालू राहिली तरच हे कळीचे प्रश्न सुटण्याची शक्यता आहे, ही निवेदनाची भूमिका आहे. या पद्धतीच्या कार्यक्रमाला मी Programme ASSET (Action for Simultaneous Social and Educational Transformation) असे नाव दिले आहे. शैक्षणिक गुणवत्तेचे आपले मुख्य कर्तव्य पार पाडीत असतानाच हे इतर कार्य केले जाऊ शकते. त्यातून विद्यार्थ्यांवरील शैक्षणिक व सामाजिक संस्कारही दृढ करता येतात व प्राध्यापकांच्या शैक्षणिक गुणवत्तेचा कस वाढविण्यातही मदत होऊ शकते. याचा तपशीलही मी अन्यत्र मांडला आहे व या पद्धतीच्या कार्यक्रमात रस असणाऱ्यांना तो मी उपलब्ध करून देऊ शकतो.

असे कळीचे प्रश्न सोडविण्याच्या मागील प्रमुख कळ 'प्राध्यापकांची कुवत आणि वृत्ती' ही आहे. दुर्दैवाने गेल्या काही वर्षांत 'प्राध्यापकांचे वेतन' हाच इतका प्रक्षोभक प्रश्न बनविला गेला आहे की या मूलभूत महत्त्वाच्या अंगाकडे लक्ष द्यावयास कोणाला सवड झालेली नाही. विनोबाजी एकदा तीव्रपणे प्राध्यापकांना उद्देशून म्हणाले होते : 'तुम्ही आपल्या अन्य मागण्यांसाठी कितीही प्रखर आंदोलन करा, त्याला माझी काही हरकत नाही, परंतु तमच्या मूलभूत कर्तव्याविषयी दक्षता घेणे तुम्हाला कोणत्याही कारणाने टाळता येण्यासारखे नाही.' मूलभूत कर्तव्य पार पाडण्याच्या दृष्टीने समाजालाही योग्य वाटेल अशी आचारसंहिता तायर करणे व तिची आपण कार्यक्षमपणे कार्यवाही करू शकू अशी प्रभावी यंत्रणा तयार करणे हे आद्य महत्त्वाचे काम अद्याप करावयाचे राहिले आहे.

प्राध्यापकांच्या वेतनाचाही या संदर्भात असाच एक स्फोटक प्रश्न बनला आहे. याची प्रमुख अंगे कोणती आहेत?

यातील मूलभूत प्रश्न राष्ट्रातील एकूण वेतनश्रेणीचा (wage-structure) आहे. त्या वेतनश्रेणीतही केवळ संघटित वर्गांच्या वेतनमानाचा परस्परांशी काय संबंध राहावा असा तो मर्यादित प्रश्न नाही. या एकूण वेतनश्रेणींचाच राष्ट्रीय उत्पन्नाशी व राष्ट्रातील खालच्या सत्तर टक्के लोकांच्या जीवनमानाशी संबंध कधीच नव्हता व आता तर संघटनेच्या सामर्थ्याच्या जोरावर या दोहोंमधील दरी उत्तरोत्तर रुंदावतच चालली आहे. आमदार, खासदार आदी लोक, नोकरशाही, इतर संघटित कामगारवर्ग यांच्या परस्परवेतनश्रेणीच्या संतुलनाच्या स्पर्धेत आता प्राध्यापकवर्गही उतरला आहे. ही स्पर्धा थांबविण्याचे सामर्थ्य आज कोणामध्येही नाही. यामुळे या वृत्तीविषयी नुसती नाराज भूमिका घेऊन कोणताही कार्यभाग होण्यासारखा नाही. अशी 'holier than thou' (मी तुझ्यापेक्षा अधिक सत्त्वशील) मांडणी केवळ परवंचक नव्हे तर आत्मवंचकही होऊ शकते. परंतु राष्ट्राच्या हिताचा विचार करावयाचा तर स्वतःवर अशी बंधने घालून घेऊनच बुद्धिजिवी व समाजाचे वैचारिक नेतृत्व करणारा वर्ग अशी आपली प्रतिमा प्राध्यापकवर्ग निर्माण करू शकतो. वर उल्लेख केलेल्यासारखी आचारसंहिता तयार करून ती कार्यवाहीत आणण्याचे कार्य प्राध्यापक संघटनांनी केले तर त्या आपली सामाजिक विश्वासार्हता परत मिळवू शकतील व इतर संघटनांच्या पुढे एक सामाजिक आदर्शही ठेवू शकतील.

या विश्वासार्हतेवरच उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील सर्वात महत्त्वाची गोष्ट अवलंबून आहे. ती गोष्ट म्हणजे शैक्षणिक स्वातंत्र्य किंवा स्वनियंत्रण. अध्यायन-अध्यापन-संशोधन-मतप्रदर्शन यांविषयीच्या स्वातंत्र्याचा यात समावेश होतो. 'शासन न्यायाधीशांना वेतन देते म्हणून त्याला न्यायाचे नियंत्रण करण्याचा अधिकार मिळत नाही, तसेच शिक्षणक्षेत्राचेही आहे' असे विनोबाजी एकदा म्हणाले होते. त्यातील आशय सत्य आहे परंतु ही सत्यता टिकविण्याचे उत्तरदायित्व केवळ शासनावर नाही; प्रामुख्याने ते प्राध्यापकांवर व त्यांच्या संघटनांवरच आहे.

आज उच्च शिक्षणात अमलात आणावयाची प्रमुख धोरणे त्यामुळे खालील आहेत:

१. समाजातील सर्व वर्गातील विद्यार्थ्यांना या स्तरावर संधी मिळेल असे निकष तयार करणे.

२. प्राध्यापकांनी स्वतःसाठी आचारसंहितेची रचना करणे व तिच्या पालनाची स्वतःची प्रभावी यंत्रणा उभी करणे.

३. अध्ययन-अध्यापन-संशोधन यांचा स्तर सतत उंचावत नेणे.

४. शिक्षण आणि समाजपरिवर्तन यांतील परस्परपूरक अनुबंध कसा राखता येईल याचा विचार करणे आणि त्यासाठी पोषक असे कार्यक्रम आखणे.

आपले राजकारण, आपले अर्थकारण आणि आपले शिक्षणही सर्व वरच्या वर्गाची मिरासदारी झालेली आहे. खालील वर्गातून थोडे लोक आजच्या परिस्थितीतही वर येतात हे खरे; परंतु खरी समान संधी मिळाली की अशा लोकांची संख्या त्या त्या गटांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात वाढू लागेल.

केवळ एवढ्यानेही भागणार नाही; कारण आजही असे वर येणारे लोक वरिष्ठ वर्गात समाविष्ट होण्यातच धन्यता मानतात आणि आपल्या मूळ बांधवांना विसरतात.

या सर्व दुष्टचक्रातून सुटका व्हावयाची असेल तर त्यासाठी जन-आंदोलनाखेरीज अन्य काही मार्ग नाही. या जन-आंदोलनाचे नेतृत्व कोण करणार? अशा आंदोलनांचे नेतृत्व वरिष्ठ व मध्यमवर्गातून आलेल्या लोकांनीच प्रारंभीच्या काळात केलेले असते असा जगाचा इतिहास आहे. शिक्षणक्षेत्रातील लोकांचे तर या संदर्भात विशेष उत्तरदायित्व आहे. विचारनिर्मिती आणि विचारजागृती हे तर शिक्षणक्षेत्राचे महत्त्वाचे कार्य आहे. विचारप्रसारातून जनजागृती व जनजागृतीतून जन-आंदोलन अशी ही प्रक्रिया होऊ शकते. या प्रक्रियेचा प्रारंभ प्राध्यापकांनी केला व जाणीवपूर्वक त्या प्रक्रियेला गती दिली तरच त्यांनी समाजापासून जे घेतले त्या ऋणाची फेड काही प्रमाणात तरी त्यांनी केली असे म्हणता येईल. हे घडत नाही ही खरी शोकांतिका आहे. १९७८ मध्ये निवेदनावर सह्या करणारे लोकदेखील राजवट बदलल्यानंतर आपले विचार मांडण्याच्या बाबतीत देखील पुढे आले नाहीत व त्यांच्यापैकी अनेकांनी आपला सूर बदलला ही गोष्टच विचाराच्या क्षेत्रातसुद्धा आपल्या व्यक्तिगत हिताला धक्का न बसेल अशा पद्धतीनेच विचार मांडण्याच्या भारतातील विचारवंतांच्या सार्वत्रिक वृत्तीवरच प्रकाश टाकते.

आणि मग If all the light that be within you is darkness, how great is that darkness (जर सारा प्रकाशच अंधार झाला तर तो अंधार किती गडद असेल) अशी खंत मनात निर्माण होते. सुदैवाने त्या अंधारात रवींद्रनाथांच्या पणतीची थरथर धीर देत राहते.

(नवभारत, जून-जुलै १९८९)

☑ ☑ ☑

१५ जुलै २००७ ला पुणे विद्यापीठाचे कुलगुरू डॉ० नरेंद्र जाधव यांनी विविध कुलगुरू, शिक्षणतज्ज्ञ व अखिल भारतीय शासकीय प्रतिनिधी यांचे एक Brain Storming Session आयोजित केले होते. मला आमंत्रण होते परंतु प्रकृतीच्या कारणास्तव मी जाऊ शकलो नाही, परंतु माझे टिपण मी पाठवले होते. ते असे होते :

Very brief note for first session for 15th July 2007 Brain-storming Session at University of Pune by Prof. D.A. Dabholkar.

First Session

1. All these aspects are allied with the role of the University in relation to the community.

2. Three decades (or more) ago Derek Bok, President of Harvard, for over a decade wrote a book 'Beyond the Ivory Tower' addressing the issue.

3. The call is even more urgent in relation to a country like ours. We have of necessity, to serve the cause of excellence as well as of social transformation.

4. Inter disciplinarity which at present is only in the initial stages of development has to be nurtured to full strength.

5. University Social Science departments can act as the watch-dogs of the implementation of progressive legislation. Supreme court initiatives have already proved this. Various universities can concentrate on select areas well-distributed among themselves.

6. I have also found that students coming from rural areas and staying in their villages during vacations can be enlisted in this type of work at nominal cost. This also gives the students practical training in organization and leadership.

Those interested in these and similar ideas are welcome to contact me.

☑ ☑ ☑

# काही चिंतन

## सर्वांसाठी शिक्षण : राजकीय संदर्भ

### देवदत्त दाभोलकर

भारतातील लोकांना शिक्षण कसे उपलब्ध होऊ शकेल या समस्येचे जे. पी. नाईक यांनी अखंड चिंतन केले. या संदर्भात निर्माण होणाऱ्या प्रश्नांचा विचार 'भारतीय जनतेचे शिक्षण' या १९७८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या निवेदनात त्यांनी प्रभावीपणे मांडला आहे. या निवेदनावर भारतातील सुमारे चाळीस विचारवंतांच्या व समाजधुरीणांच्या स्वाक्षऱ्या आहेत. हे निवेदन प्रसिद्ध होण्याच्या आधी किमान एक दशक तरी जे. पी. नाईक यांची ही विचारसरणी ते बाळगीत आले होते. आयुष्याच्या अखेरपर्यंत त्यांनी या विचारसरणीचा पाठपुरावा केला. या दृष्टीने पाहिले तर त्यांच्या जीवनाचा अखेरचा काळ त्यांना निराश मानसिक अवस्थेत घालवावा लागला. निर्वात पोकळीत आपले तेजस्वी पंख फडफडवणाऱ्या एखाद्या देवदूताची ती निराशा होती. 'कोठारी शैक्षणिक आयोग आणि तदनंतर' या ग्रंथाच्या जवळजवळ प्रत्येक पानावर या निराशेचा ठसा उमटलेला आढळतो. या ग्रंथातील त्यांच्या मांडणीत ते स्वत: व्यक्तिगतरित्या त्या पराभवाला कारणीभूत आहेत अशा अपराधी भावनेचा स्पर्श झाल्याचा आभास होतो. डॉ. माल्कम आदिशेषय्या यांनी आपल्या त्या ग्रंथाला लिहिलेल्या प्रास्ताविकातही जे. पी. नाईक यांच्या मनातील व्यक्तिगत अपराधित्वाची भावना हळुवारपणे दूर करण्याचा प्रयत्न केला आहे.

आपल्या मनाविरुद्ध अशी मते कोणीही व कितीही तीव्रतेने मांडली तरी जे. पी. नाईक त्यांचे स्वागतच करीत. त्यांच्या स्मृतिविषयी आदरभावाने आयोजित केलेल्या या चर्चासत्रात त्यांच्या विचारांचे सडेतोड मूल्यमापन करणे हीच आपण त्यांना अर्पण केलेली खरीखुरी आदरांजली होऊ शकेल.

सारांशरूपाने सांगावयाचे तर, शैक्षणिक परिवर्तनाची भारतातील मूलगामी सामाजिक व आर्थिक परिवर्तनाशी सांगड घातल्याखेरीज भारतात खरे शैक्षणिक परिवर्तन होऊ शकणार नाही, असा जे. पी. नाईक यांचा सिद्धांत होता. त्याचप्रमाणे, भारतातील विचारवंत व अन्य क्षेत्रातील वरिष्ठ लोक आपण होऊन व्यक्तिगतरित्या (व एक वर्ग म्हणूनही) आवश्यक तो त्याग करावयास सिद्ध झाल्याखेरीज हे एकूण परिवर्तन सिद्ध होऊ शकणार नाही अशीही त्यांच्या विचारांची धारणा होती.

जे. पी. नाईक यांच्या विचारसरणीशी मी पूर्णपणे सहमत आहे. त्यांचे विचार मी या निबंधात त्यांच्याच शब्दात मांडत आहे. त्यांच्या मांडणीत सुधारणा करणे माझ्या आवाक्यापलीकडे आहे. परंतु ते उद्‌गार जे. पी. नाईक यांचे आहेत अशा स्वरूपाचे संरक्षण घेण्याची कल्पना माझ्या मनात नाही. चर्चासत्रात त्या विचारांना कोणी विरोध दर्शविला तर जे. पी. नाईक यांच्या नावाचा आडोसा न घेता त्या विचारांचा मी स्वतंत्रपणे पुरस्कार करु इच्छितो.

अशा विशेषणात पावलोपावली राजकीय संदर्भाचे धागेदोरे गुंतलेले आढळून येणे अटळ आहे ही गोष्ट उघड आहे. 'भारतीय जनतेचे शिक्षण' या निवेदनात ज्या राजकीय संदर्भाचा निर्देश करण्यात आलेला आहे तोच 'सर्वांसाठी शिक्षण' प्राप्त करून देण्याच्या प्रयत्नामागीलही राजकीय संदर्भ आहे.

**जे. पी. नाईक यांचा वैचारिक वारसा**

जे. पी. नाईक यांनी त्यांची भूमिका वेळोवेळी खालीलप्रमाणे स्पष्ट केली होती.

१. प्रौढ शिक्षणाच्या संदर्भात जे. पी. नाईक म्हणाले :

जनतेमध्ये आत्मजागृती निर्माण करण्यावर विशेष भर देण्याची गरज आहे. नागरिक म्हणून आपले अधिकार कोणते आहेत व आपली कर्तव्ये कोणती आहेत याचे भान जनतेला करून दिले पाहिजे आणि प्रत्येक व्यक्तीला स्वत:ची म्हणून काही प्रतिष्ठा असते याची जाणीव सर्वांना झाली पाहिजे. असे झाले तरच त्यांच्या अधिकारावर आक्रमण होईल तेव्हा लोक प्रतिकारासाठी उभे राहू शकतील. पाऊली फ्रेअरीने जाणीव-

जागृतीचा जो कार्यक्रम सांगितला आहे काहीसा त्या स्वरुपाचा कार्यक्रम माझ्या मनात आहे. तशा स्वरुपाचा कार्यक्रम प्रौढ शिक्षणाला राष्ट्रीय विकासासाठी पूरक आकार देऊ शकेल. (ठळक अक्षरे नवी १९७४.)

२. मला हे मान्य केले पाहिजे की राजकीय व आर्थिक अशा दोन्ही आघाड्यांवर आपण फारच उणे पडलो आहोत. **एकूणएक राजकीय पक्षांनी** आपले रूपांतर केवळ निवडणुका जिंकणारी एक यंत्रणा असे केले आहे. जनतेला संघटित करणे, आपल्या राजकीय अधिकारांची जाणीव तिला करुन देऊन आपली राजकीय शक्ती प्रभावीपणे कशी वापरावी याचे तिला शिक्षण देणे आणि विकासाच्या सर्व कार्यक्रमात जनता कार्यक्षमतेने उत्साहाने सहभागी व्हावी यासाठी तिला प्रवृत्त करणे या गोष्टीसाठी **कोणत्याही राजकीय पक्षाने** आवश्यक असे काहीही प्रयत्न केलेले नाहीत. (ठळक अक्षरे नवी १९७४.)

३. आपल्या राज्यघटनेच्या प्रारंभिक निवेदनात व राष्ट्रीय धोरणाच्या मार्गदर्शक सूत्रात दिलेली निदान काही वचने पाळण्याचा प्रयत्न आपण केलेला आहे व त्या दिशेने काही यशही मिळवलेले आहे. परंतु या सर्व प्रयत्नांचा एकूण परिणाम किती झाला व प्रत्यक्षात सामाजिक मूलभूत परिवर्तन करण्यामध्ये व समतेच्या दृष्टीने वाटचाल करण्यात आपण किती यशस्वी झालो? **या प्रश्नाचे उत्तर, एकूण पाहता, अतिशय निराशाजनक आहे.** (ठळक अक्षरे १९७५)

४. राष्ट्रीय एकात्मता हे आपण एक प्रमुख मूल्य म्हणून मान्य केले आहे. आणि भाषावाद, प्रांतवाद व धर्म-जातिवाद यांच्याविरुद्ध झगडण्याची आवश्यकताही आपण स्वीकारली आहे. दुर्दैवाने या मूल्यांच्या संवर्धनाच्या दृष्टीने आपल्या शाळांना व शिक्षकांना व्यावहारिक कार्यक्रमाचे मार्गदर्शन देण्याबाबत आपण काही केले नाही आणि आपले स्वप्नरंजन वास्तवात उतरविण्यासाठी आपण काहीच पाऊले उचलली नाहीत.

५. शिक्षण आणि राजकारण यांची फारकत करण्यात आपण यशस्वी होऊ शकलो नाही. राजकीय आधार मिळावा परंतु राजकिय हस्तक्षेप न व्हावा अशी आपली इच्छा होती. परंतु प्रत्यक्षात मात्र भरपूर राजकीय हस्तक्षेप व राजकीय आधाराचा मात्र अभाव असाच आपल्याला अनुभव आला. याचे आपल्या शिक्षणाच्या गुणवत्तेवर व कार्यक्षमतेवर भयावह परिणाम झाले आहेत. राष्ट्राच्या भविष्यकालाच्या दृष्टीने ही काही आशादायी गोष्ट नाही. (१९७५)

६. 'भारतातील जनतेचे शिक्षण' हे निवेदन विकासाच्या एका नव्या व्यूहरचनेवर आधारित आहे. त्या व्यूहरचनेची गृहीतकृत्ये खालीलप्रमाणे आहेत :

अ. जनता ही सार्वभौम आहे हे तत्त्व आम्ही स्वीकारले आहे.

ब. आपल्या समाजरचनेत बदल करून दारिद्र्य व शोषण यापासून मुक्त असा लोकशाही, धर्मातीत व समाजवादी भारत घडवता येईल असा आमचा विश्वास आहे. आपले वेतनविषयक धोरण अधिक समानतेच्या तत्त्वावर आधारित असले पाहिजे. धर्म किंवा सामाजिक दर्जा यांचा विचार न करता सर्व संधी उपलब्ध करून दिली गेली पाहिजे असे आम्ही मानतो.

क. द्रुतगतीने सामाजिक परिवर्तन करावयाचे तर **शिक्षण क्षेत्रातील कार्याबरोबरच राजकीय व नैतिक मूल्यांच्या क्षेत्रात क्रियाशील आघाडीवर** असणे आवश्यक आहे व या सर्व क्षेत्रातील कार्य परस्परांना पूरक अशा रीतीने गतिमान राहिले पाहिजे अशी आमची धारणा आहे. (ठळक अक्षरे नवी.)

७. १९७९ मध्ये प्रसृत करण्यात आलेल्या राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाच्या आराखड्यावर जे. पी. नाईक यांनी केलेले भाष्य खालीलप्रमाणे होते.

'या धोरणात ज्या पद्धतीची मूलगामी पुनर्रचना अभिप्रेत आहे त्या पद्धतीची रचना अखिल राष्ट्रात आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक परिवर्तनाचे आंदोलन एकाच वेळी केल्याखेरीज अस्तित्वात येऊ शकणार नाही. या धोरणाच्या निवेदनात या आवश्यकतेच्या जाणिवेचा मागमूसही आढळून येत नाही.'

याखेरीज जे. पी. नाईक यांनी पुढे लिहिले :

प्रत्यक्ष व्यवहारात अशी धोरणविषयक निवेदने म्हणजे एक 'सदिच्छांची घोषणा' एवढेच त्यांचे फलित राहते. शासन या संदर्भात उपलब्ध असलेल्या दोन पद्धतींपपैकी एक पद्धत स्वीकारु शकते. एक पद्धत शासनाच्या विश्वासार्हतेला महत्त्व देते. घोषणा छोटी असली तरी चालेल परंतु ती पार पडलीच पाहिजे असा या पद्धतीचा आग्रह असतो. दुसरी पद्धत भपकेबाज महत्त्वाकांक्षी उद्दिष्टांचा घोष करते व ती शेवटी पार पडतात की नाही याची चिंता करीत नाही. ही दुसरी पद्धत हा



अनुक्रमणिका

आपला भारतीय विशेष आहे. दिलेली वचने आणि त्यांची परिपूर्ती या गोष्टी एकमेकांपासून एकदम अलग ठेवण्याचे जणू आपल्याला बाळकडूच मिळालेले आहे. (१९७९)

८. 'भविष्यकालासाठी आपल्याला मिळालेले धडे' याविषयी विवेचन करताना १९८० मध्ये जे. पी नाईक यांनी लिहिले :

'भारतात शैक्षणिक, आर्थिक व सामाजिक परिवर्तने एकसाथ चालली पाहिजेत ही गोष्ट सर्व संबंधितांच्या लक्षात आणून देण्यासाठी आपण अट्टाहासाने प्रयत्नशील राहिले पाहिजे. **समाजरचनेत मूलभूत बदल केल्याखेरीज महत्त्वाचे शैक्षणिक बदल घडवून आणणे शक्य होईल अशा भ्रमाचे फार मोठे दुष्परिणाम होतात आणि म्हणून हा भ्रम कटाक्षाने दूर केलाच पाहिजे.**' (ठळक अक्षरे नवी.)

राष्ट्रीय शिक्षणव्यवस्था अस्तित्वात आणावयाची तर त्यासाठी केवढी किंमत मोजावी लागते याची जाणीव लोकात सहसा आढळून येत नाही. बहुतेक वेळा तशी फार किंमत मोजावी लागणार नाही असेच आपण धरुन चालतो. अनेकदा ही किंमत मोजणे म्हणजे केवळ राष्ट्रीय उत्पन्नाचा काही भाग (जसे, सहा टक्के) शिक्षणावर खर्च करावयास सिद्ध असणे असाच याचा अर्थ केला जातो. चांगली शिक्षणव्यवस्था अस्तित्वात आणावयाची असेल तर ज्या वेगवेगळ्या किमती मोजाव्या लागतील त्यात 'पैसा' ही सर्वात कमी महत्त्वाची गोष्ट आहे हेच लोकांना नीट शिकविले पाहिजे. शैक्षणिक सुधारणांसाठी पैशाची आवश्यकता असते ही गोष्ट तर खरीच. परंतु केवळ पैसा आपण ओतत राहिलो तर आपण आपल्या ध्येयाकडे जाऊ शकू अशी सुतराम शाश्वती नाही. पैशाच्या गुंतवणुकीपेक्षा नवीन विचारपद्धतीची गुंतवणूक महत्त्वाची आहे. त्याचप्रमाणे शिक्षक, विद्यार्थी, शैक्षणिक प्रशासन, अन्य संबंधित गट यांच्याकडून ध्येयवादी वृत्तीने व सातत्याने परिश्रम केले जाणे महत्त्वाचे आहे. यासाठी लोकांना अप्रिय असे कठोर निर्णय घेण्याचे धैर्य असणे आवश्यक आहे. समाज-परिवर्तनाला आपखुशीने तयार असणे आवश्यक आहे. **समाजपरिवर्तनाला आपखुशीने तयार असणे ही तर सर्वात महत्त्वाची गोष्ट होय.** (ठळक अक्षरे नवी.)

९. खरे तर आपल्याला आपल्या मनातून आजचीच वरिष्ठ वर्गाचे वर्चस्व असलेली समाजरचना कायम ठेवावयाची असते. आपण आपल्या प्रयत्नात अयशस्वी होतो याचे यामुळे मुळीच आश्चर्य वाटावयास नको. आपली खरी उद्दिष्टे लक्षात घेतली तर आपण आपल्या प्रयत्नात यशस्वी झालो असतो तर तेच एक मोठे आश्चर्य झाले असते. (१९८०.)

१०. भविष्यकालीन समाजरचना कशी असावी व ती अस्तित्वात आणण्याचे मार्ग कोणते असावेत याविषयी सर्वांचेच एकमत होऊ शकेल असे नाही, हे आपण मान्य केले पाहिजे. अशा एकमताची आवश्यकताही नाही. समाजरचने-विषयी भिन्न कल्पना असू शकतात. परंतु या संदर्भातील पुरेशी चर्चादेखील राष्ट्रीय स्तरावर आपण उभी करू शकलो नाही ही खरी दुःखाची गोष्ट आहे. सर्व संबंधित गटांमध्ये विद्याभ्यासक, राजकारणी लोक, शिक्षक, विद्यार्थी, सर्वसामान्य जनता या चर्चेला प्रभावी चालना देणे हे काम अग्रक्रमाने हातात घेतले पाहिजे. ही चर्चा जसजशी गती घेईल तसतसे आपल्या समोरील समस्यांचे स्वरुप अधिकाधिक स्पष्ट होत जाईल व याहूनही महत्त्वाची गोष्ट अशी की या चर्चेच्या कार्यक्रमातून मूलभूत सामाजिक व आर्थिक परिवर्तनाला वाहून घेणाऱ्या लोकांचा गटही वाढीस लागेल. सामाजिक व आर्थिक परिवर्तन घडवून आणण्याच्या प्रक्रियेला या सर्वांचा मोठाच आधार मिळेल. (१९८०.)

## आजची परिस्थिती

१९७९ च्या राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाच्या आरा-खड्यात शैक्षणिक, सामाजिक, आर्थिक परिवर्तन एकसाथ करण्याच्या आवश्यकतेचा निर्देशही नव्हता म्हणून जे. पी. नाईक यांनी दुःख व्यक्त केले होते. १९८६ मध्ये आलेल्या नव्या शैक्षणिक धोरणाच्या निवेदनाविषयी आपल्याला असेच दुःख व्यक्त केले पाहिजे.

परंतु ही सर्वव्यापी मूलभूत उणीव आपण बाजूला ठेवली तर एरवी तरी आपली परिस्थिती आज काय आहे? आणि या परिस्थितीचे राजकीय संदर्भ काय आहेत?

## सातवी पंचवार्षिक योजना

सातवी पंचवार्षिक योजना खालील गोष्टींचा निर्देश करते.

१. शिक्षणासाठी करावयाची तरतूद प्रामुख्याने राज्यांच्या अधिकारक्षेत्रात केलेली आहे. केंद्रसरकार समन्वय करण्याचे कार्य करील आणि नव्या प्रयोगांना नेतृत्व व

मार्गदर्शन देईल. (१०.८२).

२. १९८३-८४ च्या शिक्षणावरील एकूण 'अनियोजित' (Non plan) खर्चाचे अंदाजपत्रक ५२२९ कोटी रुपयांचे होते. त्यापैकी ९१ टक्के भाग राज्यांच्या अधिकारक्षेत्रात होता. (१०.८२)

३. राष्ट्रातील शिक्षणावरील एकूण खर्चापैकी ८७ टक्के खर्च 'अनियोजित' या सदराखाली येतो. एकूण आर्थिक टंचाई लक्षात घेता या सर्व रकमेचा सर्वोत्कृष्ट विनियोग होत आहे याविषयी दक्ष राहण्याची गरज आहे. (१०.८२)

४. पैशाखेरीज आवश्यक असणाऱ्या इतर गुंतवणुकीकडे लक्ष देण्याची गरजही आपण आग्रहपूर्वक प्रतिपादली पाहिजे. शिक्षक, विद्यार्थी व शैक्षणिक प्रशासक यांनी समर्पित वृत्तीने काम करण्याची आवश्यकता व विशेषकरून स्थानिक लोकांचा समर्पित वृत्तीचा सक्रीय सहभाग यांचे महत्त्व आहे. (१०.८३)

नियोजन मंडळाच्या मांडणीत मूलभूत राजकीय समस्यांचा निर्देश होईल अशी अपेक्षा करता येणार नाही. परंतु वर दिलेल्या यादीवरून कोणत्या प्रकारचे राजकीय ताण निर्माण होऊ शकतील यांचे सूचन मिळू शकते. ते ताण असे.

१. केंद्रशासन व राज्यशासन यांच्यातील राजकीय संबंधांचा सुयोग्य समतोल सांभाळावा लागेल. ज्या राज्यात बिगर काँग्रेस मंत्रिमंडळे अस्तित्वात आहेत त्यांच्या बाबतीत हा प्रश्न विशेषत्वाने निर्माण होईल. (भाषाविषयक धोरण हे याचे एक सहज नजरेला येणारे उदाहरण आहे.)

२. 'अनियोजित' खर्चापैकी जवळजवळ नव्वद टक्के खर्च शिक्षकांच्या वेतनासाठी होत असतो. या खर्चाचा सर्वोत्कृष्ट उपयोग कसा करून घेता येईल? १९८६ चे शैक्षणिक निवेदन सांगते : 'पहिली महत्त्वाची गोष्ट शिक्षणयंत्रणा कार्यक्षम पद्धतीने चालविणे ही आहे. सर्व शिक्षकांनी शिकविले पाहिजे आणि सर्व विद्यार्थ्यांनी शिकले पाहिजे.' (९.२) अशा विधानाला सखोल राजकीय संदर्भ असतात. शिक्षणव्यवस्था व शिक्षक यांना राजकारणाच्या आखाड्यात न ओढणे हा याचा एक संदर्भ आहे. तर शिक्षक वर्गाने सकस शिक्षण दिलेच पाहिजे या आग्रहासाठी राजकीय निर्धाराचा आवश्यक तो वापर करणे हा दुसरा संदर्भ आहे. या दोहोंमध्ये अंतर्विरोध आहे असे वाटणे स्वाभाविक आहे. परंतु शिक्षकवर्गाला आपले वर्तणुकीचे योग्य नियम तयार करणे व त्या नियमांची अंमलबजावणीही प्रभावीपणे करणे यासाठी उद्युक्त करणे हाच या अंतर्विरोधातून बाहेर पडण्याचा एकमेव मार्ग असू शकतो. या दृष्टीने काही प्रयत्नांची सुरुवात होत आहे ही एक दिलासा देणारी गोष्ट आहे. या प्रयत्नांना यश लाभो अशीच इच्छा कोणीही व्यक्त करील. आपल्या राजकीय समंजसपणाचा आणि कौशल्याचा कस पाहणारे हे एक बिकट आव्हान आहे.

### नवे राष्ट्रीय शिक्षणविषयक निवेदन

सातव्या पंचवार्षिक योजनेत मांडलेल्या या विचारापेक्षाही राष्ट्रीय शिक्षणविषयक निवेदनातील विचार थोडेसे अधिक मोकळेपणाने मांडण्यात आले आहेत. परंतु तरीही शासनाने प्रसृत केलेले निवेदन म्हणून येणाऱ्या कठोर मर्यादा या निवेदनालाही सांभाळाव्या लागल्या आहेत. परंतु असे असूनदेखील या निवेदनात जे प्रत्यक्षपणे सांगितले गेले आहे किंवा अप्रत्यक्षपणे ज्याचे सूचन झाले आहे त्यातून आपल्या शैक्षणिक धोरणाच्या राजकीय संदर्भाचा मागोवा घेता येतो. उदा. हे निवेदन खालील गोष्टी सांगते.

१. आज आपल्या सामाजिक व राजकीय राष्ट्रीय जीवनाच्या संदर्भात आपण अशा टप्प्यावर उभे आहोत की जी मूल्ये आपण दीर्घकाळ मान्य करीत आलो त्यांची घसरगुंडी होण्याची भीती निर्माण झाली आहे. धर्मातीतता, समाजवाद, लोकशाही व व्यावसायिक नीतिमत्ता ही मूल्ये उत्तरोत्तर अधिकाधिक ताणाखाली येत आहेत. (१.११).

२. सर्व शैक्षणिक कार्यक्रम धर्मातीततेच्या आपल्या आदर्शाला पूर्णपणे अनुसरून असतील. (३.४)

३. आपल्याला समतेच्या दृष्टीने वाटचाल करावयाची असेल तर केवळ प्रवेशाच्या वेळीच समान संधी देऊन पुरेसे होणार नाही. अशी संधी मिळालेले लोक अभ्यासक्रम पूर्ण करण्यातही यशस्वी होतील यासाठी योग्य अशी परिस्थितीही निर्माण केली पाहिजे. (३.६).

४. समान अधिकाराचे क्षेत्र (Concurrency) या रचनेत परस्पर सहभागाचे एक अर्थपूर्ण आव्हान आहे. आपले राष्ट्रीय धोरण या संकल्पनेशी अक्षरशः आणि मनापासून मिळतेजुळते राहील. (३.१३)

५. प्रौढ शिक्षणाचा कार्यक्रम साक्षरता व उपयुक्त कौशल्ये तर शिकवीलच, परंतु त्याचबरोबर आपली आर्थिक,










सामाजिक वस्तुस्थिती व ती बदलण्याची व सुधारण्याची शक्यता याचीही जाणीव निर्माण करील. (ठळक अक्षरे नवी ४.४)

६. शिक्षकांच्या कामाचे व्यवस्थितपणे मूल्यमापन करण्यात येईल. (५.३१)

७. मूल्यांच्या शिक्षणातून धर्मचर्चेला विरोध, धर्मवेडेपण, हिंसा, अंधश्रद्धा आणि दैववाद यांचे निर्मूलन करण्याचा प्रयत्न करण्यात येईल. (८.५)

८. शासनाच्या सहकार्याने शिक्षकांच्या राष्ट्रीय स्तरावरच्या संघटना शिक्षकांसाठी एक राष्ट्रीय आचारसंहिता तयार करतील व तिचे पालन केले जात आहे इकडे लक्ष ठेवतील (९.३)

'शैक्षणिक आव्हान' निवेदन

'शिक्षणाचे आव्हान : एक धोरणात्मक अवलोकन' (The challange of Education & Policy Perspective) हे निवेदन प्रत्यक्ष धोरणविषयक बांधिलकीपासून आणखी काही पाऊले दूर असल्यामुळे शिक्षणाच्या राजकीय संदर्भाच्या बाबतीत हे निवेदन आपली मते याहूनही थोड्या अधिक मोकळेपणाने मांडू शकले. आपली नाजूक मर्मस्थाने कोणती आहेत याविषयीची अप्रत्यक्ष मान्यता यातून आढळून येते हे या विधानाचे महत्त्व आहे.

तत्कालीन केंद्रीय शिक्षणमंत्री श्री. के. सी. पंत या निवेदनाला लिहिलेल्या आपल्या प्रास्ताविकात म्हणतात :

'या निवेदनातील पहिला आणि सर्वात महत्त्वाचा निष्कर्ष असा आहे की धोरण, शिक्षणव्यवस्था व साधनसंपत्ती यांची आखणी कशीही केली तरी शिक्षणाच्या क्षेत्रातील यश किंवा अपयश ही शेवटी एकूण समाजाची या प्रयत्नाला किती बांधिलकी आहे आणि धोरण कार्यवाहीत आणणारे विविध गट किती ध्येयनिष्ठेने व प्रामाणिकपणे काम करतात यावरच अवलंबून असते.'

'शैक्षणिक आव्हान' या निवेदनात खालील गोष्टींचा निर्देश आहे.

१. एकूण सामाजिक व राजकीय व्यवस्थेलाच स्वतःचे अस्तित्व टिकून धरण्यासाठी तशी निकड वाटल्याखेरीज शिक्षणाच्या अनेकविध गुंतागुंतीच्या अशा रचनेत बदल केला जाऊ शकत नाही. (३.५)

२. सध्याच्या शिक्षणव्यवस्थेने भूतकाळात काही उपयोगी गोष्टी साधल्या असल्या तरी या व्यवस्थेत क्रांतीकारी बदल होणे आवश्यक आहे याविषयी बहुसंख्य लोकांची निश्चित खात्री झालेली आहे. आपली शिक्षणव्यवस्था ढासळत चाललेली आहे व राष्ट्रातील परिस्थितीशी तिचा संदर्भ तुटत चाललेला आहे. याविषयी सार्वत्रिक चिंता आणि एकमत आढळून येतात. ही व्यवस्था काही इकडेतिकडे तुरळक बदल करून सुधारता येणार नाही. (४.१६)

३. कोणत्याही इतर व्यवस्थेप्रमाणेच शिक्षणव्यवस्थेतही काही जणांचे स्वार्थी हितसंबंध गुंतलेले असतात आणि व्यवस्थेत बदल केला तर आपल्याला मिळालेले अन्याय्य विशेष अधिकार हिरावून घेतले जातील अशी या लोकांना भीती वाटत असते. कार्यक्षमता व समता ही उद्दिष्टये डोळ्यासमोर ठेवून आमूलाग्र बदलाची वस्तुनिष्ठ पाऊले टाकण्यास या लोकांचा विरोध असतो. (४.२५)

४. शिक्षणाची राजकारणापासून फारकत केली पाहिजे ही एक लोकप्रिय कल्पना आहे. परंतु अशी फारकत खरोखरच करण्यात आली तर अनेक राजकीय पक्षांना आपले कार्यकर्ते अनुयायी गमवावे लागतील आणि निवडणुका लढविण्यासाठी व मिरवणुका निदर्शने, मोर्चे यांच्यासाठी मनुष्यबळ कोठून आणावे याचा संभ्रम पडेल. (४.२७)

५. आगामी दशकात भारताची एकूण विकासाची प्रक्रिया कशी राहणार आहे याचा तपशील अजून तयार व्हावयाचा आहे व हे जोपर्यंत होत नाही तोपर्यंत त्या प्रक्रियेच्या अनुषंगाने शिक्षणाचे नियोजन कसे करावे या प्रश्नाचे उत्तर देणेही कठीण आहे. (४.२१)

६. एकूण राष्ट्रीय व्यवस्थेचाच शिक्षणव्यवस्था हा एक उपविभाग आहे आणि राष्ट्राच्या एकूण व्यवस्थेच्या जडणघडणीमुळे निर्माण होणारी बंधने शिक्षणाच्या परिवर्तनात सर्वात मोठा अडसर निर्माण करतात. (४.५१)

७. समाजोपयोगी उत्पादन (एस.यू.पी.पी.) राष्ट्रीय सेवा योजना (एन.एस.एस.) आणि या स्वरूपाच्या अन्य उपक्रमांना अपेक्षित यश मिळालेले नाही. (४.९६)

८. शिक्षणाची राजकारणापासून फारकत करावयाची असेल तर सर्व संबंधितांनी या बाबतीत संयम पाळण्याची प्रथम आवश्यकता आहे. यात केंद्रशासन, राज्यशासने आणि इतर प्रभावी पक्षांचाही समावेश आहे. या

संदर्भात एकमत निर्माण करण्याची तातडीची गरज आहे. यासाठी काही कायदा करणे उचित होईल काय याचाही विचार व्हावयास हवा. (४.१३५)

नियोजन मंडळ, नवे शैक्षणिक निवेदन व त्याआधीचे 'शिक्षणाचे आव्हान' हे निवेदन यांच्याकडे क्रमाने पाहिले की एक गमतीदार आणि मनोरंजक गोष्ट आपल्या नजरेला येते. प्रत्यक्ष कार्यवाहीच्या जबाबदारीपासून अंतर जसजसे वाढत जाते तसतशी मांडणी अधिकाधिक मोकळेपणाची आणि प्रश्नाच्या मूळ गाभ्याला काही प्रमाणात तरी स्पर्श करण्याचे धैर्य दाखवणारी अशा स्वरूपाची होत जाते. यामुळे नियोजन मंडळ आवश्यक तीच व जेवढ्यास तेवढी विधाने करून आपली मांडणी पुरी करते. धोरणात्मक निवेदन यापेक्षा आणखी काही अधिक विधाने करावयास धजावते व चर्चेसाठी प्रसृत केलेले मूळ 'शिक्षणाचे आव्हान' हे निवेदन शिक्षणातील मूलभूत बदलासाठी सामाजिक व आर्थिक व्यवस्थेतही क्रांतिकारक बदल करणे आवश्यक आहे या भूमिकेच्या सर्वात जवळ जाते. (हा देखील जे. पी. नाईक यांच्या भूमिकेचाच दबलेला पुनरुच्चार त्या निवेदनाने केलेला असावा अशी मला दाट शंका आहे.)

## काही प्रयोग काही अनुभव

घोषणा आणि त्यांची कार्यवाही यांच्यामध्ये आपल्या देशात फार मोठी दरी उभी असते. हा काही एखादा अपघात नसतो, किंवा आपल्या राष्ट्रीय नितीमत्तेतच तशी काही उणीव आहे असा स्वरूपाचेही याचे विश्लेषण आपल्याला देता येणार नाही. याचे एक साधे सरळ कारण असे आहे की निवडणुका जिंकण्याच्या दृष्टीने आम्हाला लोकप्रिय घोषणा करावयाच्या असतात परंतु प्रत्यक्ष सत्ता ज्यांच्या नियंत्रणाखाली असते त्यांच्या हितसंबंधांना विरोधी अशी कोणतीही कार्यवाही करण्याची आमच्यामध्ये हिंमत नसते. या वस्तुस्थितीमुळे अस्वस्थ असणाऱ्या सर्वांनी (मग ते कोणत्याही राजकीय पक्षातले असोत) या दुहेरी अडचणीतून बाहेर पडण्याचा मार्ग शोधला पाहिजे. या समस्येचे साधे व सरळ उत्तर मिळणे असंभवनीय आहे आणि बराच काळपर्यंत आपल्याला चुकतमाकतच पुढे सरकावे लागेल. परंतु हे मान्य केले तरी आपण अगदीच उलट्या दिशेने तर चाललो नाही ना, एवढी दक्षता आपल्याला घ्यावीच लागेल.

मी केलेले काही प्रयोग व माझे काही अनुभव या प्रयत्नात असणाऱ्या शक्यता व येणाऱ्या अडचणी यांच्यावर काहीसा प्रकाश टाकू शकतील.

१. भारत-चीन युद्धाच्या काळात मी सांगलीला चिंतामणराव वाणिज्य महाविद्यालयात काम करीत होतो. सांगलीच्या जवळ छोटी विमाने उतरण्यासाठी एक धावपट्टी तयार करावी अशी कल्पना निघाली (ती कोणाच्या डोक्यात का यावी याचे कोडे मला अजूनही उलगडलेले नाही.) खरी महत्त्वाची गोष्ट अशी की अशी धावपट्टी तयार करावयाची असा निर्णय घेतल्यापासून दहा दिवसांत लोकांच्या श्रमदानाने ती धावपट्टी तयार झाली व दहाव्या दिवशी त्या धावपट्टीच्या उद्घाटनासाठी मुख्यमंत्र्यांचे विमान तेथे येऊन उतरलेदेखील. शिक्षणसंस्थांतील विद्यार्थ्यांना या श्रमदानात सहभागी करून घेण्याचे काम माझ्याकडे होते. यात कोणतीही अडचण आली नाही व कधीही शिस्तीचा प्रश्न निर्माण झाला नाही. राष्ट्रीय संकटाच्या वेळी आपण आपला सहभाग उचलला पाहिजे या त्या काळातील सार्वत्रिक वातावरणाचा तो परिणाम होता.

२. सुमारे बारा वर्षांपूर्वी महाराष्ट्रात तीव्र दुष्काळ पडला होता. 'युवकांची दुष्काळाशी झुंज' (Youth Against Famine) असा कार्यक्रम शासनाने त्यावेळी हाती घेतला होता. भूविकास व जलसंरक्षण यासाठी महाविद्यालयातील विद्यार्थ्यांची शंभर श्रमदान शिबिरे सर्व महाराष्ट्रात आयोजित करण्यात आली होती. राज्य पातळीवरच्या समितीचा मी अध्यक्ष होतो व मी सुमारे चाळीस शिबिरांना प्रत्यक्ष भेट देऊन तेथील काम पाहिले. एका शिबिरात एका विद्यार्थ्याने मला विचारले : 'आम्ही इथे घाम गाळत आहोत परंतु बाकीचे कोठे आहेत?' या प्रश्नाने माझ्या मनात नवीन प्रकाश पडला. शिबिरातून मुख्यत्वेकरून गरजू विद्यार्थी सामील झाले होते. राष्ट्रीय विकासाच्या प्रयत्नात श्रम करून सामान्य जनतेशी आपण एकरूपता साधली पाहिजे या भावनेचा स्पर्श होऊन वरिष्ठ वर्गातून आलेले फारच थोडे विद्यार्थी होते. वातावरणात असलेली संधीही अशी अनेकदा आपल्याकडून गमावली जाते.

३. तरुणांना समाजपरिवर्तनाच्या कार्यात गुंतविण्याच्या हेतूने महाराष्ट्रात सुमारे वीस वर्षांपूर्वी एक संघटना उभी करण्याचा प्रयत्न झाला. त्या वेळच्या शिक्षणमंत्र्यांना याविषयी उत्साह होता. मी या संघटनेचा कार्याध्यक्ष होतो. मी


अनुक्रमणिका

शिक्षणमंत्र्यांना एकदा म्हटले : 'विद्यार्थी आणि समाजातील प्रतिगामी शक्ती यांच्यामध्ये संघर्ष निर्माण झाला तर आपल्याला विद्यार्थ्यांच्या बाजूने उभे रहावे लागेल.' मुद्दा शिक्षणमंत्र्यांच्या लक्षात आला आणि संघटनेचे काम पुढे सरकू शकले नाही.

४. पुणे विद्यापीठाचा कुलगुरु म्हणून काम करीत असताना विशेष खर्च न करता विद्यार्थ्यांना ग्रामीण विकासात सहभागी करुन घेण्याच्या दृष्टीने मी एक प्रयोग करुन पाहिला. विद्यार्थ्यांनी सुटीच्या दिवसात आपल्या खेडेगावातच काम करावे अशी कल्पना होती. यामुळे निवास, प्रवास, भोजन यावरील खर्च सहजपणे टळत होता. संघटनेचे प्रश्नही निर्माण होत नव्हते. विद्यार्थ्यांना काही प्रशिक्षण दिले जाई व खेडुतांपर्यंत कोणते ज्ञान पोचवणे आवश्यक आहे याची कल्पना दिली जाई. प्रत्येक विद्यार्थ्याला काहीसे मानधन व काहीसा खर्च यासाठी मिळून पन्नास रुपये दिले जात.

या प्रयोगाच्या मर्यादित अनुभवातून माझ्या लक्षात आले की विद्यार्थ्यांत अशा कामासाठी उत्साह असू शकतो व हे काम करताना देखील हितसंबंधी गटांच्या विरोधाला त्यांना तोंड द्यावे लागले तेव्हा खेड्यातील इतर लोकांशी साधलेल्या संपर्कामुळे विद्यार्थी या विरोधाशी मुकाबला करू शकतात.

५. आणीबाणीच्या कालखंडात मी पंतप्रधानांना लिहिले होते : 'विद्यार्थी शांत दिसत असले तरी त्यांना उत्साहित करेल असा कोणताही कार्यक्रम देण्यात आपण अयशस्वी झालो आहोत.' माझा टीकात्मक सूर त्यांना रुचला नाही. तथापी वस्तुस्थिती त्यांना अमान्य होती असा त्यांचा प्रतिसाद माझ्या कानी घालण्यात आला. परंतु तरुणांना उत्साहित करण्याच्या दृष्टीने काही कार्यक्रम पुढे आला नाही.

### तीन महत्त्वाची आवश्यक पाऊले

#### १. राजकीय ऐक्यमतासाठी आग्रही प्रयत्न

शैक्षणिक धोरणाबद्दल राष्ट्रीय स्तरावर एकमत निर्माण करण्याचा प्रयत्न करणे हे आपले पहिले महत्त्वाचे पाऊल असले पाहिजे. परंतु शैक्षणिक धोरणाबाबत असे एकमत साधावयाचे असल्यास देशातील सामाजिक, आर्थिक व राजकीय रचनेविषयीही ऐक्यमत असणे आवश्यक आहे. याखेरीज अशी मान्य झालेली धोरणे कठोर राजकीय निर्धाराने पार पाडली पाहिजेत याविषयीही एकमत असावे लागेल.

या सर्व अपेक्षा म्हणजे भलत्याच अशक्यप्राय मागण्या आहेत असे वाटणे स्वाभाविक आहे. परंतु आपण या प्रश्नाकडे युद्धपातळीवर हाताळावयाचा प्रश्न या दृष्टीने पाहिले पाहिजे. तसे केले नाही तर आजचीच गुदमरून टाकणारी परिस्थिती कायम राहील व शेवटी सर्व व्यवस्थाच पूर्णपणे कोसळून पडेल. आजच्या परिस्थितीतील गांभीर्य सर्व राजकीय पक्षांनी - सत्ताधारी पक्ष, त्याचप्रमाणे विरोधी पक्ष देखील - नीटपणे ओळखले तरच असे ऐक्यमत शक्य होईल.

आज त्या सर्वांना निवडणुकांचे राजकारण हाच आद्य महत्त्वाचा प्रश्न वाटतो. परिस्थितीचे गांभीर्य राजकीय नेत्यांच्या नीट लक्षात आणून देणे हे विचारवंतांचे काम आहे.

या प्रयत्नात सर्व राजकीय पक्षांनी आपला वाटा उचलला पाहिजे. परंतु तरीही या कार्यक्रमाच्या दिशेने पहिले पाऊल टाकण्याची जबाबदारी राज्यकर्त्या पक्षाची आहे. पंतप्रधान राष्ट्रीय महत्त्वाच्या प्रश्नावर सर्व राजकीय पक्षांचे ऐक्यमत साधण्याचा प्रयत्न करतात असे गेल्या दोन वर्षातील चित्र आहे. या दिशेने वाटचाल करत असताना लवकरच त्यांच्या लक्षात येईल की राज्यकर्त्या पक्षाने आपल्या कार्यपद्धतीत काही महत्त्वाचे बदल केल्याखेरीज प्रभावी कृतिसाठी आवश्यक असे ऐक्यमत अस्तित्वात येऊ शकणार नाही.

हे विधान मी केवळ एक तात्त्विक मांडणी म्हणून करत नाही. सुमारे पंचवीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रात राजकीय पक्षासाठी आचारसंहिता निर्माण करण्यासाठी म्हणून जे चर्चासत्र झाले त्यात मी सहभागी होतो. भाटघर येथे हे चर्चासत्र झाले म्हणून ही आचारसंहिता 'भाटघर आचारसंहिता' या नावाने ओळखली जाते. या चर्चासत्रात विचारवंत व राजकीय कार्यकर्ते अशा दोघांनीही भाग घेतला. विचारवंतांमध्ये प्रा. धनंजयराव गाडगीळ, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. अ. भि. शहा, प्रा. दि. के. बेडेकर आदि मंडळी होती. राजकीय नेत्यांपैकी श्री. शंकरराव देव, श्री यशवंतराव चव्हाण, श्री. एस. ए. डांगे, श्री. एस. एम. जोशी, श्री. मधु लिमये, श्री. बी. सी. कांबळे आदि नेते होते. एक सर्वसंमत निवेदन तयार करण्यात ही बैठक यशस्वी झाली परंतु ही आचारसंहिता प्रत्यक्षात कार्यवाहीत मात्र येऊ शकली नाही. या आचारसंहितेचा प्रमुख आग्रह राष्ट्रीय विकासाचे कार्यक्रम (उदा. सहकारक्षेत्र) निवडणुकांच्या दृष्टीने पक्षीय हितसंबंध नजरेसमोर ठेवून








राबवले जाऊ नयेत यावर होता.

याहूनही विस्तृत पायावर एखादी आचारसंहिता निर्माण करण्याची गरज आहे. या आचारसंहतेचे तपशील ठरवावे लागतील व ती प्रत्यक्ष आचरणात कशी येते याविषयी दक्ष रहावे लागेल. केवळ पंतप्रधानच या संदर्भात पुढाकार घेऊ शकतील.

**२. सतत विचारमंथन**

दुसरे महत्त्वाचे पाऊल विचारवंतांनी उचलले पाहिजे. राष्ट्रीय महत्त्वाच्या प्रश्नावर चर्चा निर्माण करणे व चालू ठेवणे ही त्यांची जबाबदारी आहे. 'शिक्षणाचे आव्हान' या निवेदनाच्या संदर्भात शासकीय प्रेरणेने व शासकीय यंत्रणेमार्फत अनेक परिसंवाद, चर्चासत्र घाईघाईने आयोजित करण्यात आली. या चर्चा-परिसंवादात कोणत्याही मूलभूत प्रश्नांचा विचार झाला नाही हे सर्वांना मान्य होईल असे मला वाटते. यांच्या आयोजनाच्या मागे तो हेतूच नव्हता अशीही शंका येते.

विचारवंतांच्या पुढे दुहेरी स्वरूपाचे आव्हान आहे. आजच्या परिस्थितीचे स्वरुप व आजच्या समस्यांतून बाहेर पडण्याचा मार्ग यांचे चिंतन व चर्चा सतत चालू ठेवणे हे यापैकी एक आव्हान आहे. आपण मार्क्सवादाची किंवा गांधीवादाची कोणतीच चौकट स्वीकारण्याचे कारण नाही. इकडचे थोडे चांगले, तिकडचे थोडे चांगले अशी विविध वादांची गल्लत करून उथळ व अकार्यकारी समन्वय साधण्याचाही आपण प्रयत्न करता कामा नये. कोणत्याही वादाच्या आहारी न जाता स्वतंत्र नवे चिंतन करण्याचे हे आव्हान आहे. (आर्थिक समस्येच्या बाबतीत एका केंद्रीय मंत्र्याने अर्थशास्त्रज्ञांना व विचारवंतांना नुकतेच असे जाहीर आव्हान दिलेही आहे. शिवधनुष्याला हात घालण्याचे हे आव्हान आहे.)

विचारवंतांच्या पुढील दुहेरी आव्हानांपैकी दुसरे आव्हान सामाजिक, आर्थिक, राजकीय परिवर्तनासाठी कृतिशील असण्याचे आहे. शैक्षणिक परिवर्तन सामाजिक व आर्थिक परिवर्तनासाठी एकसाथ प्रयत्न झाले पाहिजेत तरच ती सर्व यशस्वी होऊ शकतील अशी जे. पी. नाईक यांची आग्रही मांडणी होती आणि यासाठी जनतेचे लोकशाही आंदोलन उभे करण्याची आवश्यकताही त्यांनी प्रतिपादन केली होती.

जे. पी. नाईक यांची याविषग्रीची मते व विचारवंतांनी काय केले पाहिजे याविषयीच्या त्यांच्या अपेक्षा त्यांनी अतिशय धारदार शब्दात व्यक्त केल्या आहेत. 'भारतीय जनतेसाठी शिक्षण' या निवेदनाच्या शेवटच्या परिच्छेदात ते सांगतात :

आपण पुरस्कार केलेली ही सर्व धोरणे यशस्वी होतात की नाही हे शेवटी किती गुणवान लोक ही मते स्वीकारतात आणि ती यशस्वी झालीच पाहिजेत यासाठी आपले वर्चस्व पणाला लावून झगडण्याला सिद्ध होतात यावरच अवलंबून राहणार हे अटळ आहे.

**३. सहाय्यक कृतीचा पुरस्कार**

तिसरे महत्त्वाचे पाऊल शिक्षणव्यवस्थेने उचलावयाचे आहे. यासाठी शिक्षणव्यवस्थेला शासन व विचारवंत या दोघांचेही सहाय्य व्हावे लागेल. एकसाथ शैक्षणिक व सामाजिक, आर्थिक परिवर्तनाच्या कार्यक्रमाला मी इंग्रजीत Programme Asset (Action for simultaneous Socio-Economic and Educational Transformation) असे नाव दिले आहे. या कार्यक्रमाच्या तपशीलाविषयी चर्चा वाद होऊ शकतात. (Asset या नावाविषयी माझा आग्रह नाही.) परंतु अशा एकसाथ प्रयत्नांची आवश्यकता आपण मान्य करतो की नाही यावरच आपल्याला खरे परिवर्तन हवे आहे की आपण (वरवर काहीही म्हटले तरी) 'जैसे थे'चेच खरोखर पुसरस्कर्ते आहोत याची कसोटी लागणार आहे.

'ॲसेट' कार्यक्रम शिक्षणव्यवस्थेला सामाजिक आर्थिक परिवर्तनाच्या प्रक्रियेत प्रत्यक्ष सहभागी करू इच्छितो. सध्याच्या राष्ट्रीय सेवा योजना कार्यक्रमाच्या पलीकडे जाणारी ही संकल्पना आहे.

हे पाऊल उचलण्याच्या दृष्टीने आजचा काळ उपकारक आहे. दरिद्री जनतेची परिस्थिती सुधारावयाची असेल तर लोकांपर्यंत प्रत्यक्ष जाऊन पोचले पाहिजे असे पंतप्रधान प्रतिपादन करीत आहेत. त्याचप्रमाणे भारतातील सर्वोच्च न्यायालयानेही अशा प्रयत्नांना मान्यता किंबहुना प्रोत्साहन दिले आहे. भारतातील कोणत्याही नागरिकाला कोणत्याही गटावर भारतात अन्याय होत असेल तर तो त्या गटाचा नसला तरी सर्वोच्च न्यायलयाकडे दाद मागण्याचा अधिकार आहे. याखेरीज सर्वोच्च न्यायालयाचे सरन्यायाधीश श्री. पी. एन. भगवती यांनी अनेक व्यासपीठांवरुन सामाजिक न्यायाच्या प्रस्थापनेसाठी दलितांना संघटित होण्यासाठी



अनुक्रमणिका

सहाय्य करण्याची आवश्यकता आग्रहपूर्वक प्रतिपादिली आहे.

यासाठी 'ॲसेट' कार्यक्रमाचे स्वरुप कसे असू शकते? याविषयीची चर्चा मी अन्यत्र वेगळ्या लेखात यापूर्वी केली आहे. थोडक्यात त्याचे स्वरुप असे राहील :

प्रत्येक शिक्षणसंस्थेत सामाजिक बांधिलकी मानणारे शिक्षक, प्राध्यापक व विद्यार्थी यांचा एक गट असेल. राज्यघटना व विविध कायदे यांनी दिलेले हक्क दलितांपर्यंत प्रत्यक्षात अमलात येत आहेत की नाहीत हे पाहण्याचे काम हा गट करीत असल्यामुळे शासन व शासकीय अधिकारी यांना या स्वरूपाची मदत स्वागतार्हच वाटावयास हवी. योग्य त्या ठिकाणी सामाजिक न्याय प्रस्थापित करावयास अशा गटांचा उपयोग होईल. यात क्रांतिकारक काही असले तर ते इतकेच की ज्या सुधारणा कायद्याने आधीच अस्तित्वात आल्या आहेत त्या प्रत्यक्षात आणण्यासाठी हा गट क्रांतिकारक वेगाने काम करील. राष्ट्रीय सेवायोजनेतर्फे जे चालचलाऊ कार्यक्रम केले जातात त्यातून फार तर वरवरचे काम होते आणि अनेकदा तर यामुळे मूलभूत समस्येकडे आपली डोळेझाक होण्याचाच संभव असतो.

जे कायदे आधीच झालेले आहेत ते कार्यवाहीत आणण्यासाठी शिक्षणव्यवस्थेला कार्यान्वित करण्यासाठी लागणारा राजकीय निर्धार प्रकट करण्याची ताकद शासनामध्ये आहे की नाही हाच या संदर्भात खरा प्रश्न आहे. या प्रश्नाचे जे उत्तर मिळेल त्यावरच सामाजिक न्याय व विकास यांच्याशी शिक्षणाची सांगड घातली गेली पाहिजे या भूमिकेशी आपण किती प्रामाणिक आहोत हे ठरणार आहे.

जे. पी. नाईक यांनी भारतीय शिक्षणव्यवस्था एकत्र सांधताना हातून निसटणाऱ्या एका त्रिकोणाचे वर्णन केले आहे. (The Elusive Trangle in Indian Education) संख्यात्मक वाढ, गुणवत्तेचा विकास व समतेच्या दिशेने वाटचाल अशा या त्रिकोणाच्या तीन बाजू आहेत. यापैकी कोणत्याही दोघांची सांगड घातली की तेवढ्यात तिसरी बाजू हातातून निसटू लागते. अमेरिकन अर्थशास्त्रज्ञ मिल्टन फ्रीडमन यांनी अलीकडे (१९८४) एका पोलादी त्रिकोणाची (The Iron) कल्पना मांडली आहे. त्यांच्या कल्पनेतील त्रिकोणाच्या तीन पोलादी बाजू अशा असतात : 'जैसे थे' परिस्थितीत ज्यांचे हितसंबंध अडकलेले असतात असे लोक ही एक बाजू, चालू व्यवस्थेत बदल करावयास सामान्यपणे नाखुश असणारी नोकरशाही ही दुसरी बाजू आणि निवडणुकीतील मतावर लक्ष ठेवणारे राजकीय पुढारी ही तिसरी बाजू.

जे. पी. नाईक यांचा निसटता त्रिकोण व मिल्टन फ्रीडमन यांचा पोलादी त्रिकोण हे एकमेकांची प्रतिबिंबेच आहेत असे म्हणण्याचा मोह मला होतो.

या विधानाचे नीट स्पष्टीकरण द्यावयाचे तर याच विवेचनाला परत उलट बाजूने सुरुवात करावी लागेल.

(Indian Institute of Education या संस्थेने दि. २०, २१, २२ सप्टेंबर १९८६ रोजी Education for All या विषयावरील J. P. Naik National Seminar मध्ये सादर केलेल्या 'Education For All : Political Implications.' या विषयावरील निबंधाचा लेखकाने केलेला अनुवाद.)

(शिक्षण आणि समाज, ऑक्टोबर-डिसेंबर १९८६)

☑ ☑ ☑

ज्याला शिकण्याची इच्छा नाही
त्याला शिकवण्याचा प्रयत्न करु नये
ज्याला शिकण्याची इच्छा आहे
त्याला काहीही शिकवता येते
ज्याला काहीही शिकण्याची इच्छा नाही
असा एकही
माणूस जगात नाही
कोणाला काय शिकावयाचे आहे
हे ओळखून
त्याची जिज्ञासा प्रज्वलित करणे
व ते त्याला मिळण्याची व्यवस्था करणे
हे शिक्षणव्यवस्थेचे उत्तरदायित्व आहे.

- देवदत्त दाभोलकर

अनुक्रमणिका






# बहुजनांच्या शिक्षणासाठी

## डॉ० ज० रा० दाभोळे

## मुलाखत : डॉ० सुभाष देसाई

▶▶ तुम्ही तत्त्वज्ञान विषयाचे रा. छ. शाहू कॉलेजचे विभागप्रमुख होता. तत्त्वज्ञान विषय सोडून शिक्षण क्षेत्रातील नवे संशोधन का निवडले?

कोणत्याही शिक्षणप्रणालीचे अधिष्ठान कोणते ना कोणते तत्त्वज्ञान असावे लागते. आजही बी.एड.ला Philosophy Education हा पेपर शिकवला जातो.

▶▶ हा विषय ठेवण्याचा उद्देश काय?

आजची शिक्षणप्रणाली सर्वांना शिक्षण देऊ शकत नाही. ती सर्वांपर्यंत पोहोचू शकत नाही. २१ व्या शतकात अशी प्रणाली आणावी लागेल, जी सर्वांना चांगले शिक्षण देऊ शकेल.

▶▶ विद्यापीठ अनुदान मंडळाने त्यासाठी काही अर्थसहाय्य केले का?

होय. तीन वर्षांच्या मुदतीसाठी युजीसी ने सुमारे ८ लाख मंजूर केले होते.

▶▶ या संशोधनासाठी तुमच्यापुढे कोणते उद्दिष्ट होते?

गेल्या ५० वर्षात आम्ही शिक्षणाचा सर्वांगीण विचार केला नाही. त्याकडे दुर्लक्ष केले. त्यामध्ये गोरगरिबांचे शिक्षण, वंचितांचे शिक्षण ही गोष्ट दूरच राहिली. महिलांचे शिक्षणही मागे राहिले.

▶▶ गोरगरिबांसाठी शिक्षणाचा विचार झाला नाही; पण शिक्षणतज्ज्ञ जे. पी नाईक, चित्राताई, वसंतदादा किंवा त्यापूर्वीची पिढी कर्मवीर भाऊराव पाटील, बापूजी साळुंखे, एम.आर. देसाई, पंजाबराव देशमुख या लोकांनी गोर-गरिबांच्या शिक्षणासाठी प्रयत्न केला नाही का?

या थोर मंडळींनी गोरगरिबांच्या शिक्षणाची सोय केली हे मान्य. जे. पी. नाईक हे तर आंतरराषट्रीय पातळीवरचे शिक्षणतज्ज्ञ, त्यांनी सर्वांसाठी शिक्षणाचा आग्रह धरला. या सर्वांचे प्रयत्न महत्त्वपूर्ण आहेतच. तथापि निरक्षरांची वाढती संख्या चिंताजनक आहे म्हणून सर्वांना दर्जेदार शिक्षण कसे मिळू शकेल? ही समस्या सोडविण्यासाठी काय करता येईल? या दिशेने मी विचार करू लागलो.

▶▶ ब्रिटिश काळात सर्वांसाठी शिक्षण मिळावे यासाठी कोणी प्रयत्न केले?

ब्राह्मो समाज, प्रार्थना समाज, रामकृष्ण मिशन आदींनी भारतीय समाजात नवजागृती घडवून आणली. आर्य समाजाने शिक्षणसंस्था स्थापन केल्या. टिळक, आगरकरांनी महाराष्ट्रात नवशिक्षणाचा पाया घातला. मात्र, त्यांचे प्रयत्न शहरापुरते मर्यादित राहिले.

▶▶ मग या प्रयत्नांमध्ये तुम्ही अभ्यास केल्यावर कालानुरूप त्यात काही त्रुटी आढळल्या का? किंवा त्यात बदल करावासा वाटतो का?

ब्रिटिशांनी विद्यापीठे स्थापन केली. ज्या समाजाला प्राथमिक शिक्षणाची गरज होती, तेथे त्यांनी उच्च शिक्षणाला प्राधान्य दिले. ईस्ट इंडिया कंपनीने लोकांच्या शिक्षणाचा विचार केला नाही. ब्रिटिश आमदनीच्या शेवटी शेवटी सर्वांना शिक्षण देण्याचा विचार झाला. म. गांधींनी त्या दृष्टीने आपली वर्धा शिक्षण योजना मांडली. सन १९४४ साली सार्जंट योजना आली. त्यानुसार १० वर्षांच्या आत सर्व मुलांना प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करण्याचे ठरले होते; पण स्वातंत्र्यानंतर ब्रिटिश गेले व ती योजना बारगळली.

▶▶ तुमच्या संशोधनानुसार सन १९२० चे दरम्यान कोणती आदर्श शिक्षणप्रणाली महाराष्ट्रात पुढे आली?

साने गुरुजींनी आंतरभारतीचे स्वप्न मांडले. एम.एन. रॉय यांची शिक्षणप्रणाली वेगळी होती; पण त्याला मूर्त रूप आले नाही. जे कृष्णमूर्तींनी वेगळे प्रयत्न केले, पण संपूर्ण समाजाचे शिक्षण ही कल्पना त्यांच्या विचारात नाही. त्यामुळे परदेशातही त्यांचे प्रयोग बेटासारखे आहेत. प्रश्न आहे तो सर्वांना शिक्षण कसे मिळेल? संपूर्ण भारतीय समाजाची एकच आदर्श शिक्षणप्रणाली निदान पदवीपर्यंत हवी आहे.

▶▶ ग. प्र. प्रधान, वाघमारे, चिपळूणकर, देवदत्त दाभोलकर यांच्या नि तुमच्या शिक्षणप्रणालीत मूलभूत फरक आहे का?

फरक नाही. उलट साम्यच आहे. त्यांच्या मुलाखती

मी घेतल्या. समान मुद्दा म्हणजे शिक्षण सर्वांपर्यंत पोचले पाहिजे व ती राज्याची जबाबदारी असायला हवी. त्यासाठी नवी तंत्रे वापरा. उदा. मुक्तशाळा, वेळेचे बंधन नको, पण जो अभ्यासक्रम आहे तो जीवनाशी सांधा जुळणारा असावा.

▶▶ वर्गीय शिक्षणापासून सर्वांसाठीचे शिक्षण हा आलेख तुम्ही कसा बघता?

ब्रिटिशांनी समाजातील वरच्या वर्गाला शिक्षण पुरवले. बहुजनांना दर्जेदार शिक्षण देण्याचे धोरण त्यांनी कधीच अंमलात आणले नाही. सक्तीचे व मोफत प्राथमिक शिक्षण देण्याचा विचारही ब्रिटिशांनी केला नाही; कारण त्यांना या देशाची सत्ता टिकवायची होती.

▶▶ व्यवसायाभिमुख शिक्षणाचा काही उपयोग होईल का?

आजपर्यंत हे शिक्षण उपेक्षितच राहिले. त्याचा म्हणावा तितका गांभीर्याने कोणी विचार केला नाही. १०+२+३ हा पॅटर्न आम्ही स्वीकारला. त्याची अंमलबजावणी पूर्ण झालीच नाही. खरे तर १० वी इयत्तेत अखेरच्या दोन वर्षात व्यवसायाभिमुख शिक्षणासाठी अधिक खर्च केला असता, तसे नियोजन केले असते तर बेकारीचा प्रश्न बऱ्याच अंशी सुटला असता.

▶▶ पर्यावरणाबाबत शिक्षण कसे असावे?

हा विषय लहानपणापासून सुरू व्हायला हवा. शिक्षक, विद्यार्थी, समाज या तिन्ही घटकात त्या दृष्टीने जागृती आपण करू शकलो नाही. आता आमच्या शिक्षणाचा तो एक अपरिहार्य भाग व्हायला हवा.

▶▶ मायक्रो टिचिंगबाबत काय वाटते?

हे नवे तंत्र आहे. छोट्या समूहाला परिणामकारक रीतीने शिकविण्यासाठी ते वापरता येते. शिक्षकांचे प्रशिक्षण या तंत्राने झाले तर त्याचा फायदा एकूण शिक्षणप्रणालीला होईल.

▶▶ संगणकीय शिक्षणाची लाट भविष्यात कालबाह्य होईल का?

ते एक कौशल्य आहे; संगणकीय शिक्षणाला मर्यादा आपोआप पडेल. संगणकाचा उपयोग आता सर्वांना शिक्षणा देण्यासाठी करता येऊ शकेल.

▶▶ ऑनलाईन एज्युकेशनमुळे नवे शैक्षणिक आदर्श अशा कल्पना मोडीत निघतील का?

नाही. जो अभ्यासक्रम आहे, तो ज्ञानसमृद्ध असेल, मूल्यांनी समृद्ध असेल तर तो कसा शिकवता याला महत्त्व नाही.

▶▶ तुम्ही मूल्य हा शब्द वापरला; पण 'रेव्ह पार्टी'ला जमणारी शिक्षित, उच्चशिक्षित पिढी पाहिली तर मूल्य नावाची चीज या नव्या उच्चभ्रू मुलामुलींना कोणी शिकवलीच नाही असे वाटत नाही का?

आम्ही शिकवलेली नाही म्हणूनच ही समस्या निर्माण झाली. त्यांच्या बालपणापासूनच ही मूल्ये घरामध्ये, शाळेत शिकवली गेली नाहीत असेच चित्र दिसते.

▶▶ हे तुमचे नवे मौलिक विचार, संशोधन तळागाळात पोहोचायला हवे त्यासाठी तुमची काही योजना आहे का?

राज्य व केंद्र सरकारना त्या संदर्भात लिहिणार आहे. ग्रंथरुपानेही प्रसिद्ध करण्याचा विचार आहे. केंद्रीय पातळी-वरच्या संस्थांना हे संशोधन कळवणार आहे, जेणेकरून ते देशभर जाईल व राज्य सरकारे त्यांच्या धोरणात बदल करतील अशी अपेक्षा आहे.

(दै. ऐक्य, रविवार दि. २५ मार्च २००७)

☑ ☑ ☑

## मेकॉले : दुष्ट की द्रष्टा की दोन्हीही

संस्कृत, अरेबिक इत्यादीविषयी तुच्छतेची भावना हे खऱ्या अर्थाने गाढा पंडित असणाऱ्या मेकॉलेचे अज्ञान होते. (Blind Spot.) ब्रिटिश लोकांना इंग्रजी भाषा येणारा नोकरदार वर्ग राज्य चालविण्यासाठी आवश्यक होता. ही साम्राज्यशाहीची काळाची गरज होती.

परंतु मेकॉलेच्या भूमिकेला दुसरेही अंग होते. पार्लमेंटमध्ये या विषयावर भाषण करताना तो म्हणाला होता, 'भारतीय लोकांना इंग्रजीचे शिक्षण दिले तर नवीन विचारांचे वारे त्यांच्यापर्यंत पोहोचतील, ते जागृत होतील व आपल्या सत्तेलाच धोका निर्माण होईल या भीतीने त्यांना पाश्चिमात्य ज्ञान देण्याचे आपण टाळणार आहोत काय आणि असे जर असेल तर आपण स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते आहोत या आपल्या वल्गनेत काय अर्थ आहे.'








# सामाजिक बांधिलकी : आशयाचा शोध

प्रा० श्री० अ० दाभोलकर

आयुष्यभर पिळला, पिचला व नाडला जाणारा बहुजनसमाज हे चालू समाजव्यवस्थेचे सर्वात मोठे दुखणे ठरले आहे. या दुखण्यावर रामबाण उपाय शोधण्याची पराकाष्ठा आज जगात चालू आहे. त्यातूनच पायाशुद्ध आर्थिक विकासाचा व समग्रक्रांतीचा नेमका मार्ग कोणता, याचे नवनवे तपशील अभ्यासले जात आहेत. हे प्रश्न खऱ्या अर्थाने विद्योपासक व विद्याधारक समाज निर्माण होण्यानेच पूर्णांशाने सुटू शकतील, असे शैक्षणिक समाज पुनर्रचनेचे एक नवे शैक्षणिक दर्शन व आशादायी वातावरण आता सर्वत्र वाढीला लागत आहे. नव्या स्वरूपातील ज्ञान, विज्ञानयुक्त समाज-जीवनाची उभारणी (सोशिऑलॉजी ऑफ सायन्स अँड एज्युकेशन) हे आता चालू सुशिक्षित संवेदनशील मनाला मिळालेले व सामोरे आलेले ऐतिहासिक आवाहन होय.

याच संदर्भात प्रस्थापित शिक्षणपद्धती, तथाकथित सुशिक्षित मनोवृत्ती व वांझोटा संशयवादी निराशाग्रस्त बुद्धिवाद याचे परखड मर्मभेदी विवेचन व विवरण ठिकठिकाणी अनेक अंगांनी चालू आहे. चालू शिक्षण व्यवस्था ही व्यक्तीच्या अस्मितेचा, जाणिवांचा व कार्यशक्तींचा परिपोष करण्याऐवजी, प्रस्थापित व्यवस्थेतील अनेक भ्रामक मूल्ये समाजाच्या माथी मारणारी व गळी उतरविणारी कार्ययंत्रणा बनली आहे. तसेच, विज्ञानाच्या नावाखाली व दबावाखाली ठरावीक साचेबंद कार्यक्रम (पॅकेजेस ऑफ प्रोग्रॅम) सार्वत्रिक करत राबवणारी कार्यपद्धती ठरली आहे. खरी रचनात्मक, विधायक कार्यशक्ती ही व्यक्तीव्यक्तीमधील समसहसंबंधातून (कोलॅबोरेशन) व सामाजिक बांधिलकीच्या विविधअंगी आविष्कारातून निर्माण होत असते. परंतु चालू संस्कृतीतील व्यापारी जीवनपद्धतीने हे सर्वच संबंध व्यक्ती-वस्तू-व्यक्ती असे गुंतागुंतीचे, परोक्ष संबंध राखणारे बनलेले आहे. आज प्रत्येक वस्तू, शुद्ध ज्ञान विज्ञानदेखील समाजातील सर्व थरांत हवे तेवढे, हवे तेथे, हवे तितके, हवे तसेच या स्वरूपात उपलब्ध नसते. प्रत्येक वितरण व्यवस्थेत वितरकाने आपल्या नफ्याचा हिस्सा आपणच स्वत: प्रमाणित करीत वसूल करण्याचे तंत्र अवलंबिल्याने आज ज्ञान-विज्ञानाचेदेखील ध्रुवीकरण होऊन, एक कृत्रिम टंचाई व महागाई याही क्षेत्रात निर्माण झाली आहे. यातून आपल्या सर्वच समाजजीवनात एका बाजूने एकाकी-पणाची, एकलेपणाची तर दुसऱ्या टोकाने विद्रोहाची व समूळ विध्वंसनाची वृत्ती उफाळून वर येत आहे.

आज आपल्या शिक्षणसंस्थांतून व शैक्षणिक कार्यक्रमांच्या पसाऱ्यातून दिले जाणारे ज्ञान-विज्ञान हे मुक्त स्वरूपात सर्वांना उपलब्ध नसते व ते त्यांना हस्तगत करता व वापरता पण येत नसते. ठरावीक मोजमापात (करिक्युलम) व ठरावीक कसोट्या, चाचण्यात पात्रापात्रतेचे दंडक ठरवत त्यांचे वाटप केले जाते. या काटछाटीत ज्यांच्या पदरी जे ज्ञान जसे बांधून दिले असेल, तसे व तेवढेच ज्ञान-विज्ञान वापरण्याचा व त्यानावे व्यवहार वा बाजार करण्याचा अधिकार समाजातील फक्त मूठभरच व्यक्तीनाच प्राप्त होत असतो. इतर सर्व समाज या हक्कापासून पूर्णपणे वंचित राखलेला असतो. थोडक्यात, ज्ञान-विज्ञानदेखील आज विक्री वस्तू बनवले गेले आहे. यातूनच चालू समाजजीवनातील पिळवणूक व्यवस्थेला सर्वात मोठा हातभार लागत आहे.

अशा परिस्थितीत या दुरवस्थेवर झगझगीत प्रकाश-झोत टाकून, सामाजिक बांधिलकीतील खऱ्या आशयशोधाची दिशा व स्वरूप दाखवणाऱ्या विचारवंतांत इव्हान इलीच व पाव्हलो फ्रेरे यांना चालू शिक्षणक्षेत्रात मानाचे स्थान आहे. समाजाचे निःशालाकरण (डीस्कूलिंग सोसायटी) हीच चालू घडीची सर्वात मोठी निकड आहे, असे अती तार्किक परखड विवेचन इलीचने केले आहे. चालू सामाजिक दुरवस्थेतील शिक्षणसंस्थांकडे येणारा पापाचा वाटा व त्यांची वाटमारी या गोष्टी या विश्लेषणात त्यांनी चालू शिक्षणव्यवस्थेच्या पदरात चोखपणे बांधलेल्या आहेत. पण इव्हानच्या या दिशाशोधा-मागोमाग खऱ्या सामाजिक बांधिलकीचे नेमके स्वरूप पाव्हलो फ्रेरेने 'पददलितांचे शोषण' या आपल्या अभ्यासात फार चांगल्या रीतीने दाखवून दिलेले आहे. फ्रेरेचे याबाबतचे प्रमुख मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत.

१. जनसामान्यांना आपल्या परिसराचे व परिस्थितीचे एक मूलभूत अप्रगट भान असते. ते त्यांच्या पारंपरिक

जाणिवेच्या क्षेत्रात (ऑर्किऑलॉजी ऑफ कॉन्शसनेस) शोधता येते. त्यांची नित्याची शब्दसंपदा या त्यांच्या अप्रगट विचारसंपदेशी व वास्तव जीवनविषयक अर्थाशी, संदर्भाशी व हिशोबाशी अती निगडित असते.

या शब्दांमागील भ्रामक प्रतीकांची (इनव्हिबीटींग मिथस्) नेमकी ओळख त्यांना बोलके करू शकते. त्यांतून त्यांच्या पिळवणूक षड्यंत्राचे त्यांना सम्यक आकलन होत जाते व त्यांची जाणीव जागृत होत, न्याय्य व्यवस्थेसाठी ती रचनात्मक व संघर्षात्मक मार्ग चोखाळू लागते.

थोडक्यात, कोणत्याही गटाशी सामाजिक बांधिलकी जोडताना ती त्यांच्याच शब्दसंपदेद्वारे, ते शब्द क्रियाशील बनवत आपण जोडू शकलो, तर अशी बांधिलकी अती स्वाभाविक व प्रभावी ठरते.

२. अशी सामाजिक बांधिलकी सहजसाध्य होण्यास खुला व निःसंकोच मर्मग्राही सहसंवाद (ओपन क्रिटिकल डायलॉग) अती उपकारक ठरतो. यासाठी आपले मन पुरेसे संवेदनशील पण तितकेच सोशिक व सातत्याने पाठपुरावा करत राहणारे असावे लागते; व त्या व्यक्तीसमूहाच्या जीवनपद्धतीच्या पातळीशी समरसून कार्य करत राहण्याची पण कार्यकर्त्यात क्षमता असावी लागते.

३. या रीतीच्या जाणीवजागृतीने प्रस्थापितांतील कोणत्या भ्रामक प्रतिमांनी आपणास जखडले होते, याचे त्या समाजाला पूर्ण भान येते. यामुळे वास्तवाचा आरपार भेद करून (क्रिटिकल इन्सर्शन इन रिॲलिटी) नवी व्यवस्था उभी करण्याकरिता व उत्स्फूर्त व स्वायत्त कार्य संघटन उदयाला येते. प्रसंगी संघर्ष करून ते मग आपल्या उद्दिष्टांची पूर्ती करून घेतात.

थोडक्यात, फ्रेरेच्या विचारप्रणालीत सामाजिक बांधिलकीचे स्वरूप चालू राष्ट्रीय सेवा योजनेअंतर्गत कार्यक्रमासारखे अगर विस्तार योजना कार्यासारखे नसते. या तथाकथित सामाजिक बांधिलकीच्या कार्यक्रमांत तळागाळातील व्यक्तीसमूहाच्या जीवनपद्धतीत उतरून कार्य करण्याचा जोष नसतो. असतो तो पढीक वैचारिक मार्गदर्शनाचा जल्लोष व स्वतःकडे मोठेपण घेत कुंपणावर बसून केलेले मार्गदर्शन! या तथाकथित सामाजिक बांधिलकीच्या उपक्रमांतून कळत-नकळत त्या व्यक्तींच्या प्रतिष्ठेचे अवमूल्यन केलेले असते. तसेच, त्यांच्यातील सर्जनशील नवनिर्माणक्षम कार्यशक्तीवर अविश्वासाचे व अपात्रतेचे शिक्कामोर्तब होत असते. व्यक्तीची प्रतिष्ठा (डिग्निटी) व आत्मसन्मान (आयडेंटिटी) हा व्यक्ती सुशिक्षित वा अशिक्षित असली तरी समानच असला पाहिजे, या मूलभूत मानवी मूल्याचा वा न्यायाचा त्यात अधिक्षेप असतो. एका रीतीने आपल्या पढीक पांडित्याचे अती अशिष्ट प्रदर्शन असून, त्यात आपण त्यांच्या अस्मितेवर जिव्हारी घाव घालत असतो. फ्रेरेने हे मूलभूत शैक्षणिक संदर्भ आपल्या याबाबतच्या प्रयोग धडपडीने स्पष्ट करून दाखवले आहेत. लोकांचे दारिद्र्य व अज्ञान हे आज अनेकांना अनेक उद्योग पुरवणारे सर्वात मोठे व्यवसाय ठरले आहेत, असे आज उपहासाने म्हटले जाते. निरक्षरांना साक्षर करणे, साचेबंद कृषिविकास व इतर कार्यक्रम पुरवणे, विविध प्रशिक्षण योजना, मोफत औषधोपचार, बालकांना सकस आहार पुरवठा योजना, भांडवल पतपुरवठा योजना व सेवा योजना हे व यांसारखे अनेक कार्यक्रम हे या दारिद्र्याच्या व अडाणीपणाच्या निरासानावे अनेक अंगांनी वाढत आहेत; परिपुष्ट होत आहेत, व तथाकथित शिक्षित, प्रशिक्षितांना पोटापाण्याला लावत आहेत.

दारिद्र्याचा व अज्ञानाचा मानवी समाजातून समूळ निरास करणे, हे एक रम्य ऐतिहासिक कार्य आपल्या चालू पिढीला सामोरे आहे आहे. पाव्हलो फ्रेरेने या अशा मूलग्राही रचनात्मक व विधायक सामाजिक बांधिलकीतील खऱ्या स्वरूपाच्या वर नमूद केलेल्या काही अंगांवर नेमके बोट ठेवलेले आहे. खलील जिब्रानने बालकांच्या संदर्भात म्हटलेल्या, 'त्यांना त्यांचे विचार असतात; त्यांना तुमचे विचार देऊ नका' या उक्तीप्रमाणेच, फ्रेरेच्या मताने जनसामान्यांना त्यांचे स्वतःचे असे स्व-तंत्र जिवंत मन असते; त्याला आपल्या पढीक शहाणपणाच्या ओझ्याने गुदमरू देऊ नका व परावलंबी बनवू नका, असे हे सामाजिक बांधिलकीचे आपण प्रधान सूत्र बनवले पाहिजे. 'कोणाचे ओझे कोणाच्या खांद्यावरी' असे आजच्या आपल्या शैक्षणिक जीवनाचे व उपक्रमांचे स्वरूप आहे. ते स्वरूप सोडून, थोडे चाकोरीबाहेर पाऊल टाकून, बेबंद साहसीवृत्तीने जनसामान्यांच्या जीवनाशी, परिसरादी परि-स्थितीशी व पर्यावरणाशी त्यांच्यातीलच एक बनत, आपण एक जिव्हाळ्याचे अतूट नाते उभे केले पाहिजे. सहसंवादाने व सहजाणिवेने त्यांच्यातील एक बनून त्यांच्या मनाची, परिस्थितीच्या, रूढीच्या व इतर सामाजिक हितसंबंधांच्या दाब-दबावाखाली दडपली गेलेली, अंगभूत साहसोर्मी अंकुरित होत पल्लवीत होईल व त्यांना हवी असलेली

अनुक्रमणिका

फलप्राप्ती करून घेण्यास धडपडेल, यासाठी निसंगपणे व स्वतःच स्वतःची याबाबतची कार्यक्षेत्रे धुंडाळत धुंदपणे कार्यरत होणे, हीच आजची खरी सामाजिक बांधिलकी होय.

या अशा विविध कार्य धडपडीत मीदेखील गेली वर्षानुवर्षे शोध घेत आहे. 'एक गाव एक पाणवठा' नावे मराठवाड्यात वीस वर्षांपूर्वी दिलेला एक उत्स्फूर्त लढा, शैक्षणिक संस्थात्मक घटनांचे जास्तीत जास्त लोकशाहीकरण व्हावे, म्हणून जनास्मितेला सामोरे जात स्वीकारलेली उमरगा (मराठवाडा) व मौनी विद्यापीठ येथील आवाहने, शाळा कॉलेजचा स्पर्श नसलेल्या अनेक ग्रामीण व नागरी व्यक्तींना प्रामुख्याने महिलांना मुक्तपणे उपलब्ध करून दिलेले व यशस्वीपणे चालविलेले पदवीपूर्व व पदव्युत्तर शालाबाह्य (एक्स्टर्नल) अभ्यास वर्ग, दलित घरांतील लग्नसंबंध सामोरा आला असताना त्यात प्रतिकूल परिस्थितीत पण संपादलेले विधायक यश, समाजातील होतकरू विद्यार्थी हा घरच्याच मुलासारखा वाढवून त्याचे अगदी बरोबरीच्या नात्याने केलेले कौटुंबिक सात्मीकरण, श्री मौनी विद्यापीठातील सुरुवातीच्या काळात हेलन मूसबरोबर तिचे सहसाथी म्हणून कुटुंबनियोजन व कुटुंबकल्याण कार्यातील सहभाग, विद्यार्थ्यांनाचे चालवलेले विविध छंद वर्ग, अभ्यास वर्ग व अभ्यास सुधार वर्ग, राज्य पातळीवर उभे केलेले अनेक कृषी उत्पादक प्रयोग या अनेक अनुभवसंपदेतून मी नकळत पाव्हलो फ्रेरे, इव्हान इलिच यांच्याच सारख्या चाकोरीबाहेरील निष्कर्षाप्रत येऊन उभा होतो. इव्हान इलिच व पाव्हलों फ्रेरे या उभयतांशी काही प्रसंगाने माझा बराच निकटचा संबंध अलीकडच्या काळात आला. माझ्या व त्यांच्या विचारपद्धतीतील काही नवे दुवे अधिक स्पष्ट होत गेले.

पाव्हलो फ्रेरेच्या विचारसरणीत, सामाजिक बांधिलकीत जाणकार संवेदनशील कार्यकर्त्याची भूमिका शिक्षक ही नसून 'ॲक्टिव्हिस्ट' अगर जागा करणारा, 'जागल्या' अशी असते. पाव्हलोच्या विचारात अशा 'जागल्या'ने त्या समाजातच राहून त्याचे जीवन व सुखदुःख अनुभवून मग त्यांच्यातीलच एक बनून हे जनजागरणाचे, सामाजिक बांधिलकीचे कार्य करावे, असे मानण्यात आले आहे. पश्चिम जर्मनीत पाव्हलो फ्रेरेच्या एका जाहीर व्याख्यानास त्याच्याबरोबर त्याचा सहसाथी म्हणून मी हजर होतो. तेव्हा असा जागल्या हेदेखील एक बाह्य आक्रमणच (कल्चरल इन्व्हेजन) नव्हे काय, असा प्रश्न उपस्थित केला गेला; व तेवढ्या प्रमाणात जनसामान्यांच्या अस्मितेचा त्यात संकोच होत नाही काय, अशी चिचिकित्सा तेथे रंगली होती. सामाजिक बांधिलकीतील नव्या आशयातील पथ्ये किती काटेकोर बनत आहेत, हे यावरुन लक्षात येईल.

फ्रेरेच्या सामाजिक बांधिलकीच्या बरोबरीनेच, त्याच संदर्भात फ्रेरेच्या विवेचनात न आलेले विज्ञानाचे प्राकृतिकरण (डीमिस्टिफिकेशन ऑफ सायन्स) करण्यास आपण सर्वांनीच झोकून दिले पाहिजे व पदवीधराच्या पातळीची बुद्धिदर्शकांक असणाऱ्या व्यक्तींना असे स्वतःचे कार्यक्षेत्र सहज उभे करता व वाढविता येण्यासारखे आहे, याचे पश्चिम जर्मनीत मी अनेक प्रत्ययकारी प्रयोग-दाखले देऊन विवेचन केले होते. किंबहुना, शालेय व्यवस्थेतून या नाही त्या कारणाने बाहेर फेकल्या गेलेल्या समाजातच असे वास्तवाचे परिपूर्ण भान असणारे व पदवीधरांइतकेच नव्हे, तर त्याहून काकणभर सरस बुद्धिदर्शकांक असणारे सामाजिक मन परिस्थितीवर मात करत आपली प्रगती साधण्यास उत्सुक असते, हे माझे येथील अनेक प्रयोग निष्कर्षांवर आधारित विवेचन पश्चिम जर्मनीत मोठे दाद मिळवून गेले. पाव्हलो फ्रेरे व माझा एकत्रित परिसंवाद खास या चर्चेनावे त्यांनी एकदा आयोजित केला होता व त्याचे संकलन पण आता उपलब्ध आहे.

या चिंतनाप्रमाणे चालू शिक्षण व्यवस्थेइतकेच चालू तंत्रविज्ञान हे प्रस्थापित व्यवस्थेचे बटीक बनल्याने, जनसामान्यांना त्यांच्या पर्यावरणात, परिसरात सहज वापरता येईल व यशस्वी प्रगती करता येईल, असे तंत्रविज्ञान आज फारसे उपलब्ध नाही. ग्रामसुधारणेसाठी खेड्यात गेलेल्या आपणाला अगर विज्ञान लोकयात्रेतील उत्साही कार्यकर्त्याला खतानावे युरिया, सुफला इ. पदार्थ, औषधानावे रोगॅर, ब्लालटॉक्स, टॉनिकनावे ठराविक बाटल्यातील औषधे ही वा यासारखीच सांगता येतात. कारण आपले शिक्षणच त्या चौकटी अनुरूप साचेबंद घडवलेले असते. याहीमुळे त्या गोष्टीच्याच तोलाची, त्यांचीच गरज चपखलपणे अथवा सरसपणे भागवणारी, त्याच पर्यावरणात व परिसरात उभी करता येण्याजोगी व वापरता येण्यासारखी शुद्ध वैज्ञानिक पर्यायी माहिती आपण त्यांना पुरवू शकत नसतो.

यासाठी सामाजिक बांधिलकी मानणाऱ्या आपणा प्रत्येकाने विविध पर्यायी तंत्रविज्ञानाचे स्वयंशिक्षण कोणत्याही शाळा कॉलेजात न जाता, मुक्तपणे प्रयोग, व्यासंग करत आपापल्या बुद्धिदर्शकांकावर हस्तगत केले पाहिजे, प्रमाणित








केले पाहिजे. असे तळागाळातील व्यक्तींच्या साहसी वैज्ञानिक प्रयोगशक्तीला साद घालणारे, त्याच्या प्राप्तपरिस्थितीतच यशस्वी ठरणारे वैज्ञानिक अभिक्रम प्रमाणित होऊ लागले की, त्या यशाचा शोध घेतच जनसामान्य, पूर्वी जसे शिष्य व गुरु परस्परांस शोधत येत, त्याप्रमाणे शोध घेत येतात. यात तळागाळातील व्यक्तींच्या साहसी वृत्तीला साद घालू शकणारे प्रयोग तपशील हे परिवार भावनेने संक्रमित होत, स्वीकारत, नाकारत, सुधारत प्रमाणित होतात व स्वताकर्दीवरच सार्वत्रिकपण होतात. यात आपण व आपणाबरोबर प्रयोग करणारे प्रयोगवीर हे एकाच 'वैज्ञानिक साक्षरता' वर्गाचे सहसाथी असतात. त्यात काहींना नवतंत्रशोधाचा आविष्कार सापडत असतो, तर इतरांना त्यांच्या अस्तित्वाला योग्य न्याय व उजवे दान देणारा कार्यक्रम गवसत असतो.

चाकोरीबाहेरील अशा ज्ञान विज्ञान उपासनेला केवढी मधुर व रसाळ फळे लागतात, याचा रम्य अनुभव तासगाव वैज्ञानिक द्राक्षकुलाच्या गेल्या सोळा वर्षांतील विकासात आजतागायत मी सातत्याने घेत आहे; व कोकणची आंबा लागवड, नाशिक भागातील मटार, निशीगंध, टोमॅटो यांसारखी लागवड, ठिकठिकाणची गुलाब वा केळी लागवड, या विविध प्रयोगनिष्ठ कार्यकुलांतून असेच विविध साहसी प्रयोग आता उभे होत असताना, मला याचा वाढता साक्षात्कार मिळत आहे. एक गणिताचा प्राध्यापक आपल्या नित्य व्यवसाय ज्ञानक्षेत्राबाहेर फलोद्यान व फुलउद्यान या क्षेत्रांतील चाकोरीबाहेरील आडाखे बांधतो व जनसामान्यांना बरोबर घेत त्यात आगेकुच करु शकतो. हा काही एक व्यक्तीसापेक्ष निष्कर्ष ठरत नाही. विज्ञानाची स्वयंउपासना सुरु करा, प्रयोगबुद्धीने अनेक पर्यायी तंत्रविज्ञान प्रमाणित करा, जनसामान्यांच्या प्राप्त परिस्थितीत त्यांच्या साहसाला साद देतील अशी सामाजिक बांधिलकी त्यात वाढीला लावत चला व धडपड्यांना सावरा व यशस्वी करा, अशी ही पर्यायी तंत्रविज्ञानाची (टेक्नीरसीची) थोडक्यात कार्यपद्धती आहे.

यासाठी पाव्हलोच्या जाणीवजागृतीनावे प्रत्येकाने आपल्या बुद्धीचा सन्मान राखण्यासाठी व आपले खरे बुद्धीवैभव जतन करून ते सार्वत्रिक करण्यासाठी आपल्या बुद्धिदर्शकांकानुसार ज्ञान विज्ञान क्षेत्रातील अती श्रेष्ठ दर्जाचे ज्ञान आत्मसात करत, स्वतंत्रपणे कलंदर वृत्तीने प्रयोग करीत, जनसामान्यांबरोबर त्यांचे नित्यजीवनाचे प्रश्न शुद्ध वैज्ञानिक दृष्टीने सोडविण्यासाठी झोकून दिले पाहिजे. सामाजिक बांधिलकीच्या आशयातील ही दुसरी बाजू होय.

चालू चर्चेतील सामाजिक बांधिलकीतील आशय-शोधाचे नवे स्वरुप थोडक्यात खालीलप्रमाणे संकलित करता येईल :

१. चालू शिक्षणव्यवस्थेच्या मर्यादा ओळखून त्याची कवचकुंडलं उतरुन, आपणास नव्या जाणीवांच्या विज्ञानाच्या शोधात जनसामान्यांतील एक होता आले पाहिजे.

खऱ्या सामाजिक बांधिलकीत देखावा नसतो अगर सेवेचा वसा नसतो; 'समाजातील एक' अशी तेथे वृत्ती असते. व्यक्तिनिरपेक्ष मूल्यांची व तत्त्वांची युक्त कार्यशोधाद्वारे सर्वसामान्यांच्या धडपडीशी, जाणिवाशी व अस्मितेशी अविचल सांगड घातली जाते.

२. 'मी हे उत्तर काढले आहे, तेच माना', 'विज्ञान असेच उगहे, ते स्वीकारा', असा त्यात आत्यंतिक आग्रह नसतो. इथे, तिथे ज्ञान-विज्ञानाच्या परिभाषेत कुठेतरी खचित हे उत्तर आहे, आपण ते शोधू या; न थकता नवनवे प्रयोग करू या, असा त्यात खऱ्या प्रज्ञावंताचा व प्रयोगनिष्ठ वृत्तीचा सहजभाव असतो.

३. त्यात स्वतःच्या पदवीचा व ज्ञानाचा दंभ नसतो. पर्यावरण विकासाशी व जनसामान्यांचे नित्यजीवनाचे प्रश्न सोडविण्यासाठी जे ज्ञान विज्ञान, तंत्रविज्ञान अधुरे ठरते, त्यातील उणिवांचा पाठपुरावा करत, ते सुधारत प्रवाही केले जाते. असे उपक्रम, असे तंत्रविज्ञान जनसामान्यांतून उत्स्फूर्तपणे आत्मसात केले जाते व वापरलेही जाते. सामाजिक बांधिलकी ही एक प्रायोगिक पारिवारिक बांधिलकी असते. त्यात नवा ज्ञानोपासक व विद्याधारक समाज घडविण्याची ताकद असते. ज्ञान-विज्ञानाचे मुक्तपणे केलेले सार्वत्रीकरण ही तिची कार्यदिशा असते व व्यक्तीच्या साहसी उन्मेशी कार्यशक्तींचा व अस्मितेचा त्यात परिपोष असतो. त्यात कोणीही ज्ञान देणारा-घेणारा, कार्यक्रम मांडणारा-राबवणारा असे अपरोक्ष शिक्षक-विद्यार्थी, विस्तारकार्य-सेवाअधिकारी वा घटक असे संबंध नसून, ज्ञान-विज्ञानाच्या अखंड वाहत्या गंगेत नित्य कलंदरपणे इतरांसमवेतच स्वतःलापण अधिक विशुद्ध व पावन करत जाणारी एकाच विद्या उपासक क्षेत्रात रंगलेली (सेम लर्निंग क्लास) ती एक चिरतरुण वृत्ती असते.

☑ ☑ ☑

# भारतीय शिक्षणसंस्था : एका अभिनव प्रयोगाची वाटचाल

श्री० ब० गोगटे

### १. संशोधन संस्थांविषयी तात्त्विक भूमिका

जागतिक कीर्तीचे शिक्षणतज्ज्ञ कै. प्रा. जे. पी. नाईक यांनी २७ नोव्हेंबर १९७८ रोजी भारतीय शिक्षण संस्थेतील सहकाऱ्यांसाठी एक विशेष चर्चासत्र आयोजित केले होते. या चर्चासत्रात त्यांनी सामान्यत: संशोधन संस्था स्थापन करण्यामागे कोणती तात्त्विक भूमिका असावी आणि त्यांचे उद्देश कोणते असावेत याचा ऊहापोह केला होता. भारतीय शिक्षण संस्थेचा इतिहास आणि कार्य समजावून घेण्यापूर्वी ही तात्त्विक भूमिका कोणती होती हे पाहणे जरूर आहे.

ज्ञानाच्या कक्षा विस्तारत असताना उच्च दर्जाचे मनुष्यबळ प्रशिक्षित करण्यासाठी चांगल्या दर्जाच्या संस्थांची जरूरी असते. बौद्धिकदृष्ट्या स्वयंपूर्णता असणे आणि बरोबरीच्या नात्याने इतर देशांशी संशोधन कार्यात सहभागी होणे ही कोणत्याही स्वतंत्र राष्ट्राची जरूरी असते. या कामासाठी तसेच देशातील प्रश्न सोडविण्यासाठी जे नेतृत्व देऊ शकतील अशा व्यक्तींच्या प्रशिक्षणासाठी चांगल्या संस्थांची जरूरी असते. उच्च शिक्षणामध्ये तर अशा प्रकारच्या संस्थांची खूप जरूरी असते.

भारतामध्ये अशा प्रकारे उच्च दर्जाच्या व्यक्तींचे प्रशिक्षण अ) शासकीय महाविद्यालये, ब) विद्यापीठाचे विविध विभाग, क) नैसर्गिक शास्त्रातील संशोधन संस्था ड) वेगवेगळ्या विद्यापीठांमध्ये स्थापन झालेली प्रगत अभ्यास केंद्रे, इ) भाषा आणि समाजशास्त्रे यामधील संशोधनसंस्था, यांनी करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

वरील संस्थांमध्ये जे काम चालते त्यामधून प्रामुख्याने पुढील अनुभव लक्षात आला.

अ) विद्यापीठातील प्राध्यापक आणि संशोधन संस्थांतील प्राध्यापक यामध्ये विशिष्ठ प्रकारचे द्वैत निर्माण होते. काही ठिकाणी संशोधन संस्थांतील प्राध्यापकांची वेतनश्रेणी वेगळी असल्याने त्यांना आपण विद्यापीठातील प्राध्यापकांपेक्षा कोणी वेगळे आहोत असे वाटू लागते. तसेच देशी आणि परदेशी संस्थांकडूनही संशोधन संस्थांना संशोधनासाठी आर्थिक सहाय्य मिळत असल्यामुळे विद्यापीठांना या संशोधन संस्थेचा हेवा वाटतो. त्यामुळे संशोधनाचे कार्य विद्यापीठाबाहेर जाते असे त्यांना वाटते.

ब) संशोधन संस्थेचा आकार विशिष्ट मर्यादे पलीकडे गेला की तेथे गटबाजी होते आणि हे गट संशोधन करण्याऐवजी परस्परांवर कुरघोडी करण्यात आपला वेळ खर्च करतात. परिणामी असे होते की संशोधनाचा दर्जा कमी होतो.

क) संशोधन संस्थांतून होणाऱ्या संशोधनाचा दर्जा चांगला राखला जावा यासाठी खालील गोष्टी करण्याची जरुरी असते.

- चांगल्या दर्जाच्या अध्यापकांची निवड.
- अध्यापकांना संशोधनाच्या योग्य त्या सोयी-सवलती. त्यांना व्यवसायामध्ये समाधान वाटेल अशा प्रकारचे काम.
- संस्थांतून एकत्वाची भावना.
- अध्यापकांचे आणि संशोधन सहाय्यकांचे संबंध अशा पद्धतीने ठेवावयाचे की सर्वांना आपण एकाच कुटुंबाचे घटक आहोत असे वाटावे.
- संस्थांचे भक्कम अंतर्गत संशोधन.
- बाहेरील संस्थांकडून संशोधनासाठी आर्थिक सहाय्य.
- संशोधनाचा दर्जा कायम राखण्याबद्दल दक्षता.
- विद्यापीठांचे सहाय्य, तसेच तळागाळातील लोकांसाठी प्रत्यक्ष काम करणाऱ्या संस्थांबरोबरही सहाय्य.
- अध्यापन.
- विस्तार कार्यक्रम.

वरील गोष्टी साध्य करण्यासाठी संशोधन संस्थांची विशिष्ट भूमिका असावी लागते. प्रा. जे. पी. नाईक यांनी ती भूमिका पुढीलप्रमाणे मांडली होती.

अ) सर्व ज्ञान निर्माण करणे आणि उपलब्ध असलेल्या ज्ञानाचा समाजोपयोगी कार्यासाठी नव्याने अन्वय लावणे.

ब) समाजामध्ये जे काही चालले आहे त्याची वस्तुनिष्ठ दृष्टीने समीक्षा करणे.

अनुक्रमणिका

क) देशात तसेच परदेशातही आपापल्या क्षेत्रामध्ये ज्या गोष्टी घडत आहेत त्यांचेशी सतत संपर्क ठेवणे आणि त्या गोष्टी आत्मसात करणे.

ड) देशामध्ये जे धोरण ठरविले जाते ते योग्य तऱ्हेने ठरविले जावे यासाठी वस्तुनिष्ठ माहिती गोळा करणे आणि जनमत जागृत करणे.

इ) या क्षेत्रात काम करू इच्छिणारी तरुण मंडळी शोधून काढून त्यांच्यामध्ये गुणवत्ता विकसित होईल अशा तऱ्हेने त्यांना प्रशिक्षण देणे.

फ) लोकमत तयार करण्याचे दृष्टीने लोकशिक्षणाचे कार्यक्रम आखणे.

ग) अध्यापकांसाठी योग्य ते साहित्य तयार करणे.

ह) जे कार्यक्रम चालू आहेत त्याचे मूल्यमापन करणे.

ळ) शासन आणि इतर संस्थांसाठी तज्ज्ञ म्हणून काम करणे व त्यांना आवश्यक तो सल्ला देणे.

वरील गोष्टी लक्षात घेऊन प्रा. जे. पी. नाईक यांनी भारतीय शिक्षण संस्थेच्या कामाचे पुढीलप्रमाणे वैशिष्ट्य राहील असे सूचित केले.

अ) परंपरेप्रमाणे आपल्याकडे शिक्षण म्हणजे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षकांचे प्रशिक्षण किंवा शाळेत दिले जाणारे अध्यापन असे समीकरण करण्यात आलेले आहे. शिक्षणाचा योग्य विकास व्हावा या दृष्टीने शिक्षण प्रक्रियेकडे समाजशास्त्रांच्या दृष्टिकोनातून आंतरविद्याशाखीय पद्धतीने पाहणे भारताच्या दृष्टीने जरूर आहे. अशा प्रकारचा काही प्रयत्न संस्थेने १९४८ साली केला होता आणि अशा प्रकारचा प्रयत्न करणारी देशातील ही एकमेव संस्था आहे. त्यामुळे या संस्थेला काम करण्यास जसा खूप वाव आहे तशीच संस्थेपुढे पुष्कळ आव्हानेही आहेत.

ब) या संस्थेने पदव्युत्तर अध्यापन आणि संशोधन करतानाच प्रयोग करणे आवश्यक आहे.

क) योग्य असे लोकमत तयार होण्यासाठी विस्तार कार्यक्रम, प्रकाशने, परिषदा, कृतिसत्रे, चर्चासत्रे आणि व्याख्याने आयोजित केली पाहिजेत.

ड) राज्य स्तरावरील शैक्षणिक प्रश्नांचा अभ्यास करणे.

इ) अध्यापक आणि विद्यार्थी निवडताना ते राष्ट्रीय स्तरावरील असतील याची दक्षता घेणे.

फ) संस्थेमध्ये तौलनिक शिक्षण, शिक्षण आणि समाज, भारतीय शिक्षणाप्रमाणे ज्यांचे प्रश्न आहेत असा विकसनशील देशांच्या शैक्षणिक प्रश्नांचा अभ्यास आणि शिक्षणातील नव्या कल्पनांचा अभ्यास अशा प्रकारचे शिक्षण विभाग असण्याची जरुरी.

ग) राज्य, राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरांवर जे काम चालते त्याचा अभ्यास.

ह) संस्थेमध्ये खालीलप्रमाणे व्यवस्थापकीय चौकट असणे जरूर आहे.

व्यवस्थापनामध्ये सर्व अध्यापकांना स्थान असेल. त्यातील एक प्राध्यापक संचालक असतील. मात्र ते इतरांपेक्षा श्रेष्ठ असे न मानता जे बरोबरीचे आहेत त्यातील पहिले असे त्यांचे स्थान असेल. संचालक असण्याबद्दल त्यांना अधिक मेहनताना मिळणार नाही. मात्र जबाबदारीस अनुसरून त्यांना योग्य त्या सुविधा प्राप्त होतील. सर्व अध्यापकांचा व्यवस्थापकीय कामामध्ये सहभाग, शक्यतो प्राध्यापक आणि प्रपाठक या दर्जाच्या अध्यापकांचे अधिक्य, संयुक्त जबाबदारीचे तत्त्व, संस्थेचा कमाल आकार ठरविताना १५ ते २० पेक्षा प्राध्यापकांची संख्या अधिक वाढू न देण्याची दक्षता, कामामध्ये योग्य त्या मर्यादा घालून त्या पाळण्याची दक्षता, निःशंक आणि निर्भयपणे सहकाऱ्यांच्या कामाचे मूल्यमापन, पुणे, मुंबई ही दोन्ही कामाची ठिकाणे; सामान्यत: १/३ पूर्ण वेळ अध्यापक, २/३ अर्धवेळ अध्यापक आणि १/३ निमंत्रिक अध्यापक अशी रचना; अध्यापकांच्या कामासंबंधीही योग्य तऱ्हेचे नियम करून ज्येष्ठ अध्यापक हे नियम पाळतील या बद्दलची दक्षता आणि संस्थेतील एकात्मता विचलित होणार नाही अशा तऱ्हेने अधिकाराचे विकेंद्रीकरण.

भारतीय शिक्षण संस्थेच्या गेल्या दहा वर्षांचा कामाचा आढावा घेताना कै. नाईकसाहेबांनी संशोधन संस्थेविषयीची वरील जी भूमिका मांडली आहे ती मुद्दामच तपशीलवार मांडली आहे. कारण भारतीय शिक्षण संस्थेची स्थापना, नंतरचा विकास, १९७६ मधील पुनरुज्जीवन आणि त्यानंतरचे कार्यक्रम याचे जर योग्य प्रकारे मूल्यमापन करावयाचे असेल तर कै. नाईकसाहेबांनी मांडलेली संकल्पनाही लक्षात घेणे प्रथम जरूर आहे.

**२) भारतीय शिक्षण संस्थेची स्थापना, कार्यामधील खंड आणि पुनरुज्जीवन**

शिक्षक, विद्यार्थी, शिक्षण क्षेत्रातील व्यवस्थापक आणि सर्वसामान्य जनता यांचे शिक्षणविषयक मत वस्तुनिष्ठ आणि पुरोगामी आणि शास्त्रीय पायावर आधारित असे तयार व्हावे या दृष्टीने १९४५ ते १९४८ चे दरम्यान त्या वेळच्या मुंबई राज्यातील शिक्षण क्षेत्रातील नेतृत्व करणाऱ्या काही व्यक्ती एकत्र येऊन त्यांनी पदव्युत्तर शिक्षणाचे एक शैक्षणिक संशोधन केंद्र मुंबईत स्थापन केले. ते केंद्र म्हणजेच आजची भारतीय शिक्षण संस्था होय. या संस्थेमध्ये वर नमूद केल्याप्रमाणेच जनमत तयार करण्या व्यतिरिक्त अध्यापन, संशोधन, प्रकाशन आणि विस्तार ही कामे हाती घेण्याचे ठरले. ज्यांनी ही संस्था स्थापन केली त्या शिक्षण क्षेत्रातील नेत्यांमध्ये प्रा. आर. व्ही. परुळेकर, प्रा. ग. श्री. खैर, प्रा. एम. टी. व्यास, प्रा. एम. व्ही. दोंदे, श्री. बा. ग. जगताप, प्रा. एस. एस. दसनवी, श्री. ए. आर. दाऊद आणि प्रा. जे. पी. नाईक यांचा समावेश होता. या सर्व मंडळींच्या विचारमंथनातून संस्थेचा जन्म झाला आणि सुरुवातीच्या काळात प्रा. आर. व्ही. परुळेकर आणि प्रा. जे. पी. नाईक यांनी पूर्णवेळ काम केल्याने संस्थेच्या कामास चांगला आकार प्राप्त झाला. अशा प्रकारची शिक्षणविषयक संशोधन करणारी देशातील ही पहिलीच संस्था असल्याने शासकीय तसेच अशासकीय क्षेत्रातही या संस्थेस भरघोस पाठिंबा मिळाला. शासनातील ज्या व्यक्तींनी या संस्थेस पाठिंबा दिला त्यामध्ये प्रा. के. जी. सैयद्दीन, डॉ. डी. सी. पावटे, श्री. सय्यद नरुला, प्रा. एस. ए. भांडारकर आणि श्रीमती सुलभा पाणंदीकर यांचा समावेश होता.

प्रा. आर. व्ही. परुळेकर हे संस्थेचे पहिले संचालक होते. ते जसे विचारवंत होते तसे ते हाडाचे शिक्षक आणि संशोधकही होते. सुरुवातीच्या काळात ज्या मंडळींनी इंग्लंडला जाऊन शिक्षणशास्त्रातील पदवी घेतली त्यामधील ते एक होते. त्यांनी लीडस विद्यापीठामध्ये प्रा. मायकेल सॅडलर यांचे मार्गदर्शनाखाली एम.एड. अभ्यासक्रम पुरा केला होता. त्यांनी आपल्या व्यावसायिक जीवनाची सुरुवात माध्यमिक शिक्षक म्हणून केली असली तरी त्यांच्या मनामध्ये सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण, निरक्षरता निर्मूलन, ग्रामीण शिक्षण आणि सर्व स्तरावर मातृभाषा हे माध्यम असावे, हे प्रश्न सतत घर करून राहिले होते. या दृष्टीने त्यांना ज्योतिराव फुले, दादाभाई नौरोजी आणि गोपाळ कृष्ण गोखले यांचे वारस समजले जात होते. 'भारतातील लोकांचे शिक्षण' आणि 'भारतातील लोकांची साक्षरता' ही त्यांची पुस्तके या विषयातील अग्रगण्य ग्रंथ समजले जातात. म. गांधींनी असे म्हटले होते की ब्रिटिशांनी या देशातील निरक्षरता वाढविली. या विधानाला म. गांधींच्या बाजूने उभे राहणारे प्रा. परुळेकर हे एकमेव शिक्षणतज्ज्ञ होते. संस्थेचे संचालक या नात्याने त्यांनी अल्पकाळ काम केले असले तरी आपल्या कामाचा ठसा त्यांनी संस्थेमध्ये कायमचा ठेवला आहे. या संस्थेने पदव्युत्तर शिक्षणाचा जो कार्यक्रम विकसित केला त्यापासून अनेक विद्यार्थ्यांचा फायदा झाला. त्यापैकी अनेकांनी आपल्या पुढील जीवनात शिक्षण क्षेत्रात महत्त्वाचे काम केले. त्यापैकी काही महत्त्वाच्या व्यक्ती म्हणजे विद्यापीठ अनुदान मंडळाच्या भूतपूर्व अध्यक्षा डॉ. माधुरीबेन शहा, एस.एन.डी.टी. विद्यापीठाच्या सध्याच्या कुलगुरु डॉ. कमलिनी भन्साळी, बडोद्याच्या सयाजीराव विद्यापीठात एकेकाळी प्राध्यापक असलेले कै. डॉ. बी. एन्. देसाई तसेच मौनी विद्यापीठाच्या उभारणीमध्ये ज्यांनी महत्त्वाची भूमिका बजावली आहे असे प्रा. ए. एस. गावडे, डॉ. बी. एस. सावे ही मंडळी होत. संस्थेने या देशातील शिक्षणविषयक संधोधनाला वाहून घेतलेले पहिले नियतकालिक सुरू केले. इंग्रजी आणि मराठी प्रकाशनाचा संस्थेचा एक चांगला कार्यक्रम होता. या व्यतिरिक्त संस्थेने गारगोटी येथील मौनी विद्यापीठ उभारण्यात महत्त्वाचा भाग घेतला. ही एक नवी कल्पना असल्याने संस्थेच्या या कामास विशेष महत्त्व प्राप्त झाले. हे सर्व कार्य विकसित करण्यात संस्थेला प्रा. व्ही. व्ही. कामत, प्रा. व्ही.पी. खानोलकर, प्रा. टी. के. एन. मेनन यांचे सहाय्य झाले. प्रा. व्ही. पी. खानोलकर यांनी प्रा. परुळेकर यांच्यानंतर अनेक वर्षे संस्थेच्या संचालकत्वाची जबाबदारी उचलली.

१९५९-१९७५ संस्थेच्या कामामध्ये बऱ्यापैकी खंड पडला. या संस्थेचे पदव्युत्तर अध्यापनाचे काम मुंबई विद्यापीठाने स्वतःकडे घेतले. संस्थेतील महत्त्वाचे कार्यकर्ते सेवानिवृत्त झाले. संस्थेच्या कामात अहर्निश भाग घेणारे आणि संस्थेच्या कार्याचा प्रमुख प्रेरणास्रोत प्रा.जे. पी. नाईक राष्ट्रीय स्तरावर शैक्षणिक कामात सहभाग घेण्यासाठी व मार्गदर्शन करण्यासाठी दिल्लीला गेले आणि आर्थिक बळ कमी पडल्यामुळे संस्थेला नव्या दमाची संशोधन-अध्यापन करणारी










मंडळी दाखल करुन घेता आली नाहीत. या कालखंडात संस्थेची ज्योत तेवत ठेवण्याचे अवघड काम प्रा. व्ही. पी. खानोलकर यांनी केले.

१९७५ मध्ये १९४५ ते ४८ या दरम्यान घडलेल्या इतिहासाची पुनरावृत्ती झाली. महाराष्ट्रामध्ये शिक्षणविषयक अध्यापन आणि संशोधन करणाऱ्या एका चांगल्या संस्थेची गरज आहे असे वाटणारी अनेक मंडळी प्रा. जे. पी. नाईक यांच्या नेतृत्वाखाली एकत्र झाली आणि अशी संस्था कशी स्थापन करता येईल याचा विचार करु लागली. मुंबईस असलेल्या भारतीय शिक्षण संस्थेचे पुनरुज्जीवन करावे आणि मुंबईप्रमाणे पुण्यास या संस्थेचे काम चालू ठेवावे असे या मंडळींनी ठरविले. हे ठरविण्यामध्ये प्रा. जे. पी. नाईक यांचेबरोबर प्रा.ए. आर. कामत , प्रा. जी. डी. पारीख, प्रा. ए. बी. शहा, डॉ. चित्रा नाईक, प्रा. देवदत्त दाभोलकर आणि प्रा. मे. पुं. रेगे इ. मंडळी होती. त्यांना असे वाटले की संस्थेने १९४८ मध्ये कामाची जी रुपरेषा ठरविली होती ती आता कालबाह्य झाली असून आता आंतरविद्याशाखीय संशोधन हाती घेण्याचे दृष्टीने संस्थेची पुनर्बांधणी करावी व कोठारी आयोगाने सुचविल्याप्रमाणे संस्थेची रचना असावी. त्यांनी केलेल्या प्रयत्नाला यश येऊन १९७५ मध्ये संस्थेचे काम पुन्हा सुरु करण्यात आले व प्रा. ए. बी. शहा यांनी मानद सचिव म्हणून संस्थेच्या कामास सुरुवात केली. ऑगस्ट १९७६ मध्ये डॉ. चित्रा नाईक यांच्या संचालकत्वाखाली संस्थेने पुण्यामध्ये काम सुरु केले. १ एप्रिल १९७९ रोजी संस्थेने सध्याच्या कोथरुड येथील जागेत संस्थेच्या कार्यालयाची इमारत व वसतिगृहाची इमारत अशा दोन इमारती बांधण्याचे काम सुरु केले व सुमारे ३५ लाख रुपये खर्च करुन या दोन्ही इमारती पूर्ण केल्या. २२ फेब्रुवारी १९८१ रोजी भारताचे त्या वेळचे उपराष्ट्रपती मा. हिदायतुल्ला यांच्या हस्ते संस्थेच्या इमारतीचे उद्‌घाटन झाले.

डॉ. चित्रा नाईक यांनी ऑक्टोबर १९७८ अखेर संचालकाचे काम पाहिले. १९७८ ते ८१ अशी तीन वर्षे प्रा. देवदत्त दाभोलकर संस्थेचे संचालक होते, तर १९८१ ते ८४ ही तीन वर्षे प्रा. मे. पुं. रेगे संस्थेचे संचालक होते. जुलै १९८४ पासून प्रा. पा. रा. पंचमुखी हे संचालक म्हणून काम पाहत आहेत. १९७६ साली कामाचे पुनरुज्जीवन झाल्यानंतर सुरुवातीच्या काळात संस्थेला दोन मोठे धक्के बसले. संस्थेचे प्रमुख आधारस्तंभ आणि संस्थेचे कल्पक जनक प्रा. जे. पी. नाईक ३१ ऑगस्ट १९८१ रोजी अल्पशा आजाराने निधन पावले. या संस्थेचे दुसरे आधारस्तंभ प्रा. ए. बी. शहा हे त्याच वर्षी ऑक्टोबर महिन्यात कालवश झाले. काही काळ संस्थेमध्ये अडचणीची परिस्थिती निर्माण झालेली होती. तरीही डॉ. चित्रा नाईक, प्रा. देवदत्त दाभोलकर, प्रा. मे. पुं. रेगे आणि इतर सहकाऱ्यांनी संस्थेची ही ज्योत तेवत ठेवण्याचे तसेच अध्ययन, अध्यापन, संशोधन, प्रकाशन आणि विस्तार कार्यक्रम ही सर्व कामे जोराने चालू ठेवली. या पुढील काही परिच्छेदातून संस्थेने गेल्या दहा वर्षात केलेल्या कामाचा आढावा घेतला आहे. त्यावरुन ही गोष्ट स्पष्ट होईल.

### ३. संस्थेची ध्येयधोरणे

संस्थेच्या बोधचिन्हात दर्शविल्याप्रमाणे संस्थेचा असा विश्वास आहे की शिक्षणाचा एका बाजूने समतेशी तर दुसऱ्या बाजूने विकासाशी संबंध असतो. शैक्षणिक सुधारणेचे जे नियोजन करावयाचे त्यामध्ये समता आणि विकास या गोष्टी प्रामुख्याने लक्षात घ्यावयाच्या असे संस्थेचे धोरण आहे. आपल्या देशाच्या राज्यघटनेत नमूद केल्याप्रमाणे नवी समाजव्यवस्था निर्माण करण्यासाठी संस्थेने स्वतःला वाहून घ्यावयाचे ठरविले आहे. या रचनेमध्ये स्वातंत्र्य, न्याय, समता आणि व्यक्ती-प्रतिष्ठा यांना महत्त्वाचे स्थान दिले जाईल. संस्थेला असा विश्वास वाटतो, की शिक्षणाचे योग्य नियोजन केल्यास शिक्षणाच्या माध्यमामार्फतच अशी नवी समाज-व्यवस्था घडविता येईल. या मूलभूत गोष्टी लक्षात घेऊन संस्थेने आपल्या कार्यक्रमाची आखणी केलेली आहे.

संस्थेचे पुण्यात स्थलांतर झाल्यानंतर संस्थेची १९४८ साली तयार केलेली घटना कालबाह्य झाली असून आता संस्थेची घटनाही नव्याने करावयास पाहिजे असे संस्थेतील कार्यकर्त्यांच्या मनात आले व त्याप्रमाणे आधुनिक काळास व संस्थाविषयक नव्या संकल्पनांना अनुसरुन संस्थेची नवी घटना तयार करण्यात आली. ती जिल्हा न्यायाधिकाऱ्यांनी दि. २९-११-१९८२ रोजी मंजूर केली. संस्थेच्या या नव्या घटनेमध्ये संस्थेचे ध्येय व उद्दिष्टे खालीलप्रमाणे मांडण्यात आलेली आहेत.

अ) सर्वसाधारण शैक्षणिक संशोधन करणे, विशेषत: शिक्षण आणि समाज तसंच शिक्षण आणि विकास यांचे बाबतीत संशोधन करणे.







अनुक्रमणिका

ब) औपचारिक शिक्षण पद्धतीच्या अंतर्गत असलेल्या आणि त्या पद्धतीबाहेरील विविध शैक्षणिक प्रश्नांचे संदर्भात संशोधन आणि कृती संशोधन, विस्तार कार्यक्रम हाती घेणे आणि सामाजिक कृतीद्वारा लोकशिक्षण घडविणे.

क) शिक्षणशास्त्रातील एम. फील. आणि पीएच.डी. पदव्यांसाठी उच्चस्तरीय प्रशिक्षण कार्यक्रम चालविणे आणि या कार्यक्रमामध्ये शिक्षण सामाजिक शास्त्रांच्या दृष्टिकोनातून विचार करण्यावर भर देणे.

ड) संशोधनपर नियतकालिके चालविणे, शिक्षण-क्षेत्रात काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचे तसेच सर्वसामान्य जनतेचे ज्यायोगे उद्‌बोधन होईल असे इंग्रजी, हिंदी, मराठी आणि इतर भारतीय भाषातील ग्रंथ प्रसिद्ध करणे.

इ) शैक्षणिक आणि संबंधित प्रश्नांवर आधारित परिषदा, चर्चासत्रे, कृतिसत्रे आणि व्याख्याने आयोजित करणे.

फ) शिक्षणातील प्रयोग आणि नव्या नव्या कल्पना हाती घेणे आणि अशा प्रकारचे कार्यक्रम जे करतील त्यांना त्यामध्ये सहाय्य करणे.

ग) संस्थेची ध्येयधोरणे साध्य करण्यासाठी देशाच्या विविध भागांत अभ्यासकेंद्रे स्थापन करणे.

ह) व्यक्ती, संस्था व शासन यांना शैक्षणिक विकासासाठी मार्गदर्शन करणे व सल्लामसलत देणे.

ळ) तौलनिक शिक्षणाच्या अभ्यासासाठी आंतर-राष्ट्रीय पातळीवर वैचारिक देवाणघेवाण विकसित करणे. विशेषत: विकसनशील देशांशी या बाबतीत शैक्षणिक संशोधन कार्यामध्ये सहाय्य करणे.

ज्ञ) शिक्षण हे सामाजिक परिवर्तनाचे एक चांगले साधन होईल, ते जीवनाशी अधिक यथार्थपणे सुसंवादी होईल. लोकांच्या गरजा आणि आकांक्षा ज्यामुळे भागतील, ज्यामुळे लोकांमध्ये शास्त्रीय दृष्टी निर्माण होईल व शास्त्रीय शिक्षण वाढीस लागेल, तसेच ज्यामधून समाजातील तळागाळातील व्यक्तींना आपला उद्धार करून घेता येईल व समाजामध्ये अधिक समानता प्राप्त होईल अशा प्रकारचे शिक्षण या देशामध्ये सुरु होईल याबद्दल कार्यरत राहणे.

संस्थेच्या नव्या घटनेमध्ये संस्थेने कोणत्या दिशेने कार्य करावे याबद्दलही मार्गदर्शन केले आहे आणि त्यात सामान्यत: असे सुचविले आहे की संस्थेने आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय, राज्यपातळी आणि स्थानिक पातळी अशा सर्व पातळ्यांवर अध्ययन, अध्यापन, संशोधन, प्रकाशन आणि विस्तार कार्यक्रम ही कामे करावीत.

### ४. संस्थेची भूमिका

शिक्षणाचे नियोजन आणि व्यवस्थापन योग्य प्रकारे झाल्यास समता, सामाजिक न्याय, स्वातंत्र्य आणि व्यक्तिप्रतिष्ठा या तत्त्वांवर आधारित समाजव्यवस्था घडविण्यासाठी शिक्षण हे प्रमुख चेतक ठरेल असा संस्थेचा विश्वास आहे. या भूमिकेतून औपचारिक व अनौपचारिक शिक्षणाबाबत संस्थेमध्ये संशोधन, अध्यापन, प्रयोग, विस्तार कार्य व प्रकाशन हे उपक्रम चालू आहेत. ह्या सर्वातून परस्पर पूरक कार्यक्रम उभे करण्याची संस्थेची योजना आहे. शिक्षणाच्या औपचारिक पद्धतीत हस्तक्षेप करण्यापेक्षा अनौपचारिक शिक्षणावर लक्ष केंद्रित करणे अधिक उपकारक ठरेल असे संस्था मानते. मात्र औपचारिक पद्धतीचा व समाजातील वंचित गटांचा सुसंवाद साधण्याच्या दृष्टीने तिची पुनर्रचना व्हावी असे संस्थेला वाटते. विविध प्रकारच्या चाकोरीबाहेरील शिक्षणाची पर्यायी पद्धत आणि त्यासाठी पर्यायी साधनसामग्री यांचा शोध घेणे हे संस्थेचे एक उद्दिष्ट आहे. त्याकरिता शिक्षण व्यवसायाबाहेरील व्यक्तींचाही अध्यापनासाठी उपयोग करणे, पारंपरिक अध्यापन पद्धती व साधने ह्यांना पर्याय शोधणे, त्यांचा प्रायोगिक वापर करणे, शिक्षणपद्धती सुधारण्यासाठी अध्यापनापेक्षा अध्ययनावर अधिक भर देणारे साहित्य निर्माण करणे यासाठी संस्था सतत प्रयत्नशील राहते. अशा प्रयत्नातूनच अध्ययनप्रवण समाज निर्मिण्याचे उद्दिष्ट गाठता येईल ही संस्थेची श्रद्धा आहे. कृतिसंशोधनावर भर देऊन संस्थेचे सर्व कार्यक्रम या उद्दिष्टपूर्तीसाठी आखले जातात.

### ५) उपसंहार

या लेखात संस्थेच्या भूमिकेविषयी आणि कार्या-विषयी केलेले वर्णन शक्य तितके वस्तुनिष्ठ करण्याचा प्रयत्न केला आहे. हा लेख म्हणजे संस्थेच्या कामाचे केलेले मूल्यमापन नव्हे. कारण संस्थेमध्येच काम करणाऱ्याला अलिप्तपणे आपल्या व सहकाऱ्यांच्या कामाचे मूल्यमापन करणे तितकेसे शक्य होत नाही. ती गोष्ट इतरांनी करावयाची आहे. मात्र प्रा. जे. पी. नाईक यांनी एक प्रयोग म्हणून या






संस्थेची पुनर्बांधणी केली व सर्वांनी समानतेने व एकदिलाने काम करावे, प्रत्येकाने व्यवस्थापनामध्ये काही सहभाग घ्यावा, संस्थेच्या संशोधनात भाग घ्यावा व त्याशिवाय स्वत:चे संशोधन करावे अशी जी कल्पना मांडली होती त्या कल्पनेला खूपच यश आल्याचे दिसते. मात्र जे. पी. नाईक यांनी १९७५ मध्ये संस्थेची पुनर्बांधणी करताना उपलब्ध आर्थिक सहाय्यामध्ये किती प्राध्यापक सहभागी करून घेता येतील असे जे गणित मनामध्ये ठेवले होते ते वाढत्या महागाईमुळे अमलात येऊ शकले नाही. संस्थेला सध्या आय.सी.एस.आर. आणि महाराष्ट्र सरकारकडून जे अनुदान मिळते त्या अनुदानात क्रमाक्रमाने प्राध्यापकांची संख्या वाढत जाईल व ती १९९० च्या सुमारास १५ ते २० च्या दरम्यान राहील असा अंदाज प्रा. जे. पी. नाईक यांनी केला होता. प्राध्यापकांच्या पगारावरील खर्च व संशोधनासाठी लागणाऱ्या पगारेतर बाबींवरील खर्च प्रचंड प्रमाणात वाढल्यामुळे आता अनुदानाच्या रकमेत काही पटीने वाढ होऊनही प्राध्यापकांची संख्या तेवढ्या प्रमाणात वाढू शकलेली नाही. ही एक त्रुटी वगळता सामान्यपणे असे म्हणता येईल की गेल्या दहा वर्षांत संस्थेने शाळेत न जाणाऱ्या मुलांसाठी अनौपचारिक शिक्षण, प्रौढ शिक्षण, विभागीय अभ्यास, ग्रामीण विकासामध्ये शास्त्र आणि तंत्रज्ञानाचा उपयोग, शिक्षण, आरोग्य आणि विकास यांची सांगड अशा प्रकारचे जे उपक्रम हाती घेतले ते आजपर्यंत फार थोड्या संस्थांनी हाती घेतले आहेत. या दृष्टीने प्रा. जे. पी. नाईक यांचे सर्वांगीण विकासाबद्दलचे जे स्वप्न होते ते साकार करण्याचे दृष्टीने संस्था निश्चितपणे वाटचाल करीत आहे असे म्हणता येईल.

(शिक्षण आणि समाज, जुलै-सप्टेंबर १९८७)

☑ ☑ ☑

---

## शिक्षणक्षेत्रासाठी स्वायत्त केंद्र हवे

### प्रा० देवदत्त दाभोलकर यांची मुलाखत

(लोकसत्ता वृत्तांत : २३ जून २००७)

आजचा कळीचा प्रश्न शासनावर नियंत्रण राहू शकेल व सामाजिक न्यायाच्या दृष्टीने आजच्या जगाच्या संदर्भात आवश्यक अशी शैक्षणिक क्षेत्रात एखादी स्वतंत्र रचना कशी उभी करता येऊ शकेल याचा विचार करण्याचा आहे.

पुणे विद्यापीठात होणारे हे चर्चासत्र ज्या दिशेने काही ठोस पावले झुलविल व कार्यवाहीतही आणेल अशी माझी अपेक्षा व आशा आहे. असे स्वायत्त केंद्र उभे राहिले तर ते समाजमानसालाही योग्य दिशा दाखवू शकेल व शासनालाही योग्य धोरणांची दिशा आखण्यास तसेच त्या दिशेने वाटचाल करण्यास भाग पाडू शकेल ही माझी केवळ आशा नाही, हे माझे आजच्या स्थितीचे मूल्यमापन आहे. ढोबळ उदाहरण घ्यायचे झाले तर सुप्रिम कोर्ट आजही पावले उचलू शकेल व उचलत आहे.

निवडणूक आयोग निवडणूक घेण्याच्या पद्धतीत, रचनेत, आचारसंहितेत प्रभावी अधिकार गाजवू शकते. सर्वोच्च न्यायालय व निवडणूक आयोग या दोन्ही संघटनांना भारताचे राज्यघटनेचे पाठबळ आहे व आज शासनापुढे सरसकट न नमता आपण त्या अधिकारांचा वापर करून आपले कर्तव्य पार पाडू शकतो, हा विश्वास या दोन्ही संस्थांमध्येही आलेला आहे.

या खेरीजही ज्या दोन शक्ती राज्यघटनेचे तसे पाठबळ नसतानाही त्यांनी आपापली स्वतंत्र संघटना योग्य पद्धतीने वापरली तर भारताच्या परिवर्तनात विधायक प्रवृत्ती प्रभावी होऊ शकतात. त्यापैकी एक संघटना दृकश्राव्य माध्यम व दुसरी शिक्षक, प्राध्यापक, प्राचार्य, कुलगुरू यासारख्यांची शैक्षणिक क्षेत्रातील संघटना. माध्यमाविषयीच्या चर्चेत मी जात नाही, परंतु शिक्षणक्षेत्राच्या भूमिकेविषयी विनोबांचे एक वचन मी मानतो. ते म्हणाले होते, 'न्यायालयावर खर्च करणे ही सरकारची जबाबदारी आहे, कारण न्यायालयावर नियंत्रण ठेवणे हे सरकारच्या हाती नसावे व नसते.' तीच परिस्थिती शिक्षणक्षेत्राच्या बाबतीतही आहे.

परंतु अशी स्वायत्तता मागताना व उपभोगताना त्या स्वायत्ततेमुळे आपल्यावर येणाऱ्या नैतिक जबाबदारीची जाणीव त्या त्या घटकांनी ठेवली पाहिजे. दुर्दैवाने आज बहुतांश प्रमाणात ही परिस्थिती अस्तित्वात आहे असे दिसत नाही.

या अशा व अन्य अनुवंशिक प्रश्नांचा या विचार संमेलनात विचार होईल व काही कार्यक्रमात्मक पहिली पावले तरी टाकली जातील अशी मला आशा आहे. या आशेनेच मी या संमेलनाकडे पाहत आहे.

☑ ☑ ☑



अनुक्रमणिका

# Objectives of IIE

## From 'Statement' by D.A. Dabholkar

The Indian Institute of Education believes, as its motto indicates, that Education is closely linked with equality, on the one hand, and to development, on the other. it is these relationships that it proposes to explore and utilize in the planning of educational reform. It is committed to work for the creation of the new social order visualized in the Preamble to the Constitution and based on the basic human values of freedom, justice, equality and dignity of the individual. It also believes that education, if properly planned, can help materially in the creation of this new social order. It is around this fundamental belief that all its activities and programmes are proposed to be developed.

To achieve these objectives, the Institute proposes to develop a comprehensive programme of

- research on fundamental aspects of education as well as on educational problems at the national and state levels.
- action - research to try out significant innovations
- training for M.Phil. and Ph. D. degrees to create a new leadership with a wider perspective on education
- extension work among educational institutions, teachers, students and interested general public with a view to creating a sound and enlightened public opinion on education; and
- publications, especially in Marathi, to carry educational ideas to the masses of the people.

The institute desires to highlight and to lay special emphasis on problems of non-formal education at all stages and on the education of all underprivileged groups. The Institute would also strive tp provide a forum to enable educators at all stages of education and leaders from all walks of life to come together to discuss problems, planning and development of education.

☑ ☑ ☑

## Self Evaluation : J.P. Naik's Insistence

- Devdatta Dabholkar

J.P.Naik was a consistent advocate of critical self-evaluation by educational institutions. IIE also during my period made proposals to various educational institutions. There were few takers.

When J.P. Naik founded the Rural Institute at Gargoti by about 1955 he appointed a committee of two -my self and Prof. A.B. Shah for critical evaluation. We were given full access to all papers, institutions, staff at various levels, students and the rural people. The work was completed in fifteen days and we submitted quite a sizable report.

My statement as the Director about IIE also indicates periodical self evaluation every five years. (1980)

Now with national grading of institutions some efforts in that direction have been initiated. initially, and naturally institutions made only some cosmetic face-lifting. hopefully this will gather momentum.

☑ ☑ ☑

# THE AGENDA

## From 'Research Priorities in Education : An Agenda' developed by Meeting of Experts, 29 through 31 July, 1998 Rapporteur : Yogesh Atal, Director General of IIE

Keeping all these constraints in view, the Expert group has suggested an Agenda for promoting social science research on Education in India. It has identified (i) the needs for strengthening the social science infrastructure; (ii) the topics to be researched on a priority basis; and (iii) the strategies for the effective utilization of research findings in policy-making and planning.

**I. Interventions to Strengthen Social Science Infrastructure**

To promote social science research on education, it is necessary to train young researchers from various social science disciplines into the methodology of research - including the use of computers and statistical analysis - and to orient them to the field os social science of education. Such training will also be needed for those working in the faculties os teacher training colleges. Short-term training and orientation courses may be planned for this purpose.

There is also the need to do the stocktaking of already existing research on education relative to India - to review achievements of the past and to identify the gaps, the failures, and the neglected areas. Secondly, there is need to consolidate and systematize our theoretical gains and methodological innovations. The material generated through such an exercise will be useful for training and orientation both of the young and new researchers.

**II. Areas of Priorities for Research**

**A. General Issues for Reflection and Research**

**(i) Where Education system has failed and why?**

This will require reviewing the past policies and drawing the emergent educational profile. Based on the secondary dada and findings of previously carried out studies such research will help in analysing the factors responsible for the current state of affairs and in suggesting ways and means to alleviate the situation. Such research should also focus on the impact of linguistic policy on educational performance. The twin relationship between education and development - that is, development influencing education and education impacting on development - provides a useful theme for research. Such studies would attempt to empirically test the assumed relationship between the two variables and also to see whether education provides a solution to all kinds of developmental problems or is itself part of the problem. Of particular importance will be to examine the

अनुक्रमणिका

relationship between education and poverty, education and employment, and employment and poverty. These researches will contribute to the fulfilment of the international commitment for the eradication of poverty and promotion of social development.

**(ii) Role of Education in the inculcation of values : ethical/moral; democratic.**

This is an area both for research and reflection. The desirability of value education is a matter of choice and needs to be debated. That debate should, however, be guided by an analysis of the current content of education from the point of view of values and assess their impact on the educated. What is the value profile of the educated compared to those of the uneducated, and which group is problematic? Moreover, what costs are involved, compared to what gains, if teaching is to be heavily biased towards value inculcation? Is there compatibility between democratic values and education? (There is a view that Education creates strata and inequalities - knowledge inequalities leading to income inequalities and further to status inequalities whereas democracy is premised on equality. How the two contrasting value syndromes be accommodated in a single process?) How does education prepare a person to be a good and informed citizen? The latter question will require studies of the role of education in the process of political socialization.

**(iii) How should the task of Universalization of Primary Education be handled?**

Should primary education be the sole responsibility of the State or the present system of Public Schools (particularly English medium schools) be allowed to continue? What about the co-existence of the traditional schools (e.g. Vaidic Pathshalas and Madarasas) which cater to other specific needs and follow a different system of leaning? The phenomenon of Child labour, and promotion of education among them, needs to be carefully examined keeping in view its short-term and long-term consequences on the family and society. The question of age at which a child should enter the Primary school also deserves to be examined both in terms of its pedagogical desirability, and the carrying capacity on the school system. The consequences on the family time - budget for looking after children, in case of raising the schools entrance age, will also have to be assessed.

**(iv) Review of the current examination system and the possible alternatives** with an estimation of their economic, social and administrative costs is another area that deserves priority attention.

**(v) How to prepare the Indian Education system to respond to the processes of globalization, liberalization and privatization?**

The study of these processes need to be carried out in a futuristic perspective, identifying the impending demands on the education system, calculating the costs









involved in meeting them and suggesting the reformation of the system to handle the new demand structure.

**B. Empirical Studies : Investigating the Current Educational Scene**

**(i) The Problem of Unequal Access to Education.**

Systematic empirical studies are needed in different parts of the country to identify the causes that have denied access to education to women and girls, certain caste and tribal groups, poverty-stricken strata, and to people in remote areas. to meet the goal of Reaching the Unreached these studies are expected not only to analyse the factors but also to suggest strategies to promote access to education. Any innovations carried out by the NGOs in this area should provide good material for case studies.

**(ii) Distribution of Public Expenditure on Education.**

Who benefits from public Expenditure for Education? Who shares financial responsibility? Systematic studies are needed on source of funds for education at different levels and their implications for the quality of education. In particular, relative effectiveness of alternative methods of funding such as fees, loans, community financing, external financing vs. State financing, needs to be carefully analysed. Implications of the governmental decision to spend six per cent of GDP on Education, should also be worked out. Another area for research is the growing phenomenon of capitation fees leading to the commercialization of education, on the one hand, and denial of access to merited but poor studies, on the other.

**(iii) The Phenomenon of Surrogate Schools.**
Over the years, several private enterprises have sprung up, particularly in metropolitan towns, to prepare students for admission into professional institutions, as well as to impart training in the use of computers, business management and similar other skills. While not always satisfying the eligibility criteria, these institutions are too much in demand as is evident from the growing size of their clientele. In ways do they supplement the role of the formally recognised institutions, and how do they pose a challenge to them? Can these unplanned structures - as part of the 'informal sector' - be helped to improve their performance so that their contribution to Human Resource Development be acknowledged and better ensured?

**(iv) Mismatch between educational qualifications and occupational needs.**

Is content of education related to new opportunities and challenges in the society : at Primary level in technical subjects e.g. engineering, in other degree courses?

**(v) Burgeoning demand for higher education and System's response.**

Over the years, the demand for higher education has been rising and the system is finding it difficult to accommodate al the aspiring candidates. The severity of exami-

nations has, on the one hand, generated a good deal of wastage (in terms of high rates of failures) and, on the other, increased competition among those who pass out - the high percentage of marks required for admission by the institutions - is causing frustration among many. What happens to those who fail an examination (its impact on the family, on the personality of the student, and the institution which has to re-accommodate the repetitors), and what options are left for those who clear the examination but are unable to enter into the institution of higher learning because of limited number of seats? This is a serious problem and needs to be investigated in different states of the country so that proper policy measures can be initiated.

**(vi) Systematic case studies of educational innovations and experiments currently being conducted in the country** are needed to assess the feasibility of their replication and nation-wide adoption.

**(vii) Action research is indicated in the following areas :** (i) empowerment of local people for demanding better education services; (ii) developing effective systems at the primary level; (iii) school mapping and location of schools to increase access.

**(viii) Within the school system, researches on the following themes deserve priority attention :**

1. Selection and admission of students.
2. Teachers as role models.
3. Monitoring teaching-learning process in formal educational institutions.
4. Quality of Text Books and effectiveness of ext Book - Committees.
5. Work culture in educational institutions.
6. Relevance and content of focus of "Area Studies" in higher education.
7. Sports education.

**(ix) Other topics for Research**

1. Comparative study of primary and vocational education in India and in industrially advanced countries.
2. Researches on various facets of non-formal Education including the relationship with formal systems of learning, continuing education, and the potential for expansion - is it complementary or a replacement alternative? What costs are involved if non-formal is to replace the formal?
3. Research on Schools for Minorities (particularly Muslim schools, tribal schools).
4. Schools as private enterprises and their management.
5. Child Labour and Education.
6. Re-examination of the three language formula from the viewpoint of national needs and local socio-cultural implications; aberration in planning and implementation of three language formula, corrective measures; training needs of teaching second and third languages as distinct from first and second language teaching.

### III. Ensuring Utilization of Research Findings

To quote from OECD Report on utilization of the Social Sciences in Policy Making (1977):

The social science cannot be considered simply as instruments for administrative management; nor is their policy relevance confined to some residual area of concern to some residual area of concerns labelled 'social policy'. The social impact of social sciences is, therefore, not limited to their direct utilization by public authorities. In their attempt to describe and analyse social reality more effectively, they provide the individual with deeper insights into his community and, conversely, contribute mould the ways in which the community sees itself."

It is recognised that while the social scientists complain about the non-utilization of their research findings by the policy makers and planners, the latter generally hint at the non utilizability of these research writings because of their being written in esoteric, and so-called 'jargonated' language, or being overly algebraic in presentation. But when a research is carried out on a 'relevant' topic, and is also funded by the end-user, there are better chances of utilization of its findings.

Utilization of research is itself an area of research. It is commended that research be undertaken to find out where social science have contributed to policy-making in India, and on what fronts research finding have remain unutilised. The identification on factors that have helped of hindered the use of social science research for policy, or for public debate will be an excellent area for research.

Additionally, it is recommended that ways be found to establish dialogue between the producers of research and its consumers.

Timely publication of research reports, dissemination of their main findings in the language intelligible to the user and occasional organisation of discussion for involving social scientists, educationists, and the people from administration and public must receive priority attention so that relevant research is not only carried out by the social scientists but is also put to good societal use.

(Research Priorities in Education, An Agenda - Indian Institute of Education 1998)

☑ ☑ ☑

## Extension Services.

The Institute proposes to develop a programme of extension services fro educational institutions, teachers, and students. A beginning is being made with extension services for students of secondary schools and colleges and for primary teachers. Programmes for secondary and university teachers as well as for educational institutions are proposed to be developed latter.

(From the statement of the then Director, IIE, 1980)










# परिवर्तन शक्य आहे

## डॉ० नरेंद्र जाधव

१ जानेवारी २००७. नववर्षाचे पहिले पाऊल टाकताना नवी उमेद आणि नवे संकल्प मनामनात असतातच. पुढे पाऊल टाकायचे, तर थोडे मागे वळून पाहावेच लागेल. काळाच्या उदरात २००६ इतिहासजमा झाले. पण माणसाला आणि समाजालाही मागील पानावरून पुढे जायचे असते. म्हणून २००६ च्या पाऊलखुणांचा ताळेबंद ज्याचा त्याने आपापल्या मनात पक्का बांधला पाहिजे. नव्या वर्षाचा 'जोश' सार्थ करायचा, तर पडद्याआड गेलेल्या वर्षाचा 'होश' सांभाळला पाहिजे. त्यासाठी आत्मपरिक्षण पाहिजे. त्यातूनही उद्याच्या पावलांमध्ये दमदारपणा येऊ शकतो.

१. आज देशात चर्चेचा प्रवाह ज्या वळणांवर आहे, त्यातील ठळक बाबी अशा : आर्थिक विकासाचा दर भरभरून वाढतो आहे. उद्योग आणि सेवाक्षेत्राची घोडदौड चालू आहे. मध्यमवर्ग आणि उच्च मध्यमवर्गाची भरभराट होत आहे.

२. रोजगारनिर्मितीचा वेग देशपातळीवर मंदावलेला आहे. एकीकडे आर्थिक विकासाचा वाढता दर आणि दुसरीकडे रोजगारनिर्मिती मंदी यातून सामाजिक स्थैर्य धोक्यात येण्याची शक्यता निर्माण झाली आहे. महानगरांचा विकास होत आहे. खेडी भकास होत आहेत.

३. दहशतवाद चिंताजनक आहे. (उदा० मुंबई बॉंबस्फोट.)

४. खैरलांजीसारख्या मानवजातीला कलंक असणाऱ्या घटनांमधून समाजजीवनाला लागलेली जातीयतेची कीड आपल्या ओंगळ अस्तित्वाची विदारक जाणीव करून देत आहे. हे वास्तव भीषण आहे. त्याकडे डोळेझाक करून चालणार नाही.

महामहीम राष्ट्रपती डॉ० कलाम यांनी आपल्याला समर्थ भारताचे स्वप्न दाखविलेले आहे. २००७ या नव्या वर्षात हे संमिश्र संचित घेऊनच या स्वप्नाच्या पूर्ततेकडे आपल्याला वाटचाल करावी लागणार आहे.

आपला देश पुढच्या काही वर्षांत आर्थिक महासत्ता होणार, हा जगभर व्यक्त होत असलेला आशावाद सुखावणारा आहे, यात शंकाच नाही. या आशावादामागे सर्वात उल्लेखनीय घटक आहे तो म्हणजे आपल्या देशातील वाढत्या तरुणाईचा.

५. जगातील सर्व प्रगत देशांचा आर्थिक इतिहास स्पष्टपणे दर्शवितो, की ज्या देशांमध्ये तरुणांचे प्रमाण वाढत होते, त्यावेळी त्या देशांचा आर्थिक विकास अधिक जोमाने झाला. आजमितीला अमेरिका, युरोप किंवा जपान यांसारख्या विकसित राष्ट्रांमध्ये तरुणाईचे प्रमाण कमी होऊन वृद्धांचे प्रमाण खूप वाढते आहे. त्याउलट भारत आणि चीन या दोन मोठ्या विकसनशील देशांमध्ये तरुणाईचे एकंदर लोकसंख्येतील प्रमाण सातत्याने वाढते आहे आणि त्यामुळेच तर २१ वे शतक हे भारत आणि चीन यांचे आहे, असे आज जगभर म्हटले आहे.

६. कोठल्याही देशाच्या आयुष्यात एकदाच येतो असा उत्थापनाचा सोनेरी कालखंड आपल्या देशाला पुढील काही वर्षात प्राप्त होणार आहे. ही बाब दिलासाजनक असली तरी केवळ तरुणाईच्या वाढत्या प्रमाणामुळे आपला देश आपोआपच आर्थिक महासत्ता होईल, असे मानणेदेखील भाबडेपणाचे होईल. आज गरज आहे ती सामाजिक स्थैर्य राखून सातत्याने आर्थिक विकास घडवीत राहण्याची, समाजातील सर्व घटकांना बरोबर घेऊन जाऊन सर्वसमावेशक व संतुलित विकास साधणे ही काळाची गरज आहे. यासाठी आवश्यकता आहे ती वाढत्या तरुणाईला योग्य ते शिक्षण-प्रशिक्षण देण्याची व त्यांना समाजाभिमुख करण्याची. आपण जर हे करू शकलो नाही, तर आर्थिक महासत्ता होण्याचे आपले स्वप्न हे केवळ दिवास्वप्न ठरण्याची शक्यता नाकारता येत नाही. याचाच अर्थ पुढील काही वर्षांत आपला देश आर्थिक महासत्ता होणार किंवा काय, हे आपण शिक्षणक्षेत्रात काय करतो यावर फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून असणार आहे.

७. या पार्श्वभूमीवर शिक्षणक्षेत्राच्या सद्यःस्थितीकडे

पाहिले, तर परिस्थिती समाधानकारक आहे, असे म्हणता येणार नाही. केवळ अक्षरओळख, अशी साक्षरतेची सोपी व्याख्या केली, तर आपल्याकडे असलेले साक्षरतेचे ६६% प्रमाण हे इतर अनेक विकसनशील देशांच्या तुलनेमध्ये फारच तुटपुंजे आहे. बिहार किंवा उत्तर प्रदेशासारख्या राज्यांमध्ये आणि इतर काही मागासलेल्या भागांमध्ये, दलित स्त्रियांमध्ये साक्षरतेचे प्रमाण केवळ ३० टक्के एवढे मर्यादित आहे. महासत्ता होण्याची स्वप्ने पाहत असताना याकडे दुर्लक्ष करून कसे चालेल? या परिस्थितीचे मुख्य कारण अर्थातच सरकारी पातळीवर शिक्षणक्षेत्रामध्ये गुंतवणूक करण्यामध्ये झालेली अक्षम्य हेळसांड हेच आहे. त्यातूनच महाविद्यालयांमध्ये उच्च शिक्षण घेणाऱ्यांचे प्रमाण जे २० ते २५ टक्के असायला हवे ते केवळ १० टक्क्यांच्या आसपास आहे. कर्मवीर भाऊराव पाटील यांसारख्या समाजसुधारकांच्या भगीरथ प्रयत्नांमुळे शिक्षणाची गंगा समाजातील सर्व घटकांमध्ये पसरली असली, तरी खासगी शिक्षण इतके महागडे झालेले आहे, की त्यामुळे दुर्बल समाजघटकांना मोठ्या प्रमाणावर उच्च शिक्षणापासून वंचित राहावे लागत आहे.

८. जगात शाश्वत अशी एकमेव गोष्ट आहे ती म्हणजे बदल. Only thing constant in life, is change. आणि ही बदलाची प्रक्रिया गेल्या काही वर्षांत अत्यंत गतिमान झाली आहे आणि यानंतरच्या काळात होत राहणार आहे. सारे जग आज ज्ञानाधिष्ठित अर्थव्यवस्थेकडे (Knowledge based economy) वाटचाल करीत आहे. बौद्धिक संपदा हेच यानंतरच्या काळात कोठल्याही देशाचे बलस्थान आणि मर्मस्थान ठरणार आहे. त्या दृष्टीने बदलत्या परिस्थितीनुसार अभ्यासक्रमांमध्ये यथोचित बदल करण्याची आवश्यकता आहे. आपल्याकडे हे झालेले नाही. त्यामुळे उद्योग आणि सर्व क्षेत्रे पुढे गेलेली आहेत, तर शिक्षणक्षेत्र मात्र बऱ्याच प्रमाणात कालबाह्य होत आहे. याचाच अपरिहार्य परिणाम म्हणजे शिक्षण घेऊनसुद्धा चांगल्या नोकऱ्या मिळतातच असे नाही. त्यामुळे तरुणवर्गामध्ये विशेषत: ग्रामीण भागातील तरुणाईमध्ये एक प्रकारची कोंडी आणि त्यातून अस्वस्थता निर्माण झाली आहे.

९. आपण आर्थिक महासत्ता होण्याच्या दिशेने वाटचाल करीत असतानाच पुढील काही वर्षांत आपल्या देशात १० ते १५ जागतिक दर्जाची विद्यापीठे निर्माण व्हायला हवी. ती तशी झालेली आहेत, असा अनेकांचा भाबडा समज आहे. वस्तुस्थिती अशी आहे, की जगातील पहिल्या २०० विद्यापीठांमध्ये आपल्या देशातील केवळ आयआयटी (५२ वा क्रमांक), आयआयएम (७८ वा क्रमांक) आणि जवाहर नेहरू विद्यापीठ (१८३ वा क्रमांक) अशा तीनच शिक्षणसंस्था येतात, जगातील पहिल्या २०० विद्यापीठांत महाराष्ट्रातील एकही विद्यापीठ असू नये, ही गोष्ट आपला स्वतःबद्दलचा गोड गैरसमज दूर करून अंतर्मुख करायला लावणारी आहे. उच्च शिक्षणाची उपलब्धता वाढविण्याबरोबरच त्याची गुणवत्ता वाढविण्याची देखील नितांत आवश्यकता आहे. त्याचबरोबर उच्च शिक्षणामध्ये व्यावसायिक अभ्यासक्रम आणि संशोधन या दोन्हींची गुणवत्ता मोठ्या प्रमाणावर सुधारण्याची आता नितांत गरज आहे.

शिक्षण आणि बदलते आर्थिक वास्तव यांच्यामध्ये जी फारकत झालेली आहे, त्याचा एक अपरिहार्य परिणाम म्हणजे युवाशक्ती आणि समाज यांच्यामध्ये निर्माण झालेला आणि वाढता असलेला विसंवाद. सामाजिक बांधिलकी वगैरे शब्द वापरून इतके गुळगुळीत झालेले आहेत, की ते जवळजवळ अर्थशून्य झाल्यासारखे वाटत आहेत. 'सब चलता है' या वृत्तीने अनिष्ट अशा सामाजिक गोष्टींकडे डोळेझाक करण्याची प्रवृत्ती बळावते आहे. आपण समाजाचे काही देणे लागतो आहोत, ही संवेदनशीलता लोप पावत चाललेली आहे की काय, याची वेळोवेळी शंका यावी, अशी परिस्थिती आहे.

१०) आपल्या देशाला आर्थिक महासत्ता व्हायचे असेल आणि त्यादृष्टीने २००७ मध्ये आगेकूच करायची असेल, तर हे सर्व बदलण्याची प्रक्रिया तत्काळ सुरू केली पाहिजे. हे परिवर्तन करता येणे शक्य आहे. त्यासाठी प्रखर इच्छाशक्ती आणि संघटित प्रयत्नांची गरज आहे. काळाची पावले ओळखून परिवर्तन घडवून आणण्याची क्षमता यापूर्वी आपण सिद्ध केलेली आहे. ती पुन्हा निकराने सिद्ध करावी लागेल. ती तशी केली तरच आपण नव्या वर्षात आर्थिक महासत्ता होण्याच्या दृष्टीने एक मोठी मजल गाठू शकू. नव्या वर्षाला सामोरे जाताना हा दृढ संकल्प घरोघरी आणि मनोमनी दिसला पाहिजे.

(सौजन्य : पुरोगामी सत्यशोधक, जानेवारी ते मार्च २००७)

☑☑☑






# एक मोठी संधी दार ठोठावतीय...

## डॉ० अरुण निगवेकर

भारताच्या उच्च शिक्षणाच्या व्यवस्थेचे टीकाकार अधिक आणि प्रशंसक कमी आहेत. सर्वात लक्षणीय टीका म्हणजे आपल्या पदवीधरांकडे नोकरीसाठीची पात्रता असली तरी कौशल्ये नसतात. त्यामुळे त्यांना नोकरी मिळणे अवघड बनते. आपल्याकडे 'आयआयटी' आणि 'आयआयएम' या संस्थांच्या पदवीधरांचा साऱ्या जगात लौकिक आहे; परंतु आपल्या विद्यापीठांतील पदवीधर उर्वरीत जगाच्या खिजगणतीतही नसतील. मात्र हे चित्र आता बदलू लागले आहे. 'आयआयटी' आणि 'आयआयएम' च्या पदवीधरांनी विशेषत: परदेशात आपला ठसा उमटवला आहे हे खरे; परंतु विद्यापीठांचे पदवीधरही अगदीच टाकाऊ नाहीत. आलीकडच्या ज्ञानाधिष्ठित अर्थव्यवस्थेत तेही मोलाची भूमिका बजावीत आहेत. अमेरिकेतील उच्च दर्जाच्या ज्ञानाधिष्ठित उद्योगांमध्ये काम करणाऱ्या भारतीयांत विद्यापीठांच्या पदवीधरांचे प्रमाण ४० टक्क्यांच्या घरात आहे. मध्यम आणि कनिष्ठ प्रकारच्या कामाचा विचार केल्यास हे प्रमाण साठ टक्क्यांपर्यंत जाते. यांपैकी बहुतेक हे बी.ई. किंवा बी.टेक्. किंवा एमसीए पदवी मिळवलेले आहेत आणि नंतर त्यांनी अमेरिकेतील विद्यापीठांतून 'एमएस' ही पदवी मिळविलेली आहे. व्यावसायिक पदवीधरांनी ज्या पद्धतीचे शिक्षण घेतले त्याबद्दल उद्योग क्षेत्र काहीसे असमाधानी असले तरी त्यांना संधी देत आहे. कारण उद्योगांमध्ये सध्या तेजीचे वातावरण आहे. त्यामुळे व्यावसायिक पदवीधरांचा काही प्रश्न नाही. प्रश्न आहे तो पारंपरिक शाखांच्या पदवीधरांचा. बदलत्या आर्थिक स्थितीत सामावून जाणे या पदवीधरांना अद्याप जमलेले नाही. या पदवीधरांची संख्याही मोठी आहे. आज देशात सुमारे १ कोटी विद्यार्थी महाविद्यालयीन शिक्षण घेतात. त्यापैकी ८४ टक्के विद्यार्थी कला, वाणिज्य, विज्ञान आदी पारंपरिक शाखांचे आहेत. याची कारणेही स्वाभाविक आहेत. एक तर या शाखांना सहज प्रवेश मिळतो, त्यांचे शुल्कही परवडण्यासारखे असते आणि या शाखांची महाविद्यालये सर्वत्र आहेत. व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या मोठ्या प्रमाणावरील खासगीकरणामुळे आणि तेथील शुल्क आवाक्याबाहेर जात असल्याने हे प्रमाण असेच राहणार, असे दिसते. त्यामुळे या पारंपरिक शाखांच्या पदवीधरांचा 'ॲसेट' म्हणून उपयोग होईल यावर तातडीने भर देण्याची गरज आहे. तसे झाले तरच हे पदवीधरही ज्ञानाधिष्ठित अर्थकारणाचे भाग बनतील.

आर्थिक आघाडीवर भारताची सध्या घोडदौड चालू आहे. माहिती तंत्रज्ञान (आयटी) आणि सॉफ्टवेअर क्षेत्रातील आपल्या यशाची जोड त्याला मिळालेली आहे. माहिती तंत्रज्ञानावर आधारलेल्या सेवांना (आयटीईएस) सध्या मोठी मागणी आहे. त्यामुळे अशा सेवा उद्योगांची; तसेच 'कॉल सेंटर' सारख्या क्षेत्राची भरभराट होत आहे. 'बिझनेस प्रोसेस आऊटसोर्सिंग' (बीपीओ) क्षेत्रात आज सुमारे सात लाख भारतीय तरुण काम करीत असल्याचा अंदाज आहे. या क्षेत्राद्वारे भारताच्या अर्थव्यवस्थेत सतरा अब्ज डॉलर्सची भर पडत असल्याचाही अंदाज आहे. सुरुवातीच्या काळात 'बीपीओ' क्षेत्राची कामे ही काहीशा हलक्या स्वरूपाची होती. मुख्य कार्यालयासाठीची पूरक कामे म्हणजे विमानासाठीचे आरक्षण, ग्राहकांचे बिल तयार करणे, तांत्रिक समस्या सोडविणे आदी कामे केली जात होती. मात्र आता आरोग्य आणि रुग्णालये यांसाठीच्या सेवा, बहुराष्ट्रीय कंपन्यांसाठी सल्ला सेवा, विमा कंपन्यांसाठीची कामे, शेअर बाजारातील गुंतवणुकीसाठीची सल्लासेवा आदी सेवा क्षेत्राची कामे 'बीपीओ' द्वारे होऊ लागली आहेत. औषधनिर्माण कंपन्यांच्या कामाचीही भर त्यात पडू शकते. अशा रीतीने मुख्य कार्यालयाला पूरक कामे करण्यापासून सेवा क्षेत्राची कामे करण्यापर्यंतचा बदल घडला आहे, घडत आहे. या कामासाठी अधिक ज्ञान आणि कौशल्ये असण्याची गरज आहे. ही कामे करण्यासाठी दर्जेदार आणि कौशल्यपूर्ण मनुष्यबळ देऊ शकणारा देश म्हणून जगातील उद्योग भारताकडे पाहत आहेत. तंत्रज्ञानातील प्रगतीमुळे भारताच्या संधी आणखी वाढणार आहेत. इंटरनेट साठी आवश्यक असणारे फायबर ऑप्टिकचे जाळे, जगभर संवाद साधता येईल अशा प्रकारची 'बॅण्डविड्थ'






आणि कौशल्ये असलेले ज्ञानकर्मी यांच्या जोरावर ही संधी आपण साधू शकतो आणि आर्थिक प्रगतीला आणखी चालना देऊ शकतो. त्यामुळे पारंपरिक शाखांच्या पदवीधरांनाही मोठ्या प्रमाणावर रोजगाराची संधी उपलब्ध होऊ शकेल. 'आयटी' आणि 'बीपीओ' क्षेत्रांमधील जागतिक बाजारपेठेतील आपला वाटा टिकवायचा असेल, तर २०१० पर्यंत भारताला या क्षेत्रांसाठी २३ लाख मनुष्यबळाची गरज भासणार आहे. देशांतर्गत 'रीटेल' आणि 'बीपीओ' क्षेत्रासाठी येत्या तीन वर्षांत अनुक्रमे ३२ लाख आणि १५ लाख रोजगार निर्माण होणार आहेत.

'आयटी' आणि 'बीपीओ' क्षेत्रासाठी 'नॅसकॉम' आणि 'मॅकेन्झी' यांनी २००५ मध्ये एक पाहणी केली. त्यानुसार केवळ २५ टक्के तंत्रज्ञानविषयक पदवीधर आणि १० ते १५ टक्के सर्वसाधारण पदवीधरंच या क्षेत्रांतील परदेशांमधील रोजगारांसाठी योग्य आहेत. 'बीपीओ' क्षेत्रातील कामासाठी दोन प्रकारच्या कौशल्यांची गरज असल्याचे 'नॅसकॉम'ने नमूद केले आहे. ती म्हणजे - एक, इंग्रजी भाषेची कौशल्ये (भाषेवरील प्रभुत्व, ऐकून घेण्याची क्षमता, वाचन, भाषेविषयक ज्ञान आणि बोलण्याची क्षमता आदी). दोन, आकलनविषयक प्राथमिक कौशल्ये (संख्याविषयक ज्ञान, विश्लेषणाची क्षमता, एकाग्रता, अचूकता, संगणकाच्या की-बोर्डाचे ज्ञान आदी). विद्यार्थ्यांमध्ये ही दोन्ही कौशल्ये विकसित होतील अशा प्रकारचे प्रमाणपत्र अभ्यासक्रम महाविद्यालये सहजपणे सुरू करू शकतात. 'आयटीईएस' आणि 'बीपीओ' या क्षेत्रांसाठी पात्र असलेल्या उमेदवारांच्या कौशल्यांची चाचणी करण्यासाठी 'नॅसकॉम' तर्फे लवकरच मूल्यांकन करण्याची आणि प्रमाणपत्र देण्याची प्रक्रिया सुरू होणार आहे. अशा प्रकारचे प्रशिक्षित उमेदवार संबंधित उद्योगांकडून लगेचच घेतले जाऊ शकतील.

'नॉलेज प्रोसेस आऊटसोर्सिंग' (केपीओ) आणि संबंधित सेवा उद्योगांचीही सध्या भरभराट होत आहे. एका पाहणीच्या अंदाजानुसार, २०१० मध्ये ती १७ अब्ज डॉलर्सपर्यंत वाढेल, असाही अंदाज आहे. या क्षेत्राच्या वाढीमुळे भारताला रोजगार आणि संपत्ती निर्मिती या दोहोंसाठी मोठी संधी निर्माण झाली आहे. २०१० पर्यंत अडीच लाख नवीन रोजगार या क्षेत्रात निर्माण होण्याची शक्यता आहे. सेवा उद्योगाच्या क्षेत्राचाही अशाच प्रकारे विस्तार होत आहे. आरोग्य, वाहतूक, संज्ञापन, बँकींग, विमा, करमणूक, पर्यटन... आदी अनेक सेवांचा त्यात समावेश करता येईल. या सर्व सेवांच्या उद्योगाची व्याप्ती वाढत आहे आणि योग्य कौशल्ये असलेल्या पदवीधरांची गरज आहे. कला, वाणिज्य, विज्ञान या पारंपरिक शाखांच्या पदवीधरांना येथे मोठी संधी आहे. संबंधित कौशल्ये प्राप्त करण्यासाठी पदवीचे शिक्षण घेत असतानाच प्रमाणपत्र अभ्यासक्रम ते करू शकतात. म्हणजे तीन वर्षांचा पदवी अभ्यासक्रम पूर्ण करताना एखादा विद्यार्थी तीन कौशल्यविषयक अभ्यासक्रमही पूर्ण करू शकेल. या विद्यार्थ्यांना चांगला रोजगारही मिळू शकेल किंवा ते स्वत: उद्योजक होऊ शकतील. कौशल्य शिक्षणासाठी महाविद्यालयांनी असे अभ्यासक्रम सुरू करायला हवेत. असे झाल्यास महाविद्यालयांमधून खऱ्या अर्थाने ज्ञानकर्मी बाहेर पडू लागतील. पारंपरिक शाखांच्या पदवीधरांना रोजगार देऊ शकणारी एक मोठी संधी आपले दार ठोठावत आहे. तिचा लाभ आपल्या शिक्षणव्यवस्थेने उठविला पाहिजे. काळाची गरज ओळखून पदवी अभ्यासक्रमांना कौशल्ये विकसित करू शकणाऱ्या शिक्षणाची जोड दिली पाहिजे. विद्यापीठ अनुदान आयोगाने दहाव्या योजनेत यासाठीचे प्रयत्न सुरू केले होते. अकराव्या योजनेत त्यांना अधिक गती मिळायला हवी.

(सौजन्य : सकाळ, २१ जून २००७)

☑ ☑ ☑

## E-education is next boom business

- Indian education sector second biggest in the world after China
- Affluent middleclass, internet expansion driving e-learning
- Computer penetration estimated at 15 million - plus, 5 mn. internet connections
- Govt. wants to increase this to 75 mn. computers by 2010 and 45 mn. connections by 2010
- By early 2007, there were over 2 mn. broadband subscribers in India
- India has 224 mn. students (school to university)
- 1.18 mn schools, 17600 colleges, 338 universities
- Educational market size estimated at over Rs. 1.5 lakh crore

# Perspectives in Education

**The Decline in the Quality of Research in Education in India**

That there has been a decline in the publication of scientific papers by the Indian researchers in the international journals is no more a news, how much disturbing it may be to the concerned academia. Hardly any academics are bothered to ascertain the status of the papers published by the Indian social scientists internationally. We are sure, our readers would wonder as to why we have chosen to reflect upon educational research when few in India are worried about the state of affairs in the echelon of superior disciplines. The answer is short, direct and unambiguous; because, as the famous Indian adage says, 'I am a frog who has been living in the well (pond) of a discipline that I believe as the universe.'

There is another reason also. This year, PIE completes २१ years of existence. It is no mean achievement for a journal, which has been for some years sustaining itself solely upon the support of its subscribers, a true example of economic liberlisation; mind you, that to without any advertisement. Our founder-editor, M.B. Buch along with the two joint Editors - R. Govinda and S.B. Menon, launched this academic endeavour in १९८५. In १९९६, the team requested me to shoulder the editorial responsibility, which I did and am still continuing. such ventures need periodical self-appraisal. In the year २०००, we made an interim review in my editorial *looking before and after...* (Vol. १६, No. ४), with a view to clarifying some policy issues and hurdles faced by us for the benefit and co-operation of contributors. following were the points discussed in that review : *Policy Issues-Acknowledgement, Acceptance / Rejection / Modification and Substance.* Unfortunately, contributors do not study our important *Note for Contributors* carried in every issue and, therefore, we reiterate that they should see this issue for improving their papers. This editorial is continuation and furtherance in the same direction.

- Editorial
Perspectives in Education
January २००७



A Critical Response to the January '०७ Editorial (The Decline in the Quality of Research in Education in India)

During the last couple of weeks I have been immersed in preparing my presentation for the Univ of Missouri qualitative research conference. The title is awesome, The Complexities of Social Injustice in a Democratic Society : The Story of Hannah

Cullwick, a Maid of All Work in १९th Century England. The presentation wasn't so bad either.

Actually all this is a prelude for a few comments on your editorial as they illustrate and answer most of your scathing critique and indictment of Indian doctoral research in professional education.

If you have reviewed some ११०० submissions in the last ११ years that's like १०० a year. And if this last issue of PIE is at all typical you have published five articles which suggests you are accepting approximately one in four. I am surprised that very few have responded to your editorial remarks and re-submitted. Do they go elsewhere? Or is publication less important for their lives and careers?

I don't know of any recent accounts of publication rates of PhD's in education but some older data on psych PhD's in America is that the average number of publications is less than one. Similarly, I would guess that most journals tend to publish mostly people from the home country. A few journals that I know something about, QSE, and Educational Action Research work hard at soliciting international authors.

The literature reviews is an issue in contention among some American departments of education. As I read dissertations and also many published studies the lit review often seems like a required exercise but it doesn't really advance the argument of the dissertation or the published article.

The clearest analysis of this I found some years ago was a little book by Hans Zetterberg, *On theory and verification in sociology.* It's in at least three editions; I think the second is the one I liked the best. That helped us immensely in our work in *Complexities.*

Zetterberg also deals extensively with conceptual and operational definitions and hypotheses.

Writing well is one helluval problem!!

- An e-mail from Lou Smith the Emeritus Professor,

Washington University, St. Louis, Mo. USA.

(Perspectives in Education, April २००७, Back cover)

☑ ☑ ☑

## Qualitative and Quantative Educational Research

During the last two years, since Louis Smith and I revived our professional contacthave been publishing his thought - provoking on qualitative analysis, emphasizing along and sidnificant American appeoach to using it in studying an educational phenomenon. In spite of my strong bias for quantitative analysis I have been trying to grasp the substance of his arguments.

(From the backcover of Perspectives in Education, January 2007)






एकविसाव्या शतकातील नवयुवक-युवतींसाठी

# महाविद्यालयीन जीवनाचा आशय : आजचे संदर्भ

देवदत्त दाभोलकर

अवसर आणि आव्हाने यांनी तुडुंबलेला हा काळ आहे. - बाबा आमटे

बाबा आमटे यांच्याही पुढे जाऊन म्हणावयाचे तर अवसर आणि आव्हाने यांनी तुडुंबलेलाच नव्हे तर वेगात ओसंडून वाहणारा हा काळ आहे.

पण आव्हान तेच आहे. परिस्थितीला हिमतीने व कार्यक्षमतेने आव्हानांना सामोरे जाण्याचे. 'देवा. आता खूप झाले, आता संकट माझ्यासमोर आणू नये' अशी काकुळतीने प्रार्थना करणारा तो वृद्ध; 'संकट न आणशील तर बरे, परंतु आव्हान आणलेच तर त्याचा मुकाबला करण्याचे सामर्थ्य मला दे' असे म्हणणारा तो मध्यमवयीन आणि 'कितीही संकटे खुशाल आण, वाघाच्या गुहेत प्रवेश करून त्याला जेरबंद करण्याची माझी महत्त्वाकांक्षा आहे' असे सांगणारा तो तरुण.

यातील आपला गट आपल्या वयावर अवलंबून नसतो, तो आपल्या वृत्तीवर अवलंबून असतो. जवाहरलाल, चर्चिल, शॉ, सावरकर, गांधीजी, विनोबा हे चिरयुवा वर्गातले. तरुण वयात म्हातारे झालेलेही लोक सर्वत्र आढळतात.

अगदीच आढळले नाहीत तर आरशात पाहूनही कदाचित तुम्हाला उदाहरण सापडू शकेल. परंतु बहुसंख्य युवावर्ग असा शरणागत प्रवृत्तीचा नसतो ही मानवतेच्या व आपल्या राष्ट्राच्या दृष्टीनेही भाग्याची गोष्ट आहे. कोणाच्याही कोणत्याही क्षेत्रातील पराक्रमाने संमोहित होणे हे मुसमुसत्या तारुण्याचेच लक्षण असते. कदाचित् आपणही असे काही करावे अशी सुप्त प्रेरणा या आकर्षणाच्या मागे असते. 'तव आंतर अग्नी क्षणभर तरी फुलवावा' हे काम इतरांच्या दैदिप्यमान यशाच्या 'समिधा' करीत असतात. ती ज्योत क्षणात न विझता सतत तेवत राहील अशी दक्षता, प्रतिकूल परिस्थितीतही ज्याची त्याला घ्यावी लागते. युवकांना व सर्वांनाही सनातन हाच संदेश आहे. गीता सांगते,

उद्धरावे तुला तूच आत्मनाश करू नये
तुझा तूच खरा मित्र, तुझा शत्रूही तूच रे.

☑ ☑

तीन तपापूर्वी याच स्वरूपाचा लेख लिहिताना मी प्रारंभ असा केला होता :

महाविद्यालयीन जीवन आहे तरी काय?

नंदनवनाच्या अलीकडे केवळ सात पावले असलेली स्वप्नभूमी?

मृगजळापाठीमागे धावावयास लावणारी मरुभूमी?

ज्ञान आणि कर्म यांचा समन्वय करण्याचा प्रयत्न करणारी कर्मभूमी?

की हे सर्व आणि अन्यही आहे?

या अशा प्रश्नांचा ज्या ज्या वेळी मी विचार करतो, त्या त्या वेळी मला माझे स्वतःचे विद्यार्थी म्हणून व्यतीत केलेले महाविद्यालयीन जीवन आठवते. त्यानंतरही जवळजवळ चार दशकांच्या दीर्घ कालावधीत प्रत्यही महाविद्यालयात, विद्यापीठात ये-जा करीत असताना, कार्य करीत असताना, जे जे अनुभवास आले तेही सर्व आठवते.

नेमके एक उत्तर अचूकपणे देता यावे असा हा प्रश्न नाही. या प्रश्नातून निर्माण होणाऱ्या उपप्रश्नांनादेखील नेमकी उत्तरे शोधण्याचा प्रयत्न करणे फलदायी होणार नाही. परंतु या प्रश्नांच्या कक्षा, सविस्तर, नीटपणे समजावून घेणे यातदेखील या प्रश्नाच्या काही संभाव्य उत्तरांची सूचना मिळू शकते. या लेखाचा मुख्यत्वेकरून हाच हेतू आहे.

१९३६ साली मी महाविद्यालयात विद्यार्थी म्हणून प्रवेश केला. महाविद्यालयात प्रवेश करण्याविषयीची उत्कंठा त्याआधी दोन-तीन वर्षे तरी जागृत झाली होती. महाविद्यालयीन वातावरणात, वसतिगृहातील उत्साही व काहीशा उच्छृंखल अशा जीवनात, चार वर्षे कशी गेली हेच कळले नाही. १९४० मध्ये बी.ए. ची परीक्षा दिल्यानंतर मी एम. ए. चाही अभ्यास केला; परंतु त्या पदव्युत्तर शिक्षणाचा कालावधी, महाविद्यालयीन जीवन असे ज्याला म्हणता येईल असा कालखंड वाटला नाही. जीवनातील या कालखंडा विषयीच्या भावनात्मक प्रतिक्रियेत आजच्या विद्यार्थ्यांच्या बाबतीतही काही वेगळेपणा आढळेल असे मला वाटत नाही.

अनुक्रमणिका






त्यानंतरही आता दोन तपांपेक्षा अधिक काळ उलटला आहे. मी शिक्षणसंस्थांच्या भिंतीतून बाहेर पडलो, परंतु या वयोगटातील अनेकांशी विविध कारणांनी माझा जवळून संबंध येत गेला. त्यामुळे १९३६ मध्ये विद्यार्थी म्हणून मुंबईच्या एलफिस्टन कॉलेजात प्रवेश केला तेव्हापासून आजतागायत सात दशके मी या 'माहोल'मध्ये समरस राहत आलो आहे.

परंतु तरीही आजचा कालखंड वेगळा आहे. 'त्या कालखंडात जिवंत असणे हेच एक अहोभाग्य होते. तरुण असणे म्हणजे तर नंदनवन. (Bliss it was to be that to be alive but to be young was very heaven) असे एका इंग्लिश कवीने फ्रेंच राज्यक्रांतीच्या कालखंडाला उद्देशून म्हटले होते. आज तर अशा अनेकविध क्रांत्या आपल्याला एकाच वेळी अनुभवावयास येत आहेत. आर्थिक क्षेत्रात, विज्ञानाच्या क्षेत्रात, माहिती तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात सगळीकडे संथपणे विचार करणाऱ्या लोकांना, विचारवंतांना चक्रावून टाकणारे हे बदल आहेत. आणि तेही कालची गोष्ट आज कालबाह्य व्हावी या गतीने घडत आहेत. या सर्व परिवर्तनांचा एकत्रित परिणाम आजच्या नवयुवकांना त्यांच्या आयुष्यात अनुभवावा लागणार आहे. यात ते स्वत: काही बदल करु शकतील अशी आज परिस्थिती नाही. विद्यार्थ्यांनी सुजाणपणे जागृत व्हावे आणि विधायक वृत्तीने संघटित होणे हा यावर एकमेव मार्ग आहे. परंतु दुर्दैवाने उगवत्या पिढीला हे सांगण्याचा अधिकार या पद्धतीने आपल्या विद्यार्थी जीवनात व त्यानंतरही सुजाण पालक म्हणून शिक्षणव्यवस्थेचे विषयी काहीही आस्था न बाळगणाऱ्या जुन्या पिढीने कधीच गमावलेला आहे. किंबहुना तो मिळविण्यासाठी व त्यांनी कधी प्रयत्नही केला नाही.

परिस्थिती अतिशय बिकट आहे. परंतु मी अखंड आशावादी आहे. निराशावादी कधीही नव्हतो व आजही नाही. हा आशावाद मूर्खपणाचा असे सांगणारे अनेक वृद्ध गृहस्थ मला भेटतात. मी त्यांना सांगतो 'आशावाद हा माझा Terminal illness आहे.' जे. पी. नाईक अशा वृद्धांना सांगत, 'Let me have my opium please.' त्यांच्या कॅन्सरच्या दुखण्यात एका परदेशी मित्राने त्यांना ज्यूलियन हक्सलेने अशा अवस्थेत लिहिलेली एक कविता पाठविली होती. खेळकर वृत्तीने लिहिलेल्या त्या कवितेचे शीर्षक 'It's fun to have cancer' असे होते. जे. पी. नाईकांनी मला तो कागद भेट म्हणून दिला. या भेटीचा प्रभाव माझ्या मनावर निरंतर राहिला.

☑ ☑

असो. महाविद्यालयीन किशोरवयाच्या शेवटच्या टप्प्यात व युवावृत्तीच्या प्रारंभिक पदार्पण करणाऱ्या या वयोमानात मनोविश्व झपाट्याने बदलत असते. विस्तारत असते, अधिकाधिक सखोल होत असते व काहीतरी करून दाखवावे या भावनेने भारलेले असते. 'That uncertain age' किंवा मंतरलेले अनोखे दिवस असेही या कालखंडाचे वर्णन करता येईल. उमलत्या प्रणयभावनेचीही दाट छाया या कालखंडावर असते. अननुभूत लहरी अनेकदा रोमांचित करीत असतात. 'सोळावं वरीस धोक्याचं' हे केवळ मुलींच्या बाबतच खरे आहे असे नाही. मुलांच्यापेक्षाही अधिक धोक्याचे आहे इतकेच. या दशकात तर एडसच्या प्रसारामुळे दोघांनाही समप्रमाणात हा धोका आहे. सुजाण पालकांच्या हे लक्षात आले आहे. शिक्षणव्यवस्थाही याचे भान सर्वांना कसे आणून देता येईल या विवंचनेत आहे. ही विवंचना दूर करण्याचे खरे तर सोपे मार्गही आता उपलब्ध आहेत. परंतु याविषयी 'ब्र'देखील काढणे समाजमानसाला रुचत नाही. त्यांना ती जाणीव करून देणे ही देखील शिक्षणक्षेत्राचीच जबाबदारी आहे. परंतु परंपरावाद केवळ समाजालाच ग्रासून आहे असे नाही. तो शिक्षणक्षेत्रातही तसा भक्कम आहे. यातून व यासारख्या अन्य गोष्टीतून बाहेर पडणे म्हणजेच शिक्षण आणि समाजपरिवर्तन आहे. (ज्याला मी Initiative 'ASSET' असे नाव दिले आहे : Action for Simultaneous Social and Educational Transformation.)

☑ ☑

भावना, विचार, कृतिप्रवणता या तिहीचे प्रश्न वाटतात तितके सरळ सोपे नाहीत. चांगलेच गुंतागुंतीचे आहेत.

मला या ठिकाणी भाटघर आचारसंहिता या विषयावर १९६१ साली भाटघर येथे झालेल्या एका कृति-विचार सत्रातील संवाद-विसंवादाची आठवण येते. चर्चेला राजकीय नेते व शिक्षणक्षेत्रातील अन्य विचारवंतही होते. धनंजयराव गाडगीळ अध्यक्षस्थानी होते. यशवंतराव चव्हाण त्यावेळी महाराष्ट्राचे मुख्यमंत्री होते. ते दुसऱ्या दिवशी

उपस्थित होते. राजकीय क्षेत्रांतील महाराष्ट्रात व भारतात सर्वमान्य राजकीय नेते होते. शंकरराव देव. श्री. अ. डांगे, मधु लिमये, बी. सी. कांबळे आदि मंडळी होती. त्याचप्रमाणे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, दि. के. बेडेकर, प्रा. अ. भि. शहा, श्री. स्वामी रामानंद तीर्थ , श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. शंकरराव मोरे, श्री. एस्. एस्. जोशी, श्री. राम जोशी, श्री. दत्ता ताम्हणे, श्री. श्रीनिवास सरदेसाई, श्री. ए. बी. वर्धन, श्री. शंकरराव खरात, श्री. उत्तमराव पाटील, प्रा. र. वि. रानडे, गं. बा. सरदार, डॉ. म. अ. चान्सरकर, डॉ. ना. र. देशपांडे, प्रा. व. मं. सिरसीकर, प्रा. अ. के. भागवत, डॉ. के. एम्. मुखर्जी, श्री. पन्नालाल सुराणा, श्री. ना. ग. गोरे, उद्धवराव पाटील, श्री. दादासाहेब गायकवाड, श्री. ए. जी. पवार, श्री. राजाभाऊ खोब्रागडे, श्री. गोपाळराव खेडकर, श्री. वि. घ. देशपांडे, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. अनंतराव भालेराव, राजारामबापू पाटील, प्रा. गोवर्धन पारीख आदि मंडळी होती. त्यात मीही होतो. भाटघर धरणाजवळील सुसज्ज अतिथीनिवासात ही बैठक झाली. राजकीय पक्षांसाठी सर्वानुमते एक आचारसंहिता तयार झाली. आज ती कोणाच्या स्मरणात नाही. But that is another story.

या लेखापुरता महत्त्वाचा भाग म्हणजे पहिल्या दिवशी 'विद्यार्थ्यांना पक्षीय राजकारणात ओढू नये' असा प्रस्ताव जवळजवळ सर्वमान्य झाला होता. दुसऱ्या दिवशी यशवंतराव आल्यानंतर मधु लिमयेंनी हा विषय पुन्हा उपस्थित केला व यशवंतरावांना याविषयी त्यांचे मत विचारले. यशवंतराव म्हणाले, 'मला मधूचे म्हणणे मान्य आहे.' आणि काहीशा विनोदाने ते पुढे म्हणाले : मी त्यावेळी चळवळीत गेलो नसतो तर आज मुख्यमंत्री झालो नसतो. त्या प्रस्तावाचा असा निकाल लागला.

हे सारे प्रश्न कसे गुंतागुंतीचे आहेत हे या उदाहरणावरून स्पष्ट आहे. कुलगुरू म्हणून माझी नियुक्ती झाल्यानंतर अनेक मान्यवर मला म्हणाले :

Have you been properly installed?

मी विचारले, 'How do you mean?'

ते म्हणाले, 'We do not consider a Vice-Chancellor properly installed until he gherao'ed.'

तो माझा युक्त आणि प्रतिष्ठापना कार्यक्रम तोपर्यंत झाला नव्हता. नंतर यथाकाल झाला, अनेकदा झाला. आणीबाणीच्या काळात मला ती उसंत मिळाली (याचे तसे मला वाटले पण मनातून दुःखही झाले.)

स्वहस्ताक्षरात इंदिराजींना मी पत्र लिहिले, 'Campuses शांत आहेत परंतु युवावर्ग तुमच्याशी सहमत आहे असे तुम्हाला वाटत असेल तर तो तुमचा भ्रम आहे.'

इंदिराजींनी काहीही उत्तर मला पाठवले नाही. नंतर काही दिवसांनी मी दिल्लीला एका चर्चासत्रासाठी गेलो होतो. भोजनाच्या वेळी एका निवृत्त जनरलने मला बाजूला घेतले आणि सांगितले, 'The Prime Minister showed me your letter.' मी विचारले : त्या काय म्हणाल्या?' ते म्हणाले, 'She said, 'Look here, this is a very bad show.' युवावर्गाकडे लक्ष द्यावयाचे काम इंदिराजींनी सोपवले असावे. ते म्हणाले, 'My opinion is the same as yours.'

युवावर्गाने सर्व विचारप्रणालींचा नीट अभ्यास करावा आणि तत्कालीन भावनेच्या आहारी जाऊन अवास्तव कृती करू नये असे माझे निरंतर राहिले आहे. परंतु तारुण्याच्या उद्रेकात त्यांना याचे भान राहत नाही आणि त्यांना भडकावून आपली पोळी भाजून घेण्याचे कौशल्य म्हणजेच राजकीय नेतृत्व अशी हितसंबंधी (हित स्वतःचे, विद्यार्थ्यांचे नव्हे) गटांची पक्की धारणा व कार्यपद्धती असते. या सर्वातून विद्यार्थ्यांना वाचवावयाचे तर अशी निदान शिक्षकांची, प्राध्यापकांची, संस्थाचालकांची स्वतःची तशी वृत्ती असली पाहिजे.

'This is asking for the moon' परंतु रामाचा चंद्राकरता हट्ट हा माझा आदर्श आहे.

असो उदाहरण म्हणून एवढे पुरे.

☑ ☑

प्रिय नवयुवक युवतींनो,

शिक्षक, प्राध्यापक, संस्थाचालक प्रतिकूल असले तरी त्यांच्यावर दोष ढकलून मोकळे होण्याचा प्रयत्न केलात तर त्यांत इतरांचे हित असेल परंतु तुम्ही अन्य मार्ग असताना संधी हातची गमावली असा पश्चात्ताप नंतर करण्याची पाळी तुमच्यावर येईल.

त्या तपशीलाकडे वळण्यापूर्वी माझ्या पूर्वीच्या लेखातील शेवटच्या भागातून काही ओळी उद्धृत करतो.

त्या अशा आहेत.







आपल्या महाविद्यालयीन जीवनात अनेक उणिवा आहेत याची खंत अवश्य हवी. परंतु मनाला नाउमेद करून निष्क्रियता आणणारी अशी ती खंत असता कामा नये. महाविद्यालयीन शिक्षणाच्या क्षेत्रात अगदी आदर्श अशी परिस्थिती जगात कोणत्याही कालखंडात, कोणत्याही राष्ट्रात, कधीही अस्तित्वात नव्हती. आजची भांडवलशाही किंवा साम्यवादी अग्रेसर राष्ट्रेही याला अपवाद नाहीत. जीवनाच्या या कालखंडात तात्त्विक ज्ञान मिळाले पाहिजे. तंत्रकौशल्य वाढले पाहिजे, सामाजिक बांधिलकी अंगी बाणली पाहिजे. स्वतंत्रपणे विचार करण्याची शक्ती व निर्भयता यांची जोपासना झाली पाहिजे. यासारख्या कसोट्या जर आपण लावल्या व या शिक्षणाची संधी समाजात सर्व घटकांना समानतेने पोचली पाहिजे हा आग्रहही धरला तर या सर्व कसोट्यांवर पूर्णपणे उतरणारे एकही राष्ट्र आज भूतलावर नाही याचे आश्चर्य वाटावयास नको. महाविद्यालयीन शिक्षणाचे आदर्शही नेहमी तसेच राहिले आहेत असे नाही. ऑक्सफर्ड, केंब्रिज, हारवर्ड या अनेक शतकांचे अस्तित्व असणाऱ्या व सर्वेत्तम म्हणून दीर्घकाळ गाजलेल्या विश्वविद्यालयांचा आदर्श, विद्यार्थ्याला नेमके माहितीच्या स्वरूपाचे ज्ञान देण्यापेक्षा ज्ञानग्रहणाची शक्ती देण्याकडे होता. विद्यार्थी पुढे ज्या क्षेत्रात उतरेल त्या क्षेत्रातील ज्ञान सहज मिळविण्याची कुवत त्याला देणे हाच या शिक्षणाचा मुख्य हेतू असे. आज शास्त्र व तंत्रज्ञान इतके विकसित झाले आहे की काही नेमके तंत्रज्ञान विद्यार्थ्यापर्यंत अचूकपणे पोचवणे ही एक आवश्यक गोष्ट होऊन बसली आहे. एखाद्या शास्त्राच्या उपशाखेच्याही उपशाखेचा सूक्ष्म अभ्यास करत असताना त्या मूळ शास्त्राचे किंबहुना त्या शास्त्राच्या इतर सर्व शास्त्रांशी असणाऱ्या अनुबंधाचे अवधान कसे राखावे हे विद्यार्थ्याला शिकविणे हा उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात परदेशातही अगदी अलीकडच्या काळात निर्माण झालेला प्रवाह आहे.

असे बदल हे नेहमी होतच राहणार. परंतु प्रत्येक युवकाच्या अंगभूत गुणांचा विकास करणे व हा गुणविकास राष्ट्रविकासासाठी कारणी लागेल अशी रचना ठेवणे, या मुख्य सूत्राला या व अशा इतर बदलांनी बाधा येण्याचे कारण नाही.

हे जसे खरे आहे त्याचप्रमाणे परिस्थिती कितीही प्रतिकूल असली तरी उपक्रमशील प्राध्यापकांना व उत्साही विद्यार्थ्यांना त्यांच्या स्वयंप्रेरणेने करता येण्यासारख्या अनेक गोष्टी आहेत हेही खरे आहे. अंधाराला दोष देत आपल्या जागी कुढत बसण्यापेक्षा आपला छोटा का होईना दीप प्रज्वलित केला तर ते स्वतःलाही आश्वासक आहे व त्यातूनच पुढे काही मार्ग सापडणेही शक्य आहे. असे धडपडणारे प्राध्यापक व विद्यार्थी आजही अनेक ठिकाणी आहेत हे आजच्या परिस्थितीत मनाला दिलासा देणारे एक खरे आश्वासन आहे.

पूर्वसैबेरियात पदवी शिक्षणाच्या प्रथम वर्षात असणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वर्गात मी गेलो होतो.

चर्चेच्या शेवटी त्या मुलांनी मला विचारले, 'तुमच्याकडील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचा जीवनक्रम कसा असतो?'

'जगातील कोणत्याही विद्यार्थ्यांप्रमाणेच त्यांनाही प्राध्यापकांची कंटाळवाणी व्याख्याने चुकवावयास आवडते,' मी सुरुवात केली.

जगातील सगळे विद्यार्थी सारखेच असतात या आनंदाचे स्मित त्यांच्या चेहऱ्यावर झळकले.

नंतर अधिक काही तपशील सांगून शेवटी मी म्हणालो :

'एखाद्या विद्यार्थ्याला आपले सर्व महाविद्यालयीन जीवन व्यर्थच घालवावयाचे असेल तर आमच्याकडे त्याला कोणी आडवीत नाही; परंतु एखाद्याला आपले महाविद्यालयीन जीवन खऱ्या अर्थाने कारणीच लावायचे असेल तर तशीही संधी त्याला असेल.'

यातील उत्तरार्ध मी केवळ एक सुबक समतोल विधान करावे या हौसेने सांगितला असा आक्षेप कोणी घेतला तर मला त्याचा सूक्ष्म विचार करावा लागेल.

परंतु अशी ईर्षा असणारा कोणी विद्यार्थी खराच भेटला तर हे विधान प्रत्यक्ष कसोटीला लावून पाहण्यात मला आनंदच होईल.



वरील आवाहन मी केले त्यानंतर दोन तपाहून अधिक काळ आता उलटला आहे. त्या काळात आलेल्या अनुभवावरून खालील गोष्टी पुढील तीन वर्षे प्रयोगासाठी निश्चित करण्यात आल्या आहेत. संस्था व व्यक्ती यांना आपापल्या उत्साहाने त्यात सहभागी होता येईल. असे कोणी आर्थिकदृष्ट्या असमर्थ असेल तर त्या भागाची पूर्ती करण्याची



अनुक्रमणिका

जबाबदारी 'अ.ल.दा. निकेतन, सातारा' घेत आहे. भावी कालात शक्य होईल तसतशी ही मदत त्यांनी परत केल्यास आनंद वाटेल. परंतु परत न आल्यास दुःख एवढेच राहील की आपल्यासारख्याच अडचणी दूर करण्यासाठी मिळालेल्या मदतीची आपण पुरेपूर परतफेड करणे हे आपले आपले जीवनमान वाढवण्यापूर्वी आपली आद्य जबाबदारी आहे ही भावना आपण लाभार्थीच्या मनात संक्रमित करू शकलो नाही.

विद्यार्थी विद्यार्थिनी कोणत्याही वर्गात असोत आपल्यापुरती ते अगदी उद्यापासून सुरुवात करणार आहे. दिवसातील एक तास माझ्या अध्ययनाच्या व्यतिरिक्त माझ्या क्षमता वाढविण्यासाठी मी देणार आहे. दर दिवशी एक तास ही सरासरी आहे. जी कसर राहील ती सुटीच्या दिवशी आपल्याला भरुन काढता येईल.

माझा आजवरचा अनुभव असा आहे की अनेकजण प्रारंभ करतात परंतु नंतर जिद्दीला कमी पडतात. हे असे का घडते याचा शोध घेऊन अधिक काही सुचते का हे पाहण्यासाठी 'शिक्षण आणि समाजपरिवर्तन' यासाठी हा प्रयोग आहे.

आपल्या स्वतःमध्ये हे परिवर्तन करावे असे वाटणाऱ्या अनेक विद्यार्थी-विद्यार्थिनींना यात सहभागी होता येईल. वसतिगृहे, शिक्षणसंस्था, शाळा-महाविद्यालये यांनाही असे विद्यार्थी हेरुन त्यांच्यासाठी प्रयत्न करता येईल.

अधिक तपशील या ठिकाणी देत नाही. ज्यांना हवा असेल त्यांनी माझ्याशी संपर्क साधावा. माझा पत्ता :

प्रा. देवदत्त दाभोलकर
'शांतिनिकेतन'
४३ गुरुकृपा हौसिंग सोसायटी,
शाहूनगर, सातारा - ४१५००१
दूरध्वनी - (०२१६२) २२०३७८
वेळ दुपारी ३.०० ते ५.००



# भारतीय शिक्षण परिषद

✓ परिषदेसाठी मनाने, वयाने तरुण असलेल्या अधिकाधिक जणांना प्रत्यक्ष सहभागी होण्याचे आवाहन करावे. यावर्षीच्या नोव्हेंबरपूर्वी अशा कार्यकर्त्यांची बैठक आपण योजल्यास कामाची अधिक नेमकी रचना त्यांच्यासमोर मांडण्यासाठी इथून काही कार्यकर्ते येऊ शकतील.

✓ विविध शैक्षणिक प्रयोगांसंबंधी इथल्या कार्यालयात माहिती कळविणे. प्रयोगशील संस्था, व्यक्तींना आपण आपले काही प्रयोग दाखवू शकतो. त्यासाठी त्यांची शैक्षणिक सहल आयोजित करावी.

✓ आपल्या जिल्ह्यातील विविध क्षेत्रातील शिक्षण-प्रेमींना एकत्र करण्यासाठी विविध मेळावे, प्रशिक्षण वर्ग यांचे आयोजन आपण परिषदेच्या माध्यमातून करू शकाल, उदा. अध्यापक प्रशिक्षण वर्ग, पालक प्रबोधनवर्ग, युवा मेळावे, स्वयंअध्ययन कौशल्य प्रक्षिशण इ.

✓ आपल्या संपर्कातील (राज्यातील व राज्याबाहेरील) संस्था, शाळा, अध्यापक, पालक अथवा अन्य शिक्षणप्रेमींना सभासद होण्यासंबंधी आवाहन करावे.

✓ इ. ८ वी पासून मुलांचा व्यवसायक्रम काय असावा यासंबंधी चर्चा चालू होतात, मुलाची आवड, क्षमता लक्षात न घेता अनेकदा पालकांकडून निर्णय लादला जातो. दि. २० जुलै ते २२ जुलै पुण्यात त्यासंबंधी प्रदर्शन योजले आहे. आपल्या शहरातही अशा प्रकारचे आयोजन आपण करू शकतो. (अधिक माहितीसाठी :
श्री. कुणाल कुलकर्णी : ९८२२१८९५५१,
आदित्य शिंदे ९८२३३७१६७०)

✓ २३, २४, २५ नोव्हेंबर या कालावधीत संगमनेर येथे होणाऱ्या परिषदेसाठी अधिकाधिक संपर्क करावा. या परिषदेसंबंधी पूर्वचिंतन चालू आहे, झालेली चर्चा वृत्तात दिली आहे. आपल्या सूचनांचेही स्वागत आहे.

कार्यवाह
भारतीय शिक्षण परिषद



# शैक्षणिक परिवर्तन आणि आपण

देवदत्त दाभोलकर

'साम्ययोग'च्या 'शिक्षण विशेषांका'त लिहिताना विशेष अपेक्षेने लिहीत आहे. आपल्या वाचकावर्गासाठी काही संक्षेपाने लिहूनही चालण्यासारखे आहे.

शिक्षणातील परिवर्तनाविषयी शासनाबरोबरच समाजानेही विचार करण्याची गरज आहे हे आपल्या पत्रातील विधान मला मान्य आहे. मी तर याच्याही पुढे जाऊन केवळ विचार करण्याचीच नव्हे तर कृतिशील असण्याचीही गरज आहे असे मानतो.

आपण त्यानंतर उपस्थित केलेले प्रश्न : भावी काळात मानव कशा प्रकारचा घडावा; आर्थिक, सामाजिक विषमता, राजकारणातील अनैतिकता, पर्यावरण आदि प्रश्नांची सोडवणूक आजच्या शिक्षणातून होईल काय, अशा स्वरुपाचे आहेत.

### गांधी-विनोबांचे मूलगामित्व

संक्षेपाने सांगावयाचे तर या प्रश्नांची पुष्कळ मूलगामी चर्चा गांधीजींनी व विनोबाजींनी केलेली आहे. त्या मांडणीकडे पाहण्याचा राज्यकर्त्यांचा दृष्टिकोन दुरून आदराचा परंतु प्रत्यक्षात अस्वीकाराचा आहे. 'अन्त्योदय'ची भारताची घोषणा केवळ उद्‌घोषापुरतीच आहे एवढाच त्याचा अर्थ आहे. प्रश्नाच्या मूळ गाभ्याला हात घालण्याची आपली तयारी नाही. किंबहुना, मोकळेपणाने विचार करावयाची देखील नाही. याची सर्वांना आकलन होण्याला सोपी जावी अशी गमकेही सांगता येण्यासारखी आहेत.

१. सुमारे दहा वर्षांपूर्वी जागतिक कीर्तीचे, शिक्षणक्षेत्रात नवविचार मांडणारे इव्हॅन इलिच भारतात आले होते. मी त्यांच्या व्यवस्थेकडे पाहत होतो. एक दिवस विनोबाजींचे शिक्षणविषयक विचार ते वाचत होते. मी त्यांना म्हटले, "विनोबाजींचे विचार आपल्याला कसे वाटले?"

ते म्हणाले, "मी जे सांगण्याचा प्रयत्न करत आहे ते या माणसाने माझ्यापूर्वीच अनेक दशके सांगून ठेवले आहे."

२. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारताच्या विविध राज्यांतील शिक्षणसंचालकांनी विनोबाजींना मूलोद्योगी शिक्षणाविषयीची त्यांची कल्पना विचारली होती.

विनोबाजी म्हणाले : "माझी कल्पना मी तुम्हाला सांगत नाही; परंतु तुम्हाला एक प्रश्न विचारतो. तुम्ही स्वत: आपल्या मुलांना शिक्षण देता त्यावेळी तुमच्या मनात कोणती कल्पना असते?"

"आमची मुले स्वावलंबी व्हावीत, आपल्या पायावर उभी रहावीत, असे आम्हाला वाटते"- शिक्षणसंचालकांनी उत्तर दिले.

"तुमच्या मुलांविषयी जे व्हावे असे तुम्हाला वाटते ते भारतातील प्रत्येक मुलाच्या बाबत घडेल अशी शिक्षण-व्यवस्थेची तुम्ही रचना करा, मग मूलोद्योग तुम्ही बाजूला ठेवला तरी मला चालेल." विनोबाजींनी चर्चेचा समारोप केला.

३. स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच्या चाळीस वर्षांच्या कालावधीत ही गोष्ट घडून आलेली नाही. आजही भारतात साठ टक्के जनता निरक्षर आहे व चाळीस टक्के जनता दारिद्र्यरेषेच्या खाली आहे हा या गोष्टीचा शासनालाही मान्य असलेला पुरावा आहे.

### मूलोद्योग व कार्यानुभव

'मूलोद्योग' शब्द लोकांना खटकतो म्हणून कोठारी शिक्षणआयोगाने 'कार्यानुभव' (Work experience) हा शब्द वापरला. त्या आयोगाचे सदस्य कार्यवाह जे. पी. नाईक यांनी लिहिले आहे - या विषयीची चर्चा चालू असताना गांधीवादी विचारवंत जी० रामचंद्रन् म्हणाले, "तुम्ही नाव काहीही ठेवा, परंतु मूलोद्योगाची कल्पना ज्याप्रमाणे बाहेर फेकली गेली त्याचप्रमाणे ही कल्पनाही बाहेर फेकली जाईल. कारण त्यावेळी जे लोक अधिकारावर होते तेच आजही अधिकारावर आहेत." 'कोठारी आयोग आणि त्यानंतर' या आपल्या १९८० मध्ये प्रकाशित झालेल्या ग्रंथात जे. पी. नाईक

अनुक्रमणिका






लिहितात - "जी० रामचंद्रन् यांचे हे भाकित पूर्णपणे खरे ठरले."

**विचारवंतांचे निवेदन**

शिक्षणव्यवस्थेच्या रचनेत आणि कार्यवाहीत आपण चुकीच्या दिशेने चाललो आहोत, हा इशारा या क्षेत्रातील विचारवंतांनी दिला होता. त्याचा संपूर्ण तपशील 'भारतीय जनतेचे शिक्षण' या प्रकाशनात मिळू शकेल. (प्रकाशक : इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन, पुणे २९, मूल्य ८ रुपये) अखिल भारतातील चाळीस जणांच्या या निवेदनावर सह्या आहेत. जयप्रकाश नारायण यांची प्रस्तावना आहे. मसुदा मुख्यत्वेरून जे. पी. नाईक यांचा आहे. एक सही माझीही आहे. परंतु जनता शासन अधिकारावर असताना १९७८ मध्ये उत्साहाने प्रसिद्ध झालेले निवेदन जनता पक्ष अधिकारावरून गेल्यावर बहुतेक सह्या करणारे तितक्याच तत्परतेने विसरूनही गेले. त्याचा पाठपुरावा करावयासही ते तयार होईनात किंवा ते निवेदन कसे चुकीचे आहे ते तरी सांगा, असे म्हटले तर माघार घेण्याचीही हिंमत दाखवेनात. माझी भारतातील शैक्षणिक समस्येविषयीची भूमिका त्या निवेदनात आहे तशीच आहे. त्या निवेदनातील मूलभूत विचारधारा गांधीजी, विनोबाजी, जयप्रकाश यांना मान्य अशीच आहे; आणि मुख्य निर्णय खालीलप्रमाणे आहेत.

१. जनआंदोलन उभारल्याशिवाय प्रौढशिक्षणाचे आणि प्राथमिक शिक्षणाचे कार्यक्रम यशस्वी होणार नाहीत.

२. राजकीय कार्यकर्ते आणि शिक्षणतज्ज्ञ यांनी काही कठोर निर्णय घेण्याचे धैर्य दाखविल्याशिवाय, माध्यमिक आणि उच्च शिक्षणात लक्षणीय सुधारणा घडवून आणता येणार नाही.

सुमारे ९० पृष्ठांच्या या निवेदनातील तपशील या ठिकाणी घेता येणार नाहीत. परंतु अपेक्षित कठोर राजकीय निर्णय थोडक्यात खालीलप्रमाणे आहेत.

१. उच्चशिक्षणाच्या सर्वांगीण विस्तारावर नियंत्रण, निवडक प्रवेश पद्धतीचा अवलंब. मात्र दुर्बळ गटातील मुलांसाठी काही जागा राखून ठेवण्याची तरतूद.

२. गरीब मुलांना मोफत शिक्षण मिळेल तर इतर विद्यार्थ्यांना आपल्या पालकांच्या कुवतीप्रमाणे शुल्क द्यावे लागेल.

३. नोकरी व पदवी यांची फारकत करण्याचा क्रमशः प्रयत्न.

४. विद्यापीठांच्या स्वायत्ततेची जपणूक व विद्यापीठांना राजकीय हस्तक्षेप न करणारा परंतु समर्थ असा राजकीय नेतृत्वाचा पाठिंबा.

५. भाषाविषयक राष्ट्रीय धोरणाची अंमलबजावणी.

६. प्रशासनात प्रामाणिकपणे व कार्यक्षमता राखून विद्यापीठीय स्वायत्ततेचे संपादन व संरक्षण करावयाची जबाबदारी विद्यापीठांनी स्वीकारली पाहिजे.

७. शिक्षणाचा आशय, अध्यापनाची पद्धती आणि मूल्यमापन यात मूलग्राही बदल घडवून आणले पाहिजेत.

हे सांगून निवेदन पुढे म्हणते :

शैक्षणिक जीवनामध्ये सातत्यपूर्ण आणि समर्पित वृत्तीने परिश्रम करायला प्रोत्साहन देणारे वातावरण निर्माण करावयास हवे. खेदाची गोष्ट ही आहे की या प्रश्नाशी संबंधित अशा बाबींवर निर्णय घेण्यात येत नाहीत आणि वेगवेगळे गट एकमेकांच्या कार्याला छेद जाईल अशा पद्धतीने वागत असतात. माध्यमिक आणि उच्च शिक्षणाला भेडसावणाऱ्या गुंतागुंतीच्या आणि कठीण समस्या या पद्धतीने सुटणे अशक्य आहे. शैक्षणिक प्रक्रियेत सहभागी झालेल्या सर्व यंत्रणांनी म्हणजे केंद्रशासन, राज्यशासने, शिक्षक, विद्यार्थी आणि सर्वसामान्य नागरिक यांनी आपापली जबाबदारी कर्तव्य-भावनेने पार पाडली तरच माध्यमिक आणि उच्च शिक्षणाबाबात प्रगती होऊ शकेल.

प्राथमिक स्तरासाठी जनआंदोलन व त्यावरील स्तरासाठी वरील प्रकारचा कार्यक्रम यात प्रत्येकाला सहभागी होता येण्याची शक्यता आहे. काही ठिकाणी, काही प्रमाणात असे प्रयोगही चालू असतील. पुढील पाऊले उचलण्याच्या दृष्टीने अशा व्यक्ती, संस्था यांच्याशी संवाद साधण्याविषयी मला उत्सुकता आहे.

☑ ☑ ☑

# तळागाळात

## शिवाजी कागणीकर

मा यागायोगाने शाळेला जाऊ लागलो. माझ्या घरात शिक्षणाचे वातावरण मुळीच नव्हते. माझे आई-वडील मेंढपाळ व्यवसाय करणारे. मी शाळेला जाऊ लागल्यानंतर माझ्या आईने मला म्हटले की, "आम्ही शाळा शिकून काय मामलेदार व्हायचे आहे?" या आईच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून शाळेला जातच राहिलो. शाळा कशासाठी शिकावयाची हे मला माहीत नव्हते. नियमित शाळेला जाऊ लागलो. इयत्ता १ ली ते ४ थी पर्यंत शाळा शिकताना खूप त्रास सहन करावा लागला. त्याच बरोबर खूप मित्र-मैत्रिणींनी मदत पणकेली.

इयत्ता ४ थी च्या भाषा विषयाचा अभ्यास करताना साने गुरुजींचा धडा अभ्यासाला होता. तसेच माझ्या शाळेत रोज "खरा तो एकचि धर्म" ही प्रार्थना म्हटली जायची. सुरुवातीला मला त्याचा अर्थ कळला नाही. मला ही साने गुरुजींची कविता खूप आवडायची. हळूहळू या प्रार्थनेचा अर्थ कळू लागला. साने गुरुजींचे 'श्यामची आई' हे पुस्तक मिळवून वाचून काढले. या पुस्तकातून खूप गोष्टी शिकता आल्या. सर्वात प्रथम एक गोष्ट करु लागलो आणि ती म्हणजे आमच्या शेजारी एक म्हातारी आजीबाई राहायच्या. त्यांना मुलं होती. परंतु आजीबाईंना मुलांनी वेगळं दिलं होतं. रोज आजीबाई विहीरीवर पाण्याला यायच्या. त्यांना भरलेल्या पाण्याची कळशी ओढून यायची नाही. त्यांना न चुकता पाणी ओढून द्यायला सुरुवात केली. मी इयत्ता ५ वी त असताना माझ्या वर्गात माझ्या गावाच्या म्हणजे कडोलीच्या आजूबाजूच्या गावांतून मुलं आली होती. त्यांच्यापैकी बरीच मुलं अभ्यासात कच्ची होती. वर्गात गणितं सोडवता आली नाहीत, गृहपाठ करून आणला नाही तर शिक्षक मुलांना खूप मारावयाचे. हे त्यांचे हाल बघून मला रडू यायचं. माराला भिऊन मुलांनी शाळा सोडू नये असे मला वाटायचे. कारण माझ्या भारत देशातील सर्वांनी शिकून शहाणं झालं पाहिजे तेव्हाच माझा भारत देश सुधारणार असे मला वाटू लागले होते. (साने गुरुजींच्या शिकवणीमुळे). आणि म्हणून ज्या मुलांना गणितं येत नव्हती त्यांना दुपारच्या मधल्या सुट्टीमध्ये गणितं शिकवू लागलो. गृहपाठ करून आणावेत यासाठी प्रयत्न करु लागलो.

आम्हाला शिकवणाऱ्या शिक्षकांबद्दल (एकूणच शिक्षकांबद्दल) माझ्या मनात नितांत आदर आणि प्रेम. चांगला समाज घडवण्याचे महत्त्वपूर्ण काम हे गुरुजन करतात. जसा कुंभार मातीला आकार देऊन मडकी बनविण्याचे काम करतो तसा शिक्षक रक्ताच्या गोळ्याला शिक्षणातून संस्कार देऊन त्याला माणूस घडविण्याचे काम करतो, अशी माझी श्रद्धा होती. आणि म्हणून, मुलांनी अभ्यास केला नाही तर शिक्षकांनी शिक्षा दिली, शिविगाळ केली, मुलांना घरी हाकलून दिले तरी शिक्षकांबद्दल राग यायचा नाही. परंतु मुलांनी शिक्षा भोगताना खूप वाईट वाटायचे. त्यावेळचे शिक्षक आपले मुलांना शिकविण्याचे काम निष्ठेने, सचोटीने करत असत. सर्व शिक्षक सारखेच होते असे नाही. यासाठी आम्ही सर्व वर्गमित्र मिळून अमूकच शिक्षक इयत्ता ७ वी वर्गाला द्यावा असा अर्ज लिहून विनंती शाळा मुख्याध्यापकांना व त्यावेळच्या स्वयंस्फूर्तीने शाळा सुधारण्याचे काम करणाऱ्या समितीला केली. आमची मागणी मान्य झाली. ही गोष्ट साधारण १९६३-६४ ची असावी.

पू. साने गुरुजींच्या प्रेरणेने मी शिक्षक व्हावयाचे ठरवत होतो. कारण इतर सर्व कामापेक्षा शिक्षकाचे काम फार महत्त्वाचे आहे. असे मनोमन वाटत होते. याच वेळेला महर्षी अण्णा कर्वे यांची पण धड्यातून ओळख झाली होती. प्रत्येक माणसाने शिकलं पाहिजे. मग ती स्त्री असो वा पुरुष असो. आपल्या गावातील मागासलेल्या थरातून (महार, मांग, धनगर व आर्थिक स्थिती वाईट असलेल्या मराठांमधून) मुलं शाळेला येत नसत. माझ्या वर्गात मी एकटा धनगर व महाराचा मुलगा, तसेच २ मुली. मनात सतत एकच विचार, सगळे शाळेत येऊन शिक्षण कधी घेतील? मी माझ्या परीने धनगरांची मुलं शाळेला जावीत यासाठी प्रयत्न करत होतो. परंतु त्या वेळेला मला फारसे यश आले नाही. कारण या धनगर मंडळीत शिक्षणाबद्दल आस्थाच नव्हती. त्याचबरोबर मेंढपाळ व्यवसायामध्ये मुलगा ५-६ वर्षाचा झाला की, बाबांच्या मागून मेंढ्या चारायला जाणे भाग पडावयाचे. तसा मी भाग्यवान कारण आम्ही आठ भाऊ व एक बहीण. तर्शी माझी फारशी गरज पडली नसावी. त्यातच

माझ्या लहान भावाने मोठे मन करून (फार मोठा त्याग करून) आपण काम करायला घरी राहून (इयत्ता २ रीत असताना) मला शाळेला जायला मोकळीक दिली. कारण या वेळेला माझे चार मोठे भाऊ वेगळे झाले. माझे शिक्षण व्हावे यासाठी माझ्या बहिणीने खूप कष्ट घेतले.

मी सातवी पास झालो. माझ्यासाठी माझ्या एका मित्राने गोव्याला शिक्षकांची नोकरी बघितली होती. माझी तर इच्छा होतीच. साने गुरूजींच्या सारखं निवासी शाळेत काम करावयाचे स्वप्न होते. गावातील प्रमुख मंडळींनी पुढाकार घेऊन गावातच शाळा सुरू केली होती. या शाळेला परवानगी मिळवायची असेल तर इयत्ता ८ वी ला मुलांची संख्या बऱ्यापैकी पाहिजे. यासाठी प्रयत्न चालू होते. मला ही माझ्या गावी पुढील शिक्षणाची सोय झाली तर सर्व गरिबांची मुलं, विशेष करून मुली शिकतील यासाठी ८ वी च्या वर्गात जाऊ लागलो. विनाअनुदानीत शाळा, गावातले शिकलेले कोणी शिक्षक म्हणून काम करायला तयार नाहीत. बी.ए. पास झालेले एकटे काही महिने शाळेत आले, त्यानंतर काय झाले कळाले नाही. बेळगावहून दोन शिक्षक मात्र नियमित शाळेला येऊ लागले. बेळगाव शहरातून दिवसातून दोनच वेळा गावी बस यावयाची. सकाळी व संध्याकाळी शुक्रवारी शाळेतच वस्ती करावयाचे. आम्ही त्यांना भातआमटी करून जेऊ घालत असू. हे शिक्षक मराठी, हिंदी, इंग्रजी विषय शिकवायचे. अधूनमधून कोणीतरी येऊन इतिहास व भूगोल शिकवत असत. गणित व सायन्स शिकवायला शिक्षकच नव्हते. बेळगावहून येणारे शिक्षक पंदरचे पैसे बसला खर्च करून यावयाचे. मनात सतत भीती, हे शिक्षक कधी यायचे थांबतील सांगता येत नाही.

आमच्या माध्यमिक शाळेला अनुदान मिळवायचे असेल तर मुलांची संख्या ठरावीक कायम राहून १० वी चा निकाल तीन वर्षे सतत चांगला लागायला हवा. गणित व सायन्सचे शिक्षक नाहीत. अधूनमधून कोणा-कोणाला बोलावून जेवढे शक्य होईल तेवढे शिकणे चालू होते. आमच्यापेक्षा अगोदर १० वीची एक बॅच केंद्राच्या परीक्षेला बसणार होती. परीक्षा झाली. निकाल फारच खराब लागला. आम्हा सर्वांना तसेच शिक्षक मंडळींना खूपच काळजी लागून राहिली. शाळेला कायम स्वरूपाची परवानगी मिळून शिक्षकांचा पगार सुरु व्हावयाचा असेल तर माझी भारतीय सर्व जनता शिक्षण घेऊन शहाणी व्हावी लागेल. लो. टिळक, ना. गोखले, पं. जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस, साने गुरुजी, म. गांधी तसेच इतर अनेक मंडळी शाळेला जाऊन शिकून शहाणी झाली म्हणून अन्यायी ब्रिटिश साम्राज्याच्या विरुद्ध लढायला तयार झाली. वेळ प्रसंगाला स्वतःचा विचार न करता स्वार्थत्याग करून देशसेवेच्या कामाला लागले. या सर्व गोष्टींची/घटनांची आठवण ठेवून प्रत्येकाने शिक्षण घेतलं पाहिजे आणि भारतमातेच्या सर्व सुपुत्रांची यथाशक्ती सेवा केली पाहिजे असे मला वाटू लागले होते. शहाणा झाल्याशिवाय त्याला न्याय काय आणि अन्याय काय कळणारच नाही. विचार करायला लागून देशाच्या भल्यासाठी प्रत्येकजण यथाशक्ती काम करायला तयार होईल. यासाठी मी पण शिकले पाहिजे. पुढे जाऊन साने गुरुजी सारखे शिक्षक होऊन लोकांना शिक्षण देऊन शहाणे करण्याचे काम करावयाचे आहे. होईल तेवढी समाजसेवा आजपासूनच करायला हवी असे सतत मनात येत असे. आणि म्हणून ज्यांना अभ्यासात अडचणी येत त्या दूर करण्यासाठी शालेय विद्यार्थी मित्रांना जेवढे जमेल तेवढे शिकवण्याचे काम करु लागलो. प्रत्येक मुलगा-मुलगी माझ्या भारतमातेच्या भिंतीचे दगड आहेत. इमारत मजबूत व्हावी यासाठी गवंडी प्रत्येक दगड जसा हाती येईल तसा भिंतीला न बसविता त्याची घडाई करून बसवतो तसंच माझ्या देशाचं आहे. माझ्या देशावर म्हणजेच देशातील प्रत्येक माणसावर पू. साने गुरुजींनी प्रेम करायला शिकवलं. प्रत्येक माणसावर प्रेम करत, तो समर्थ व्हावा, स्वाभिमानी बनावा, स्वतःचं जीवन जगतच दुसऱ्यासाठीसुद्धा जगण्याची प्रेरणा त्याला मिळावी यासाठी आपण शिकत असलेल्या आणि शिकलेल्या लोकांनी सतत प्रयत्न केले पाहिजेत असे वाटावयाचे. आम्हा सर्व मुलांना शिकवणारी सर्व शिक्षक मंडळी अशा प्रकारचे उदात्त व पवित्र काम करत आहेत असे वाटून अंतःकरणातून त्यांना वंदन करत असे. गुरुजन वर्ग इतके कष्ट घेऊन आपल्याला शिक्षण देऊन शहाणे करत आहेत, याची जाणीव न ठेवता विद्यार्थी अभ्यास का करत नाहीत? असा प्रश्न पडून मन दुःखी होत असे.

गावातील वडीलधारी मंडळींकडून आपल्या गावातील काही मंडळी शिक्षण घेऊन बाहेरगावी (शहरात) कॉलेजमध्ये, संशोधनसंस्थेत, कारखान्यातून देशाची सेवा करायला गेले आहेत असे कळत असे. एकूण ऊर भरून यायचा. कधी त्यांना बघेन असे वाटावयाचे. उन्हाळ्याच्या








सुट्टीमध्ये ही मंडळी गावी यायची तेव्हा त्यांना बघायला कधी चुकत नसे. यांच्यातील एकटे माझ्या देशाचे थोर सुपुत्र माझ्याच गावात जन्मले. कॉलेजमध्ये शिकत असतानाच सरकारी नोकरीत बोलावणं आलेलं असताना हे सर्व सोडून गांधीजींनी सुरु केलेल्या १९४२ च्या आंदोलनात भाग घेऊन जेलला गेलेले श्री. सदाशिवराव भोसले (सर्वोदय कार्यकर्ते) अधूनमधून आमच्या शाळेत येत असायचे. यांना पाहताना प्रत्यक्षात गांधीजींना बघितल्याचा आनंद व्हायचा. त्यांचा तो त्याग, राष्ट्रप्रेम बघून माझ्या सारख्याला हवेत तरंगायला व्हायचे. १९६५ साली श्री. भोसले दादांच्या पुढाकाराने माझ्या गावी श्रमसंस्कार शिबीर झाले. यात २०० हून जास्त तरुण विद्यार्थी मित्रांनी भाग घेतला होता. यात मी पण सहभागी झालो होतो. कै. यदुनाथ थत्तेजींनी या शिबीराला भेट दिली.

मी इयत्ता १० वी पास झाल्यानंतर माझी कॉलेजला शिकायला जाण्याची आर्थिक परिस्थिती नसताना, गावातील काही प्रतिष्ठीत लोकांच्या सांगण्यावरुन व मित्रांच्या आग्रहास्तव कॉलेजला गेलो. माझ्या प्राथमिक व माध्यमिक शालेय जीवनात माझ्या सर्व मित्रांबरोबर तसेच गुरुजनांबरोबर खूप आनंद मिळवला. माध्यमिक शाळेत मुलांना शिकवायचे असेल तर कॉलेजची पदवी घेण्याची अट होती. यासाठीसुद्धा कॉलेजला जाणे क्रमप्राप्त होते. अधूनमधून स्वप्न पडतंच होती. एके दिवशी एक स्वप्न पडले. शिक्षक झालो आहे. एका शाळेत शिकवायला जाणार आहे. तेथे मुलांना राहण्यासाठी वसतीगृह करावयाचे आहे. यासाठी आपल्याला तांदूळ लागणार. या तांदळाची व्यवस्था करण्यासाठी काही तरी केलं पाहिजे. हा विचार घेऊन वसतीगृहात राहणाऱ्या मुलांना घेऊन ८-१० भाताची कापणी करावयाची व त्यातून जी मजुरी रुपाने धान्य येईल ते मुलांसाठी वापरता येईल.

वसतिगृहात राहणाऱ्या मुलांना तांदळाची व्यवस्था करण्यासाठी वसतिगृहातील मुलांना घेऊन भात कापणी करण्यासाठी (मजुरीने) एका शेतकऱ्याच्या शेतावर गेलो आहे. एवढ्यात जाग आली. पाहतो तर सगळीकडे अंधारच अंधार.

कॉलेजला जाण्याचे नक्की झाले. माझ्या लहान भावाने घरात समजावून सांगण्याची जबाबदारी घेतली. माझ्या कल्पनेत कॉलेज म्हणजे ब्रह्मविद्या मंदिर येथे शिकवणारे प्रत्यक्षात ब्रह्मविद्या संपादन केलेले. शिकायला येणारे, ब्रह्मविद्या घेणारे. ब्रह्मविद्या म्हणजे मानवाला ही विद्या जवळ-जवळ देवच बनवते. मला कॉलेजमध्ये जाऊन शिक्षक व्हायला पदवी तर मिळवावीच लागेल. त्याचबरोबर चांगला माणूस पण बनता येईल. (हे सर्व भाबडेपणाचे अज्ञानातून आलेले असणार. तरी त्या वेळेला माझ्या मनात जे विचार आले ते सांगत आहे.)

मी एका खेड्यातून नव्यानेच या शहरी वातावरणात गेलो होतो. अन्य बरीच मुलं पण खेड्यातून कॉलेजला आली होती. त्या सर्वात मी अगदी खेडूत असा दिसत असे. संपूर्ण शिक्षक नसलेल्या शाळेत शिकलेला, अभ्यासात इतरांच्या मानाने खूप मागे असलेला, सुरुवातीला ३/४ महिने सरांनी शिकवलेले काहीच न कळणारा असा मी. कॉलेजमध्ये टिकून राहिलो तो फक्त माझ्या सानेगुरुजींच्याकडून प्रेरणा घेतली होती म्हणून. कॉलेज वातावरण पाहताना माझ्या प्राथमिक शाळेचं वातावरण १०० पटीनं बरं म्हणण्याची पाळी. ठीकठीकाणी विद्यार्थ्यांचे घोळके. प्राध्यापक मंडळी कॉलेजला येताना रस्त्यात कोणी भेटले तर बोलायचे राहिले बाजूला, त्यांच्याकडे बघत नसत इतकी शिष्ठता. एकमेकांमध्ये प्रेमाचे संबंध निर्माण व्हायला अवकाशच राहिला नाही. प्रेमाचे संबंध निर्माण झाले नाहीत तर शिकणे कसे व्हायचे? असा मनात सतत प्रश्न. कॉलेजचे पहिल्या वर्षाचे विद्यार्थी. क्लासमध्ये सरांचा प्रवेश होताना जोराने डेस्क वाजवून स्वागत, मुलांची हजेरी घेताना इतका सावळा गोंधळ. ठरावीक शिक्षकांचा तास होऊ द्यायचा नाही असे ठरवून आलेल्या सरांना परत पाठवणे. किती होष्टी म्हणून सांगू. कॉलेजचे प्रमुख प्राचार्य या विषयात कधीच लक्ष घालताना दिसले नाहीत. मी माझ्या परीने या सर्व गोष्टींचा अर्थ लावायचा प्रयत्न करीत होतो. शेवटपर्यंत अर्थ लागला नाही. रवींद्रनाथ टागोर यांच्या 'शांतिनिकेतन' बद्दल ऐकत होतो. फार थोडं वाचलं पण होतं. एकूणच कॉलेज म्हणजे ब्रह्मविद्या मंदीर या भ्रमाचा भोपळा केव्हाच फुटला होता. कारण जे सायन्स विद्यार्थी त्यांना प्रयोगशाळेत प्रयोग करावयाचे असत, ते रसायनद्रव्यांची इतकी नासाडी करायचे! बघून खूप वाईट वाटायचे. स्वतःची असो वा सार्वजनिक असो ती राष्ट्रीय संपत्ती म्हणून त्याचा योग्य वापर करायला हवा असे अनेक राष्ट्रीय नेत्यांनी टाहो फोडून सांगितले आहे. साने गुरुजींनी ताटात अन्नाचा कणसुद्धा सोडायला नको. कारण निर्माण करताना शेतकरी खूप कष्ट घेतो. अन्नाची नासाडी म्हणजे माझ्या शेतकरी बांधवांचा अपमान आहे. मी तसा खूप






प्रयत्न करून तिसऱ्या श्रेणीत कसाबसा पास होणारा विद्यार्थी होतो. कॉलेजच्या शेवटच्या वर्षापर्यंत पोहोचलो तो पर्यंत शाळामास्तर होण्याचा उत्साह कमी झाला होता. कारण कॉलेजमध्ये असतानाच बेळगाव शहरातील व खेड्यातील शिक्षणाचे काम करण्याऱ्या संस्था पाहिल्या होत्या. माझ्या गावातील संस्थापण फार जवळून पाहिली. समाज शिकून शिक्षित कसा व्हावा यासाठी या संस्था काम न करता प्रामुख्याने पैसा व सत्ता मिळविण्यासाठीच आहेत असे सगळीकडे अनुभवाला येत होते. महर्षी कर्वे अण्णा, कर्मवीर भाऊराव पाटील शिक्षण प्रसारासाठी चालविलेल्या संस्था व नव्यानी सुरु झालेल्या संस्था यांच्या ध्येयधोरण व कार्यपद्धती यात गज-गजांतर फरक होता. शिक्षकांना नेमून घेताना डोनेशनच्या नावावर पैसे उकळण्याचे सुरु झाले होते. माझ्यासारखा शिक्षक व्हावयाचे म्हणजे पैसे देऊन शिक्षक होणे हे माझ्या तत्त्वात बसणारे नव्हते. आणि द्यायला माझ्याकडे पैसे पण नव्हते. जरी कोणी मला शिक्षक म्हणून नेमून घेतले तर ते मला कधी हाकलून लावतील किंवा मी पण केव्हा सोडून येईन हे सांगता येणे शक्य नव्हते. अशी मनाची घालमेल चालली असताना, पदवी मिळविण्याचे अत्यंत कठीण काम पण माझ्या हातात होते. या संस्थांतून काम मिळणार नाही. मिळालं तरी मनासारखं करायला मिळणार नाही. साने गुरुजींचे राष्ट्रप्रेम, स्वातंत्र्य संग्रामातील त्यांचे कार्य, समाजसेवा या सर्व गोष्टी डोळ्यासमोरुन चित्रपटातील गोष्टीप्रमाणे सरकत होत्या. खरा तो एकची धर्म, बलसागर भारत होवो या कवितांतील समाजाबद्दलची तळमळ व प्रेम ओसंडून वाहत होते. दिवसेंदिवस मन अस्वस्थ बनत होते. शिक्षक होण्याचा उत्साह मावळला होता. काय करावयाचे हे कळत नव्हते. समाजसेवा माझ्याकडून घडावी अशी उत्कट इच्छा मात्र होती. कारण साने गुरुजींच्या फोटोसमोर उभा राहून प्रतिज्ञा घेतलेली होती. याचा अर्थ मी समाजसेवा करण्यास संपूर्ण तयार आहे असा नव्हता. मी स्वतः खूप घडावयास पाहिजे हे मनात सतत असताना साने गुरुजींच्या कार्याचा आत्मा म्हणजे सर्वांवर प्रेम करावयाचे व सेवा करावयाची एवढेच मला दिसत होते. कसे करावयाचे शिकावे लागणार.

कडोली गावात १९७२ साली अखिल भारतीय तरुण शांतिसेनेचे शिबीर श्री. भोसले दादाजी व श्री. कामत अण्णा (बेळगाव जिल्हा खादी ग्रामोद्योग संघाचे अध्यक्ष) यांच्या पुढाकाराने आयोजित करण्यात आले होते. मी पण या शिबिरात भाग घेतला. देशभरातून खूप शिकलेल्या ५०० हून जास्त तरुणांनी या शिबिरात भाग घेतला होता, १५ दिवसांचे शिबीर संपावयाच्या दिवशी कॉलेजच्या शेवटच्या वर्षाची परीक्षा द्यावयाची नाही असा निर्णय केला. माझ्या घरातील सर्व मंडळींना खूप वाईट वाटले, मला पण. माझ्या सर्व भावंडांच्या अपेक्षा पूर्ण करु शकलो नाही. त्यांचे अनंत उपकार माझ्यावर झाले होते. सर्व सेवा संघाचे अध्यक्ष श्री. ठाकूरदास बंग यांच्या नेतृत्वाखाली कडोली भागात ग्रामदान-ग्राम-स्वराज्य अभियान चालले. यात भोसले दादा होतेच. खूप दिवस पाहत असलेले समाजसेवेचे स्वप्न साकार करता येते का पहावे म्हणून मी या आंदोलनात भाग घेतला.

आंदोलन २० दिवसात १५ गावांतून गेले. प्रत्येक गावात संध्याकाळी ग्रामसभा व्हायच्या. या सभेत प्रामुख्याने पुढारी मंडळी भाग घेत. ही मंडळी पाहुण्यांना गावासाठी सर्व काही करायला तयार आहेत असे आश्वासन देत, सर्व कार्यकर्त्या मंडळींना खूप आनंद व्हायचा. मलासुद्धा आनंद व्हायचा. रोज रात्री झोपायला जाताना मनात यायचं की मला यात काय काय करता येईल?

आंदोलन संपले. संपर्कात असलेल्या गावांतून ग्रामकोष निर्माण करण्याचे व तरुणांची संघटना करण्याच्या कामाला लागलो. हे काम करताना डोंगराळ भागात असलेल्या ८/१० गावांत शिक्षणाची काय व्यवस्था आहे हे बघण्याच्या, समजावून घेण्याच्या कामाला लागलो. परिस्थिती फारच गंभीर होती. बऱ्याच मागासलेल्या बेरड गावांतून शाळाच नाहीत. शाळा असतील तर शिक्षकच नाहीत. शिक्षक नाहीत म्हणून मुलं नाहीत. यामुळे शाळांमध्ये गायी-म्हशी, शेळ्या यांना बसायला निवांत जागा मिळाली होती. या भागातील शिकलेल्या लोकांचा सर्व्हे केला. ० ते १ टक्का एवढेसुद्धा शिकलेल्या लोकांचे प्रमाण नव्हते. तेव्हा सर्वात प्रथम तरुण मुलामुलींना लिहिता-वाचता येण्याएवढे तरी आपल्याला करावे लागेल. कारण शिक्षण हा प्रत्येकाचा तिसरा डोळा आहे. हा डोळा मिळाला की, तो माणूस स्वतः शहाणा होणार आणि त्याचबरोबर समाज सुधारणार अशी भावना होती. तसेच गावातील इतर लोकांना आधुनिक शेतीपद्धती व त्यांच्या गायी-म्हशी-शेळ्या पालनासंबंधात विशेष करून रोग होऊ नयेत, आले तर त्यासाठी काय करावे याबद्दल पण त्यांना समजावून






सांगावे लागणार होते. दारू गाळावयाचे काम सर्व गावांतून खूप मोठ्या प्रमाणात चालावयाचे. गावातील ७०/८० टक्के पुरुष मंडळी नशेतच असायची. त्याचबरोबर इतर गावांना दारू पोचवण्याचे काम व्यवस्थित चालावयाचे. असे अनेक प्रश्न त्यांच्याबरोबर बसताना/उठताना समजू लागले. ही गोष्ट १९७३-७४ सालची आहे. माझ्या देशाला स्वराज्य मिळून २७ वर्षे संपली होती. साने गुरुजी, महात्मा गांधी, संत विनोबा भावे यांच्या स्वप्नातील भारत कधी व कसा घडावयाचा? विचार करताना सर्वांचे शिक्षण नाही, तेव्हा शिक्षण मिळविण्यासाठी प्रयत्न करायला पाहिजे असे सतत वाटावयाचे. सर्वोदय कार्यकर्ते मंडळी किती करू शकतील? यासाठी सरकारने करायला पाहिजे असे पण वाटायचे. ज्या गावात अजुनी शाळा नाही अशा ठिकाणी सरकारने प्राथमिक शाळा काढाव्यात, यासाठी शहराच्या ठिकाणी असलेल्या शाळा अधिकाऱ्यांच्या ऑफिसला खेपा सुरु झाल्या. शाळा आहे तेथे नियमित शिक्षक पाठवून द्या, जेथे शाळा नाही तेथे शाळा काढा असा एककलमी कार्यक्रम घेऊन गावातील पुढाऱ्यांना भेटून चर्चा करणे व ऑफिसला निवेदन देणेचे काम सुरु झाले. हे सर्व करताना १९७५ साल उजाडसे. त्यावेळच्या आपल्या देशाच्या पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी आणीबाणी जाहीर करुन सर्व सर्वोदयी कार्यकर्त्यांना पकडून जेलमध्ये ठेवले. आपल्या भागातील ग्रामदान-ग्रामस्वराज्याचे काम ठप्प झाले. पुढे काय करावयाचे मला कळेनासे झाले. अत्यंत मागासलेल्या लोकांसाठी काहीतरी करावयाची मनात इच्छा. साने गुरुजींच्या प्रेरणेने व सदाशिवराव भोसले यांच्या साक्षीने समाजसेवेचे कंकण तर बांधून घेतले होते. कोणी आजारी पडला तर त्याला डॉक्टरकडे घेऊन जा. कोणाचे तालुका ठिकाणी रेशन कार्डाचे काम निघाले तर ते जाऊन करून दे, कधी कोणी मित्राच्या शेतात काम करायला माणूस नाही तर त्याला मदत कर, असे करत राहिलो. ३-४ वर्षात या भागात फिरत असताना एक महत्त्वाची गोष्ट लक्षात आली आणि ती म्हणजे सर्व माझ्या आई-भगिनींचे स्वयंपाक करताना खूप हाल होतात. एकेकाळी खूप जंगल असलेल्या गावांना पण जळणाच्या लाकडांचा प्रश्न निर्माण झाला होता. कारण जंगल केव्हाच संपले होते. स्वयंपाक करण्याबरोबर यासाठी लागणाऱ्या लाकूडफाट्याची व्यवस्था बायकांनाच करुन घ्यावी लागत असे. आजही हीच परिस्थिती आहे. ओली लाकडं, ओल्या शेणाच्या गोवऱ्या जळणासाठी वापरणे, स्वयंपाक घरात अंधार, त्याचबरोबर धूर यामुळे बायांचे खूप हाल व्हावयाचे. याच बरोबर आपल्या लहान मुलांकडे लक्ष द्यायला वेळच मिळावयाचा नाही. स्वयंपाक झाल्याबरोबर घरमालकाचे जेवण घेऊन पळत शेत गाठायचे, नाहीतर मालकाकडून चाबकाचे फटके झेलण्यास मनाची तयारी ठेवा. महिना-महिनाभर मुलींचे केस विंचरण्यास वेळ मिळत नसे. यामुळे प्रत्येक मुलीच्या व आईच्या डोक्यात उवा व्हायच्या. उवा मारण्यासाठी शहरातून औषध आणून देण्याचे काम करावे लागायचे. याच वेळेला कोणा एका मासिकामध्ये किंवा दैनिकामध्ये (आज नाव आठवत नाही) गोबर गॅस प्लँट हा शेतकऱ्याला वरदान आहे हा लेख वाचायला मिळाला. कल्पना खूप आवडली. आई-बहिणीची संकटातून सुटका व्हावयाची असेल तर प्रत्येकाकडे गोबर गॅस प्लँट व्हायला पाहिजे. यासाठी बेळगाव जिल्हा खादी ग्रामोद्योग संघाचे अध्यक्ष श्री. श्रीरंग कामत यांना भेटलो. K.V.I.C. (खादी व्हिलेज इंडस्ट्री कमिटी) यांच्याकडे गॅसप्लँटची योजना होती. समजून घेतली व कामाला लागलो. गरिबाचा गॅस प्लँट उत्तम व्हावा यासाठी प्रथम मी समजावून घेतले. १०-१२ गवंडी मित्रांना ट्रेनिंग देऊन तयार करायचे ठरवून त्यांची १५ दिवस शाळा चालवली. वयाने थोडे मोठे असल्यामुळे प्रत्यक्षात चार तास काम व दोनतास गप्पागोष्टी - अर्थात गॅस प्लँट संबंधात. श्रम कामात गोबर गॅस प्लँटसाठी लागणारे खड्डे खणणे, तळात सिमेंट काँक्रीट घालून घेणे, तसेच गॅस प्लँटचे बांधकाम करताना आळीपाळीने सिमेंट, विटा देणे, चर्चेत गॅस प्लँटचे महत्त्व, गरीब शेतकऱ्याकडे आपण गॅस प्लँट बसवणार आहोत. प्रत्येक शेतकरी बँकेतून कर्ज काढून गॅस प्लँट बसवून घेणार आहे. तो कोणत्याही परिस्थितीत गॅस प्लँट यशस्वी झाला पाहिजे हे मनात बाळगून आपण ट्रेनिंग घेतलं पाहिजे. या भागात गोबर गॅस प्लँट ही गोष्ट तशी नवीन होती. प्लँट व्यवस्थित झाले तरच याचा प्रचार होणार होता. हे ट्रेनिंग घेताना बऱ्याच मित्रांना लांबी-रुंदी काढताना टेप वाचता येणे, विटा-सिमेंटचा अंदाज काढणे अशा अनेक गोष्टींसंबंधात (लिहिणेवाचणे संबंधात) अडचणी भासू लागल्या. अशांना त्यांच्या फावल्या वेळात लिहायला वाचायला शिकवले. ज्यांना लिहिता-वाचता येत होते त्यांना क्षेत्रफळांची व घनफळाची गणितं यावीत यासाठी गुणाकार भागाकार शिकवला. त्यांना शिकताना व मला शिकवताना इतका आनंद होत असे की,

त्याचे मी वर्णन करु शकत नाही. गावा-गावांना भेटून कधी एकट्याला, शक्य झाल्यास ८-१० शेतकऱ्यांना गोबर गॅस प्लँटचे महत्त्व पटवून देण्याचे काम करु लागलो. शेणातून गॅस व त्यावर स्वयंपाक करायचा? काहीतरीच. अशी कल्पना करुन प्रथम या माणसाला गावातून हाकलून काढा अशी म्हणायची पद्धत. हूँ म्हणून मुलांचा घोळका माझ्या पाठीमागे लागायचा. वाईट वाटायचे, परंतु जिद्द सोडली नाही. प्रथम एक-दोन शेतकऱ्यांनी गॅस प्लँट बसवून घेतला. घरात आपल्याच गाईगुरांचे शेण, यातून जो गॅस येतो त्यावर स्वयंपाक करणे किती सुलभ आहे हे तेच लोक इतरांना समजावून सांगू लागले. ज्यांचे शिकण्याचे वय आहे व तेवढी सवड त्यांना आहे त्यांनी शाळेत शिकवायला पाहिजे. आपल्या घरच्या कामामुळे शाळेला जाऊ शकत नाहीत, अशांसाठी सुद्धा काही गोष्टी समजावून सांगण्याची गरज आहे असे मला वाटू लागले. स्वातंत्र्य संग्रामाच्या वेळेला अन्यायी इंग्रज सरकारच्या विरोधात भारतीय लोक लढायला तयार झाले पाहिजेत, यासाठी रात्रीचा दिवस करुन लोकांना जागे करण्याचे काम सभासंमेलन घेऊन तर कधी गाणी-लेख लिहून केलं. स्वराज्य आलं. आता भारत मातेला सुराज्य बनवायचे आहे यासाठी शिकलेल्या प्रत्येक माणसाला काम करावे लागणार आहे. असे असताना मागासलेल्या गावातून शाळेत शिक्षक म्हणून काम करणारे नियमित शाळेवर जाऊन का शिकवत नाही? या संबंधातले तालुक्याच्या ठिकाणी असणारे अधिकारी का यांना सांगत नाहीत? हे तर खूप शिकलेले आहेत? मग असे का? अशा अनेक गोष्टींनी अस्वस्थ व्हायला लागायचे. तरी जेवढे आपल्याला जमेल तेवढे काम करायला पाहिजे, असे सतत वाटत रहावयाचे.

आपल्या स्वतंत्र भारत सरकारने (इंदिरा गांधी पंतप्रधान) आणीबाणी पुकारुन जयप्रकाश नारायण, सदाशिवराव भोसले तसेच भारतमातेच्या अनेक सुपुत्रांना जेलमध्ये ठेवले. विचार करु लागलो पंडित जवाहरलाल सारख्या जगप्रसिद्ध पंतप्रधानांनी आपला देश पुढे घेऊन जाण्यासाठी कायकाय केले? आणि इंदिरा गांधी अशा का वागल्या? खूप वाईट वाटायचे. अशा वेळेला याबद्दल बेळगावमध्ये फारशी चर्चा वगैरे झालेली आठवत नाही. डावा विचार (मार्क्सिस्ट) ठेवून काम करणाऱ्या तरुण मंडळींनी पण फारसा विचार केला नाही. 'साधना' साप्ताहिकात महाराष्ट्रात एस.एम.आण्णा व इतर मंडळी गावा-गावांना जाऊन अन्यायाच्या विरोधी सभा घेत होते, लेख लिहीत होते. प्रभाकर मराठे यांना सत्याग्रह केला म्हणून व सर्वोदयाशी संबंधित म्हणून नारायण पवार तसेच उर्मिला मराठे तरुण शांतिसेना सदस्य म्हणून त्यांना जेलला पाठवून दिले. आपल्या सरकारबद्दल अनादर निर्माण होऊन राजकारण नावाची एक वेगळीच गोष्ट असते असे हळूहळू कळू लागले. त्यानंतर बऱ्याच गोष्टी साधनेमधून गटचर्चेतून कळत गेल्या, आणि त्या म्हणजे आर्थिक विषमता व सामाजिक विषमता. आर्थिक विषमता घालविण्याचे मुख्य काम असताना आपले सरकार करताना दिसत नाही. गरिबांना शेताचा तुकडा का होईना मिळावा यासाठी संत विनोबाजींनी भूदान आंदोलन केले याचा अर्थ संपूर्ण कळला नसला तरी विचार करायला प्रवृत्त केले. भारत देशाच्या समाजाचे विश्लेषण (मार्क्सच्या विचारांच्या अंगाने) थोडे-थोडे ऐकून माहीत होते. समाजव्यवस्थाच चुकीची आहे की काय असा प्रश्न पडू लागला.

आपला स्वतंत्र भारत देश लोकशाही असल्यामुळे दिल्ली येथे वयात आलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुषांनी मतदान करुन आपले प्रतिनिधी दिल्लीला पाठवून देण्याची प्रथा यातून तयार झालेले सरकार या देशातील गरीब-श्रीमंत, अल्प-संख्यांक, दलित, मुसलमान, अपंग या सर्वांची काळजी घेण्यासाठी डॉ. बाबासाहेबांच्या अध्यक्षतेखाली घटना समिती तयार झाली. या घटनेच्या आधाराने देशाचा कारभार करणारी मंडळी दिल्ली आहे. ही सर्व मंडळी अशिक्षित तर मुळीच नाहीत, खूप शिकलेली आहेत. देशाच्या कारभाराची सत्ता त्यांच्या हातात असताना स्वतंत्र होऊन २७-२८ वर्षे झाली तरी आपल्या देशातील गरिबांची संख्या कमी होताना दिसत नाही. पगार वाढीसाठी कामगारांना लढा द्यावा लागतो. मागासलेल्यांवर गावपातळीवर प्रतिष्ठित मंडळींकडून अन्याय होतच आहेत. मग भारत देशाला स्वातंत्र्य मिळवून दिलेल्या नेते मंडळींच्या स्वप्नाचे काय झाले? नेमके कोठे बिघडते आहे? आपण सारे भाऊ-भाऊ, भारतीय संस्कृती, गोप्या आणि अखेर लिहिलेला नवा प्रयोग ही पुस्तके लिहून साने गुरुजींचे काय झाले?

म. गांधीजींच्या स्वप्नातील भारत व हिंदस्वराज्य या पुस्तकातून आपण काय बोध घेतला? सर्व काही मला न कळण्यासारखे! कोणाकडेही बोलण्याची सोय नाही. कारण

सगळे एकाच बोटीत बसून निघालेले (माझ्यासकट). मी अनेक आंधळ्यांना (काहीच दिसत नाही) बघितलेले होते, बघत होतो. पण असे असूनसुद्धा आपल्या परीने धडपड चालूच आहे. हे पाहून माझ्यासारख्याला आत्मपरीक्षण करायला प्रवृत्त व्हावे लागत असे. काहीतरी करत राहिले पाहिजे असे वाटून कामाला लागणे हे रोजचेच होऊन बसले. पंतप्रधान इंदिरा गांधींनी देशात आणीबाणी आणली. देशासाठी निस्वार्थीपणे लढलेल्या, तुरुंगवास भोगलेल्या, सर्वस्वाचा त्याग केलेल्या अनेक मंडळींना तुरुंगात २ वर्षापेक्षा जास्त दिवस कैद करून ठेवले. या विरोधात साधना साप्ताहिक सोडले तर कोणतेच पत्र लिखाण करण्यास पुढे आले नाही. आदरणीय एस.एम. अण्णा व त्यांचे अनुयायी / साथींनी गावागावांना जाऊन लोकजागरणाचे काम सोडले तर सगळीकडे अंधारच. याचा अर्थ आपल्या देशात शिकलेली मंडळी नव्हती का? शाळा-कॉलेजमध्ये अध्यापनाचे काम करणारी मंडळी दिवसेंदिवस वाढतच होती. त्यांना आपण विद्याभूषित, वेगवेगळ्या क्षेत्रात मोठमोठ्या पदव्या घेतलेले, समाजात इतरांपेक्षा श्रेष्ठ अशी फुशारकी मारत फिरणाऱ्यांचा विवेक जागा होऊन अन्यायाच्या विरुद्ध त्यांच्या लेखणी का सरसावल्या नाहीत? जयप्रकाश नारायण यांनी सुरु केलेल्या भ्रष्टाचाराच्या आंदोलनाचे नेतृत्व या मंडळींनी का केले नाही? शिकलेली माणसं एवढी स्वार्थी, सत्तांध, संवेदनाहीन कशी काय बनली? माणूस मुळात स्वार्थी, आत्मकेंद्रित असतो असे म्हणतात. चांगला माणूस होण्यासाठी सर्वांनी शिक्षण घ्यायला पाहिजे. मग आज आपल्या देशाची परिस्थिती अशी का? नेमके आपल्या सरकारचे, शिक्षण देणाऱ्यांचे व शिक्षण घेणाऱ्यांचे कोठे चुकत आहे? हा प्रश्न मला सतत सतावू लागला.

असे अनेक प्रश्न सतत मनात येऊन अवस्थ व्हावे लागत असले तरी कडोली भागातील जवळ जवळ १०० टक्के अशिक्षित/निरक्षर असलेली वास्तवता विसरायला होत नव्हती. यांच्यासाठी काहीतरी करायला पाहिजे असे वाटत होते. पंतप्रधान इंदिरा आम्मांच्यामुळे समाजात काम करणाऱ्या संस्था, व्यक्ती हळूहळू गोगलगाईप्रमाणे पाय पोटात घेऊन बसल्या. नेमकं याच वेळेत महाराष्ट्रातील थोर विचारवंत श्री. वसंत पळशीकर यांचा परिचय झाला होता. भीत-भीत अधूनमधून त्यांना पत्र लिहायला सुरुवात केली होती. मध्ये फादर जो चनकला या ख्रिश्चन फादरांचा परिचय झाला. त्यांना चर्चमध्ये काम करण्याची आवड नव्हती. आम्ही दोघेही समसुखी - समदुःखी होतो. ग्रामीण भागात लोकांसाठी काम करायचे नक्की होऊन 'जनजागरण' नावाची संस्था काढली. या संस्थेची घटना बनवण्याच्या कामात वसंत अण्णांनी खूप मदत केली. लोकांना अर्थात न शिकलेल्या मुला-मुलींना साक्षर करण्याचे काम नक्की झाले. सुरुवातीला कडोली भागातील अत्यंत मागासलेल्या गावांतून केंद्र सुरु करण्यासाठी गावाचा सर्व्हे केला. साक्षरतेच्या केंद्रात काम करण्यासाठी मित्रांचा शोध सुरु केला. काही गावांतून चौथी, पाचवी पर्यंत शिकलेले, काही ठिकाणी आठवीपर्यंत शिकलेले तरुण मित्र-मैत्रिणी मिळाल्या. यांना घेऊन शिक्षणाचा प्रयोग करावयाचा होता. मनातील नाना प्रश्न बाजूला टेवून मनाची मरगळ दूर सारून महिन्याभराच्या आत डोंगराळ भागातील १०-१२ गावांना भेट देऊन रात्रीचे वर्ग सुरु करण्यासाठी पूर्वतयारी केली. १९७८ मध्ये कट्टणभावी व बंबरगा येथे रात्रशाळा काढल्या. त्यानंतर कडोली कार्यात भागातील १५ गावांतून रात्रशाळा सुरु झाल्या. या शाळा प्रामुख्याने प्रौढांसाठी असतील असा विचार होता. परंतु १८ वर्षानंतरचे कोणी आले नाहीत. एक-दोन ठिकाणी प्रयत्न केला. काही दिवस आले. त्यानंतर ते आले नाहीत. चौकशी करताना असे कळाले की, आता आम्हाला शिकून काय करावयाचे आहे? शिकलेल्या लोकांनाच काम/नोकऱ्या मिळायला तयार नाहीत. मुलांना शाळा शिकवणारे शिक्षणाचा संबंध नोकरीशी (जगण्यासाठी उत्तम) लावतात हे लक्षात आले. त्यावेळेला मला पण यांत फारसं चुकीचं वाटलं नाही. परंतु जे शाळेला गेले नाहीत त्यांना लिहायला वाचायला शिकवलं पाहिजे. त्याचबरोबर शेतीसंबंधात गायी-गुरांच्या संबंधात समजून घेतलं पाहिजे यासाठी जन-जागरण संस्था प्रयत्न करु लागली. यात मी थोडा जास्त.

रात्रशाळेचे काम उत्तम चालावे तसेच ग्रामीण भागातील लोकशिक्षण व्हावे यासाठी वसंत पळशीकर अण्णांना जन-जागरण संस्थेत बोलावून संस्था चालकांच्या बरोबर संस्थेचा उद्देश (ध्येय-धोरण) स्पष्ट करून घेण्यासाठी व बऱ्याच वेळा बैठका घेतल्या. रात्रशाळेत काम करणाऱ्या वर्गसंघटकांची शिबिरं घेतली. शिक्षण कामाचा बऱ्याच वर्षांचा अनुभव असलेल्या श्री. दत्ता साबळे (पंढरपूर) यांची संस्थेशी गाठ घालून दिली. या दोन महान कार्यकर्त्यांच्या बरोबर चर्चा

केल्या. नंतर माझ्या लक्षात आले की, आपले काम फक्त लोकांना साक्षर करण्यापुरते न राहता, समाजात बदल घडवण्याचा पण विचार करायला पाहिजे. (त्या घडीला मला समाजपरिवर्तनाचे काम असे म्हणण्याचे धाडस झाले नाही. आजसुद्धा ते नाही.) वसंत पळशीकर अण्णांनी गांधी विचाराने काम करण्याचे ठरवून ८-१० वर्षे रात्रशाळा चालविण्याचे काम केले. त्याचबरोबर बऱ्याच मागासलेल्या गावांतून बालवाड्या व मुलींच्यासाठी शिवणकामाचे वर्ग जन-जागरणाने सुरू केले. प्राथमिक शाळेतून मुलांचे शिक्षण होताना दिसत नाही. आपण मात्र मुलांना शिकवण्याचे काम चांगले केले पाहिजे असे ठरवले.

डोंगराळ भागातील ज्या गावांतून शाळा आहे परंतु शिक्षक नाहीत, तसेच ज्या गावांतून शाळा नाहीत अशा गावांतील तसेच ८-१२ वर्षापर्यंतचे सर्व मुलं-मुली आमच्या या रात्रशाळेत येऊ लागले. विशेष करून मुली येऊ लागल्या. दिवसभर गायी-गुरांमागे जायचे, मोलमजुरीला जावयाचे, कधी लहान मुलाला सांभाळायला राहणारी सर्व मुलं-मुली या आमच्या रात्रशाळेत येऊ लागली. संध्याकाळी घरी आल्या-आल्या अगदी दिवस-शाळेप्रमाणे डोकींचे केस विंचरून, हातात एक दप्तर व बसायला एक पोतं घेऊन केंद्राकडे पळत येत. त्यांना पाहून लक्षात यायचे, की त्यांना शिकण्याची भूक किती आहे! सरकार यांच्यासाठी काहीच करत नाही याबद्दल वाईट वाटायचे. ज्या गावांतून शाळा नाहीत अशा ठिकाणी सरकारने शाळा सुरू करावी. जेथे शाळा आहेत तेथे शिक्षक नियमित यावेत यासाठी लोकांना संघटित करून तालुक्याच्या शिक्षण अधिकाऱ्यांना भेटायला सुरुवात. ही गोष्ट शिक्षक मंडळींना आवडली नाही. यांचा रोष पत्करून सुद्धा आमचे काम आम्ही चालूच ठेवले. कट्टणभावी गावातील लोकांच्या पुढाकाराने प्राथमिक शाळेत येणाऱ्या शिक्षकांची एक महिन्याची हजरी ठेवली. वर्गांची संख्या पाच आणि शिक्षक तीन. यापैकी रोज एक शिक्षक गैरहजर. मुख्याध्यापक २६ दिवसांपैकी ३ दिवस संपूर्ण शाळेत. १०.३० ला येऊन १२.३० च्या बसने गेलेले १५ दिवस. बाकीचे दिवस गैरहजर. राहिलेले दोन शिक्षक २० दिवस हजर. ही सर्व माहिती तालुका शिक्षण अधिकाऱ्याच्यापर्यंत पोहोचवली. याचा परिणाम म्हणून मुख्याध्यापकांना निलंबित केले. बाकी दोन शिक्षकांचा पगार धरून ठेवला. ही बातमी सर्व भागात पसरली. शनिवारचा दिवस होता. सकाळ शाळा असल्यामुळे सकाळच्या पहिल्या बसला ४ गावाचे शिक्षक माझ्या बसमध्ये चढले. प्रथम गुंजनेट्टी गाव आलं - शिक्षक उतरले नाहीत. पुढं दोन गावं आली पण हे शिक्षक उतरले नाहीत. मी विचार करू लागलो पुढील गावी शिक्षकांची मिटींग असणार. म्हणून हे सर्व शिक्षक उतरत नाहीत. बस बंबरगा गावी आली हे शेवटचे ठिकाण. मी मागच्या दरवाजाने उतरायच्या अगोदर सर्व शिक्षक समोरच्या दरवाजाने घाईघाईने उतरून मला १०-१२ शिक्षकांनी घेराव घातला. मला मध्ये घेऊन एकदम २-३ शिक्षकांनी प्रश्न केला, "आमच्या ऑफिसमध्ये तुझं काय काम?" त्यानंतर मी त्यांना म्हणालो, "शिक्षणाधिकाऱ्याचे ऑफिस हे जसे तुमचे आहे तसे आमचे पण आहे." इतक्यात एक शिक्षक पुढे येऊन धक्का-बुक्की करायला लागला. चर्चा जोरात सुरू होती. इतक्यात गावातील बऱ्याच लोकांचा घोळका तयार झाला. त्यातील एक माणूस शिक्षकांच्या जवळ येऊन म्हणाला, "काय हो, गुरुजी किती वाजले? कोणीच बघायला तयार नाही, ९ वाजून गेले. शनिवारी किती वाजता तुमची शाळा? चला, सर्वजण." गावकऱ्यांत शिक्षकांनी वेळेवर शाळेला येण्याबद्दल हळूहळू जागृती होऊ लागली. ७५% पेक्षा जास्ती शिक्षक वेळेवर शाळेला येऊ लागले. परंतु किती शिकवतात हा प्रश्नच होता.

शिक्षक वेळेवर शाळेत यावेत हे आंदोलन सुरू व्हायला त्याअगोदर १०-१२ वर्षे मुला-मुलींना रात्री शाळा भरवून शिक्षण देण्याचे काम जन-जागरण संस्थेने केले. हा अनुभव सांगण्यासारखा आहे. अत्यंत कमी शिकलेले आपले वर्गसंघटक आपल्याच गावातील मुलांना शिकवण्याचे काम अत्यंत आवडीने, निष्ठेने केल्यामुळे येणाऱ्या मुलांपैकी ४० % मुलं उत्तमरित्या लिहायला-वाचायला शिकली. यात मुलींचे प्रमाण जास्त होते. रात्रशाळेत शिकून बाहेरून ७ वीच्या परीक्षा पण काही मुलांनी दिली. परीक्षा कशा झाल्या याबद्दल विचारायला नको! कारण सरकारी शाळेतून फॉर्म भरावा लागला होता. रात्रशाळेचे काम विशेष करून दलित वस्तीतून व बेरड समाज असलेल्या गावांतून झाले. येथे येऊन शिकलेल्यांपैकी ८-१० जण बालवाडी चालविण्याचे काम, आरोग्याचे काम करु लागले. बरेच तरुण उत्तम गवंडी, मेस्त्री व सुतार कामगार झाले. त्या वेळेला अगदी लहानशा गावात अत्यंत गरिबाचा मुलगा रात्रशळेत शिकला. त्याने पुढाकार घेऊन दुधडेअरी काढली. आजसुद्धा तो या डेअरीचा सेक्रेटरी

म्हणून काम करीत आहे. वर्गसंघटकांपैकी बरेच तरुण पुढाकार घेऊन गावातील सार्वजनिक कामात भाग घेऊ लागले. लोकांना एकत्रित करुन बचत गट तयार करून अति व्याजाच्या कर्जातून बाहेर काढण्याचे काम केले. आपल्या कामात चोख राहून कार्यकर्ते काम करत असलेले बघून अत्यानंद होत असे. या कामामुळे जन-जागरण संस्थेचे खूप चांगले, अत्यंत प्रामाणिक असे कार्यकर्ते मिळाले. आज या संस्थेची काय स्थिती असणार हे माहीत नाही. कारण संस्था सोडून दहा वर्षांपेक्षा जास्त दिवस झाले. शाळा-कॉलेजमध्ये जाऊन शिकणारी मंडळी व रात्रशाळेत साक्षरतेपुरती शिकलेली असली तरी मला या मुलांतून वेगळेपण दिसून येत होतं. हे सर्व चालले असताना मनात सतत विचार येत की शाळा-कॉलेजात शिकणाऱ्या मुलगा/मुलींचे समोर पुढे काय? असा प्रश्न. मुलींपैकी कोणीच कॉलेजला जात नाहीत. या भागातून १० वी पास होण्याऱ्यांपैकी १०% मुलंच कॉलेजला, बाकी लोकांची आर्थिक स्थिती अत्यंत वाईट. इयत्ता १० पर्यंत हायस्कूलला गेलेल्या मुलांची शेताकडे जाण्याची आवड हळूहळू कमी झालेली. शेतात काम करणे कमी प्रतिष्ठेचे. यासाठी आईवडिलांनासुद्धा मुलगा शेतीत राहावा असे वाटत नाही. उलट प्रत्येक शेतकरी म्हणतो, माझ्या नशिबाला जे कष्ट झाले ते माझ्या मुलाला नको. मुलाला पण हेच पाहिजे असते. यासाठी गावाजवळच्या बेळगाव शहरात काय काम मिळते का ते पाहतो. (गवंडी, सुतार इत्यादी.) काम मिळालेच नाही तर मुंबई-पुण्यासारख्या शहरात हॉटेलमध्ये काम करु लागतो. अलीकडे शहराच्या ठिकाणी काम करणे तितकेसे सुरक्षित वाटत नाही. कारण आजपर्यंत कट्टणभावी गावातून २५-३० जण एड्सची शिकार बनून केव्हाच त्यांनी आपलं जीवन संपवलं. बायका-मुलांचे हाल कुत्रा खाऊ नये अशी स्थिती झाली आहे.

कट्टणभावी या गावाच्या जवळच्या हंदिगळूर या गावी नव्यानं हायस्कूल निघाले. विनाअनुदानित शाळा, सायन्सचे शिक्षक कोणीच शिकवायला तयार नाहीत. गरिबांची बरीच मुलं हायस्कूलला जाऊ लागली. रात्रशाळेच्या कामाच्या निमित्ताने या भागातील बऱ्याच गावांना जात असे. रात्रशाळेचं काम संपल्यानंतर रात्री ९ ते ११-१२ पर्यंत हायस्कूलला जाणाऱ्या मुलांना त्यांच्या मागणीवरून आठवड्यातून दोन दिवस जाऊन गणित शिकवू लागलो. बरीच मुलं गणित विषयात नापास होतात. त्यांच्या नशिबी नापास होणे येऊ नये म्हणून. या हायस्कूलची पहिली बॅच १० वी च्या परीक्षेला बसणार होती. दक्षिण महाराष्ट्र शिक्षण मंडळाच्या अध्यक्षांच्या परवानगीने वर्षभर दिवसातून ३-४ तास या शाळेतील मुलांना गणित शिकवण्याचे काम केले. याचा अर्थ एवढाच, वासरात लंगडी गाय शहाणी. सुरुवातीला मुलं खूप आवडीनं शिकत असत. मलाही शिकवायला खूप आवडायचं. आनंद मिळायचा. एवढ्या वर्षात मला एक गोष्ट लक्षात आली ती म्हणजे प्रेमाने मनापासून मुलांना शिकवलं तर विद्यार्थी/विद्यार्थिनी किती ही ढ असली तरी ती शिकू शकतात. असा माझा सिद्धांत तयार झाला. हायस्कूल अनुदानित झाले. सायन्सचे शिक्षक नियमित येऊ लागले. यासाठी हायस्कूलमध्ये जाण्याचे थांबले तरी गावागावातून जाऊन मुलांना शिकवण्याचे चालूच होते. या निमित्ताने मुलांच्याबरोबर बस-उठ व्हायची, बऱ्याच घरच्या मंडळींशी परिचय व्हायचा. ही सर्व मंडळी भेटल्यावेळी खूप मनापासून बोलायची. परंतु एक प्रश्न मनात सतत यायचा आणि तो म्हणजे ही मुलं १० वी होतील, पुढे कॉलेजला जातील. ही सर्व मुलं कॉलेजमध्ये कशी वागतील? पदवी घेतली. नोकरी पण लागली. नोकरी करताना ही मंडळी आपल्या सर्वसामान्य लोकांबरोबर कशी वागतील? सरकारी शिक्षण संस्थेत काम करणाऱ्या मंडळींचा अनुभव यापूर्वी सांगितलाच आहे. या सर्व विद्यार्थी मित्रांबरोबर संपर्क आल्यावेळी आपण अभ्यास करून व्यवस्थित पास होण्याचे ठरवावे असे सांगावे लागू लागले. कारण मुलांचे परीक्षेत अभ्यास न करताच बसण्याचे प्रमाण दिवसेंदिवस वाढत होते. यावेळेला मला एक प्रसंग आठवला. मी १० वी च्या परीक्षेच्या वेळेला परीक्षा हॉलमध्ये बसलो आहे. प्रश्नपत्रिका मिळाली. प्रश्नपत्रिका वाचून झाल्यानंतर माझ्या मागे असलेले वर्गमित्र काय करत आहेत हे पाहण्यासाठी थोडा वेळ वळून पाहतो न पाहतो, परीक्षा प्रमुखाने मला उठवून बाहेर घेतलं. माझी खूप तारांबळ उडाली. इतक्यात माझ्या शाळेचे मुख्याध्यापक आले म्हणून पेपर लिहू शकलो. ही तर केंद्रपरीक्षा होती. शाळेत असतानासुद्धा परीक्षेत बघून लिहिणं नावाची गोष्ट मला तरी माहीत नव्हती. कॉलेजमध्ये चर्चा चालावयाची. परंतु या फंदात कधी पडलो नाही. जमेल तेवढे अभ्यास करून ३८ ते ४०% मार्क्स घेऊन पास होणाऱ्यांपैकी मी एक होतो. शाळेचा निकाल चांगला लागावा यासाठी शिक्षकच स्वतः परीक्षेच्या वेळेला






चिठ्ठ्या देणे, पेपर तपासताना पैसे देऊन मुलांचे मार्क्स वाढवून आणणे असे प्रकार सर्रास घडताना पाहून मी गणित शिकवण्याचे सोडून दिले. तरी प्रश्न शिल्लक राहिला आणि तो म्हणजे सर्व समाज शिकून शहाणा झाला पाहिजे. अशा या शिकण्यातून समाज कसा शहाणा नीतीमान होणार?

जन-जागरण संस्थेने सर्वसामान्य लोक व जे शाळेला जाऊ शकले नाहीत, गेले तरी मध्येच शाळा सोडून दिली अशा लोकांसाठी शिक्षण देण्याचा नव्हे फक्त साक्षर करण्याचा कार्यक्रम चालवला. यातून जे वेगवेगळे शिक्षणाच्या संदर्भात प्रश्न आले, त्यांना घेऊन शिक्षणाचे काम जनजागरणाने पुढे न्यावे यासाठी माझ्या परीने मी संस्था चालकांना समजावून सांगत होतो. यासाठी श्री. वसंत पळशीकर यांना बेळगावला बोलावण्यात पुढाकार घेऊ लागलो. संस्था चालकांची परवानगी अतिकष्टाने घेऊन शिक्षणसंबंधात चर्चा करण्यासाठी वर्षातून एकदा ३ दिवसासाठी होणाऱ्या नेटवर्क मीटिंगला जाऊ लागलो. मिटींग करून परत आल्यानंतर मिटिंगमध्ये काय झाले हे स्टाफ मिटिंगमध्ये सांगण्यास परवानगी विचारली असताना फारसा चांगला प्रतिसाद मिळाला नाही. खाजगीमध्ये मला सांगण्यात आले की सरकारने आता सर्व गावांतून शाळा काढल्या आहेत आपण आता यापुढे हा कार्यक्रम चालू ठेवणार नाही. समाजातील आर्थिक, सामाजिक विषमता जाऊन आजचे स्वार्थी राजकारणाऐवजी खऱ्या अर्थाचे राजकारण समाजात येऊन समाजपरिवर्तन झाले पाहिजे. असे झाले तरच समाजात बंधुभाव निर्माण होऊ शकेल असे माझे मन मला सांगत होते. याच बरोबर माझे मन मला सांगत होते, की सध्याच्या सरकारच्या शिक्षणाच्या कामातून समाजातील विषमता कमी होण्याऐवजी वाढतच जाणार असे दिसत आहे. महाराष्ट्राला धरुन दक्षिण भारतातील बऱ्याच ठिकाणी शिक्षणाचे वेगवेगळे प्रयोग चालले आहेत. असा प्रयोग करणारी ३०-३५ मंडळी गेली १२-१३ वर्षे एकत्रित येऊन शिक्षणातील प्रयोग करताना काय अनुभव येत आहेत याबद्दल चर्चा करून आपल्या प्रयोगात शिक्षणाच्या अंगानी कोणकोणत्या गोष्टी आणता येतील याचा विचार होताना दिसत होता. (या नेटवर्क मिटिंगा मला सर्व कळल्या आहेत असे मला वाटत नाही.)

समाजपरिवर्तन व्हावयाचे असेल तर लोकांचे खऱ्या अर्थाने शिक्षण व्हायला पाहिजे. असे मनात असतानाच, वसंत पळशीकर अण्णा बेळगावला आले होते. मी जन-जागरण संस्था सोडून तसा मोकळा झालो होतो. तरी धनगर मंडळींच्या बरोबरचे व सरकारच्या व खाजगी मालकीच्या जागेत झाडं लागवण व ती जगवून वाढविण्याचे काम मी स्वत: होऊन स्वीकारलेलें होतं. तसं हे काम माझ्या आवडीचं होतं. या कामाला जोडून खऱ्या अर्थाने लोकांचे शिक्षण व्हावे यासाठी शिक्षण काम आपल्या भागात व्हावे असे माझ्या मनात होते. या सर्व गोष्टी वसंत पळशीकर अण्णांच्या बरोबर मोकळ्या मनाने कधी बोललो नाही. परंतु वसंत अण्णांना याची कल्पना आलेली असणार आणि म्हणून ते वाईला असताना बाकी इतर सर्व काम बाजूला ठेवून बेळगाव भागातील कार्यकर्त्यांच्या बरोबर या भागातील काम नव्यानी उभं करणं व त्याला आकार देणं यासाठी वारंवार येऊ लागले. श्री. सुभाष ओऊळकर (बेळगाव) यांच्या घरी कार्यकर्त्यांची मिटिंग झाली. या मिटिंगला कट्टणभावी भागातील ८-१० तरुण कार्यकर्ते श्री. वसंत पळशीकर, रामदास/रमाक्का (गुडलूर, केरळ) व श्री. सुभाषदादा पण होते. दोन दिवस चर्चा केल्यानंतर बेळगाव शहरातील काही लोकांच्या (सुभाषदादा, राम आपटे दादा, दिलीप कामत व इतर मंडळी) मदतीने काम करण्याचे ठरले. कार्यकर्त्यांच्या बरोबर कोणत्या प्रकारच्या कामापासून प्रत्येकाला आवडेल याचा अंदाज घेण्याचे पण ठरले. या कार्यक्रमात सहभागी होऊ इच्छिणाऱ्या प्रत्येक कार्यकर्त्याने मुलांच्या शिक्षणापासून सुरुवात करण्याचे ठरले. बेळगाव तालुक्याच्या उत्तरभागातील काही गावांतून व जंबोटी खानापूर तालुका भागातील ३-४ अत्यंत मागासलेल्या छोट्या खेड्यातून व गवळीवाड्यातून कामाला सुरुवात करायचे ठरले. यासाठी भारताक्का, बसवंत यांनी जबाबदारी घेतली. यशवंत, शंकर कल्लरी, पिराजी, अशोकदादा, दिलीप कामत व शिवाजी यांनी मदत करायची असे ठरवून जून महिन्यात केंद्रांना सुरुवात झाली. केंद्रात काम करणाऱ्या वर्गसंघटकांना नक्की करून वसंत अण्णांनी दोन-दोन महिन्यांनी एकदा येऊन त्यांचे शिबीर घेऊन हे काम ग्रामसेवेचं आहे. ग्रामसेवा/लोकसेवा मनात ठेवून आपल्या स्वतःच्या घरचे काम सांभाळून हे काम करावयाचे आहे. ही नोकरी नाही. ही कल्पना सर्वांना कळवून देण्याचे काम केलं. त्याचबरोबर महाराष्ट्रातून बऱ्यापैकी अधिक मदत पण मिळवून दिली.



अनुक्रमणिका

# अंततः परंतु मूलतः
# 'माऊशो' मानवी ऊर्जेचा शोध - इतरांत आणि स्वतःतही

देवदत्त दाभोलकर

**शैक्षणिक प्रदूषण आणि आपण**

शिक्षक - प्राध्यापक - प्राचार्य - संस्थाचालक, शासन, विद्यार्थी, पालक आणि समाज.

१. सुमारे पन्नास वर्षांपूर्वी मौनी विद्यापीठ गारगोटी येथे काही खेडुतांशी बोलत होतो. विद्यार्थी कसे नीट शिकत नाहीत हे मी त्यांना तावातावाने समजावून सांगत होतो. एका खेडुताने एका वाक्यात माझा त्रिफळा उडवला. तो म्हणाला, 'अहो, जे आडातच नाही ते पोहोऱ्यात कुठून येणार ?'

२. त्यानंतर काही वर्षे गेली. मी प्राचार्य झालो. माझा एक प्राचार्य मित्र मला फोनवर म्हणाला, "अरे, काल मी एका व्यापारी मित्राबरोबर साड्यांच्या दुकानात गेलो होतो. त्याने तीन हजार रुपयांची साडी आपल्या बायकोसाठी विकत घेतली आणि म्हणाला, "तूही वैनींसाठी साडी घे." मी त्याला म्हणालो, "अरे मी तुझ्यासारखे ब्लॅक मार्केटिंग करत नाही." तो मला म्हणाला, "अभ्यास न करता शिकवता म्हणजे काय करता रे ?" तोही यथाकाल नामवंत कुलगुरु झाला. परंतु त्या मित्राचे उत्तर आम्हाला सतत सलत राहिले.

३. ही कोणीतरी रचलेली कथा आहे. परंतु मी ती अनेकदा संगितली आहे.

प्रसंग महाभारतातील कुरुक्षेत्रावर झालेल्या कर्ण व अर्जुन यांच्यामधील अंतिम युद्धाचा आहे. दोघात युद्ध सुरू झाले. अर्जुनाने बाण मारला आणि कर्णाचा रथ कित्येक योजने मागे हटला. कर्ण परत लढाईला आला. त्याने एक बाण मारला आणि अर्जुनाचा रथ केवळ एक तसूभर मागे हटला. श्रीकृष्ण म्हणाला, "शाबास! कर्णा शाबास." अर्जुन चिडला. म्हणाला, "मघाशी मी त्याचा रथ कित्येक योजने मागे हटवला तर तुझी दातखीळ बसली होती आणि कर्णाचे - माझ्या शत्रूचे तोंड भरून कौतुक करतोस!"

श्रीकृष्ण म्हणाला, "अर्जुना, तुला बुद्धी जरा कमी आहे असा मला प्रथमपासून संशय होता. अरे, तुझ्या रथावर सारथी म्हणून मी बसलो आहे, मारुती रथावर बसून तुझ्या रथाचे रक्षण करीत आहे. हा रथ एक तसूभर मागे हटवायचा तर किती पराक्रम आवश्यक आहे याची तुला कल्पना नसली तरी मला आहे."

गुणवत्ता स्पर्धेचा विचार करतो त्यावेळी ही गोष्ट आपण सर्वजण विसरतो. वरिष्ठवर्णीय, वरिष्ठवर्गीय व अनेकदा दुर्दैवाने 'क्रीमी लेयर' सुद्धा.

४. ही एक गोष्टही मी अनेक वेळा सांगितली आहे. गोष्ट अशी आहे. तीन पाथरवट मंदिर उभारणीसाठी दगड फोडत होते. तिकडून एक वाटसरू आला. त्याने एकाला विचारले, "तू काय करत आहेस?" तो पाथरवट भडकला, "तुला दिसत नाही मी काय करत आहे? भर दुपारचे उन्ह वर रणरणते आहे. घामाच्या धारा लागल्या आहेत. दगडाच्या कपच्या अंगावर उडत आहेत. डोळ्यात जात आहेत. आणि तू मोठी लांब जीभ काढून मला विचारतोस मी काय करतो. चल, जा काळे कर."

तो वाटसरू दुसऱ्या पाथरवटाकडे जातो आणि त्याला विचारतो, "बाबा, तू काय करत आहेस ?"

पाथरवट म्हणाला, "काय करणार, घरी बायको आहे, पाच लहान मुले आहेत. म्हातारी आई अंथरुणाला खिळली आहे. मिळेल ते काम करून गुजराण तर केलीच पाहिजे. जा बाबा पुढे. उगाच माझा वेळ खाऊ नको."

वाटसरू तिसऱ्या पाथरवटाकडे गेला. त्याला त्याने तोच प्रश्न विचारला, "बाबा, तुझे हे काय चालले आहे?"

पहिल्या पाथरवटाप्रमाणे हाही प्रश्न ऐकून भडकला. परंतु अगदीच वेगळ्या कारणासाठी. तो म्हणाला,

"दिसत नाही तुला मी काय करतो आहे ते? मी देवाचे मंदिर बांधत आहे."

अनुक्रमणिका

तिघेही तेच काम करत होते. तेच कष्ट काढत होते. तीच मजुरी घेत होते. शिक्षक प्राध्यापकांच्या अनेक मेळाव्यात मी ही कथा सांगितली आहे.

'हे तिघेही सारखेच कष्ट काढत होते. परंतु या तिघात सर्वात सुखी कोण होता?' मी विचारत असे

क्षणभरातच सामूहिक उत्तर येत असे.

'तिसरा.'

कारण त्याने त्याच कामाला आपल्या जीवनात काही ध्येयवादाशी जोडून घेतले होते.

हे असे असताना सार्वत्रिक अनास्था, मरगळ दिसते. असे का ?

याचा विचार शिक्षणक्षेत्रात काही घडावे असे वाटणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने, संस्थेने केला पाहिजे. स्वत: प्रयोग केले पाहिजेत. आजवर अनेक व्यक्ती व संस्थांनी केलेले आहेत, त्यातून बोध घेत पाऊल पुढे टाकले पाहिजे. सहज सफलता मिळेल अशी परिस्थिती नाही परंतु त्यातच खरे आव्हानही आहे. एडिसनने चाळीस हजार प्रयोग केले आणि शेवटी त्याला बल्बसाठी फिलॅमेंट तयार करता आला.

आणि - आणि सारे जग उजळून आले.

ज्या व्यक्ती संस्था यांना यात रस असेल त्यांच्यासह असे प्रयोग पुढील तीन वर्षात केले जावेत असे मला वाटते.

अशा वृत्तीच्या काही व्यक्ती व संस्था आजही माझ्याबरोबर यात सहभागी होत आहेत याचा मला आनंद आहे.

'शिक्षण आणि समाजपरिवर्तन' या एकूण प्रकल्पापैकी हा एक स्वतंत्र परंतु महत्त्वाचा भाग असेल.

'मानवी ऊर्जेचा शोध' (माऊशो) इतरांत व स्वत:तही असे या प्रयोगाचे नामाभिधान मी केले आहे.

☑ ☑ ☑

श्रीपाद १९५८ च्या सुमारास मौनी विद्यापीठ, गारगोटीत स्थिरावला. प्रयोग परिवारसाठी नोकरी सोडून संपूर्ण वेळ त्याने कृषि संशोधनात व दरिद्री लोकांच्या विकासासाठी दिला. गारगोटीत दीर्घकाळ त्याचे वास्तव्य झाले, तेथेच त्याचा वृंदा अभ्यंकरशी प्रेमविवाह झाला. त्याचे तीनही मुलगे अभिजित, अतीश, अविनाश यांचे संपूर्ण शालेय शिक्षण तेथीलच शाळेत झाले.

एकदा दिल्लीहून जे. पी. नाईकांचा त्याला फोन आला. 'कृषितज्ज्ञांची बैठक आहे, तुमच्या प्रयोग परिवारातील काही पाठवावे.' त्याप्रमाणे श्रीपादने त्यांच्याकडे एक अननस व सोबत एक सीलबंद चिट्ठी पाठवली व त्यांना लिहिले, 'आतील अननसाच्या फोडी करून वाटाव्यात. त्या खाऊन झाल्या की सोबतचे सीलबंद पाकीट उघडून आतील चिठ्ठी वाचावी.'

चिठ्ठीत लिहिले होते, 'हा अननस केवळ माझ्या दीड वर्षाच्या मुलाच्या मूत्रावर वाढवला आहे.' (ही सफलता अभिजितची, अतीशची की अविनाशची? हा प्रयोग परिवारातील Million dollar question आहे.)






# माला : नियत-अनियतकालीक

## उत्तर-नव भारत : विकास प्रतिमाने

### अमर्त्य सेन

भारतापुढील समस्या आणि उत्तरे - 'अमर्त्य सेन' यांच्या 'Inequality is globalisation's real challenge' या लेखाचा आशय. (सौजन्य : Outlook Business, मार्च २००७)

जागतिकीकरणाला विरोध करणाऱ्या लोकांमध्ये विविध प्रकारचे गट आहेत. जागतिकीकरणामुळे नवीन तंत्रज्ञानाचा वापर होतो व नवीन तंत्रज्ञान सुखी सुसंस्कृत जीवनशैलीला मारक आहे या भावनेने जागतिकीकरणाला विरोध करणारे काही लोक आहेत. परंतु अशा लोकांची संख्या तशी नगण्य आहे. खरा विरोध जागतिकीकरणामुळे विषमता, बेकारी यांच्यात वाढ होते, अतिसमृद्ध थोडे समूह व दारिद्र्यरेषेखालील जगातील सुमारे दोनशे कोटी लोक यांच्यामधील आर्थिक दरी रुंदावते हा आहे.

हे आक्षेप खरे आहेत आणि हे दूर करण्यासाठी - निदान त्यांची धार कमी करण्यासाठी आपल्याला सतत जागरूक व प्रयत्नशील राहिले पाहिजे. त्या दिशेने प्रयत्न खालील स्वरूपाचे असतील.

ते असे :

१. सर्वांसाठी माध्यमिक शालांत स्तरापर्यंतचे चांगले शिक्षण उपलब्ध करून देणे.

२. यापैकी अनेकांना उच्च शिक्षणाच्या संधीही उपलब्ध करून देणे.

३. 'सर्वांसाठी आरोग्य' हा प्रकल्प सफलपणे राबवणे.

४. 'कसेल त्याची जमीन' हे तत्त्व अंमलात आणण्यासाठी आवश्यक ते बदल जमीन धारणा कायद्यात करणे व ते कायदे प्रत्यक्षात अमलात येतील याची दक्षता घेणे.

५. शेतकऱ्यांना पतपुरवठा रचनेत आवश्यक ते फेरबदल करणे.

६. या सर्वांसाठी पूरक असे समाज-परिवर्तन घडवून आणणे.

सर्व प्रकारची आर्थिक विषमता ही राजकीय वर्चस्वातील विषमतेला खतपाणी घालते हा तिचा सर्वात घातक परिणाम आहे.

**चीनचे उदाहरण**

चीनच्या विकासाचे उदाहरण महत्त्वाचे आहे. भारताला काय अनुकरणीय आहे व काय मुळीच अनुकरणीय नाही या दोन्ही अंगांनी आपण चीनकडे पाहिले पाहिजे. समान संधीवर आधारित शिक्षण व आरोग्य क्षेत्रातील कार्यक्रम प्रचंड लोकसंख्येच्या दरिद्री राष्ट्रातही यशस्वीरीत्या कसे राबवले जाऊ शकतात याचे प्रात्यक्षिक चीनने करून दाखवले आहे. भारतात आपण हे करू शकलेलो नाही. सुशिक्षित व आरोग्य-संपन्न जनता हे कार्यक्षमतेच्या दृष्टीने राष्ट्राचे बलस्थान असते. अडचणींना तोंड देत चीनने या दोनही गोष्टी १९८० पूर्वी साध्य केलेल्या होत्या.

१९७९ मध्ये चीनचा नवीन आर्थिक सुधारणांचा कालखंड सुरू झाला. त्या आधी जमीनदारी नष्ट करण्यात आली होती व शेतीचे सामुहिकीकरण करण्यात आले होते. सामूहिक शेतीचा प्रयोग अयशस्वी झाला. शेती उत्पादन घटले. तीन वर्षांत तीन कोटी लोक उपासमारीचे बळी झाले. कठोर हुकुमशाहीमुळे व वृत्तमाध्यमांवरील नियंत्रणामुळे या परिस्थितीचा क्रांतिकारक उद्रेकी विस्फोट होऊ शकला नाही इतकेच. नवीन आर्थिक सुधारणा कालखंडात 'कसेल त्याला जमीन' या तत्त्वाने जमिनीचे वाटप करण्यात आले व 'responsibility system' ('उत्तरदायित्व व्यवस्था') या तत्त्वानुसार उत्पादनाची जबाबदारी शेतकऱ्यावर टाकण्यात आली. हे धोरण यशस्वी झाले व पुढील दशकात शेती-उत्पादनाच्या बाबतीत चीन हे जगात अग्रेसर राष्ट्र झाले.

जागतिकीकरणाने खाजगीकरणाचे वारे सुरू झाले. त्यावेळी चीन आपल्या पद्धतीने त्यांना तोंड द्यावयास, त्यांचे यथायोग्य स्वागत करावयास सिद्ध होता. साम्यवादाच्या कालखंडानंतर सर्व सरकारी उद्योगांचे एकदम खाजगीकरण करण्याची जी चूक रशियाने केली तशी चीनने केली नाही. खाजगी क्षेत्राला पेलेल असेच हस्तांतरण केले. जगाच्या बाजारपेठेत स्पर्धात्मक गुणवत्तेचा आपला औद्योगिक माल स्वस्त किंमतीत तो आणू लागला. शिक्षण व आरोग्य या क्षेत्रात

१९८० पूर्वी केलेल्या विकासामुळे असा कामगारवर्ग उपलब्धही होता.

**चीनच्या चुका**

चीनने काही चुकाही केल्या. खुल्या अर्थव्यवस्थेला विरोध करणारा चीनचा लंबक एकदम उलट्या टोकाला गेला. आरोग्य सेवांचे क्षेत्र मुक्त करण्यात आले. जनतेला ज्या आरोग्य सेवा मिळत होत्या त्या मिळेनाशा झाल्या. १९८० नंतरच्या कालखंडात या क्षेत्रात भारताने चीनच्यापेक्षाही अधिक गतीने आपली प्रगती केली. केरळासारख्या राज्यात - जेथे सर्वांना आरोग्य संरक्षण उपलब्ध आहे - तेथे तर हा फरक विशेष जाणवतो. उदाहरणार्थ गेल्या पंचवीस वर्षांत बालमृत्यूंचे प्रमाण चीनमध्ये हजारी ३८ इतके होते व केरळमध्येही सामान्यपणे तेवढेच होते. ते आता चीनमध्ये ३० च्या थोडे खाली आहे तर केरळमध्ये १२ इतके उतरले आहे. एकदम टोकाची उलट भूमिका न घेता कोणत्या गतीने, कितपत व कसे हे परिवर्तन घडवून आणावे हा व्यावहारिक चिंतनाचा व कृतीच्या कौशल्याचा प्रश्न असतो. चीनचे राजकीय नेते व विचारवंत या विवंचनेत सध्या व्यस्त आहेत. आपण यापासून योग्य तो धडा घेणे आवश्यक आहे.

लोकशाहीबाबतचा विकासाच्या संदर्भातील आपला दृष्टिकोणही आपण असाच तपासून पाहिला पाहिजे. नवसुधारणांच्या आधीच्या कालखंडातील दुष्काळातील जीवितहानी व नंतरच्या कालखंडातील आरोग्याच्या सार्वजनिक सेवांचा ऱ्हास लोकशाहीच्या अभावामुळे चीन-मधील जनतेने निमूटपणे सहन केला ही गोष्ट खरी आहे, परंतु त्यामुळे विकासाची गती वाढली असे म्हणता येणार नाही. भारतात विकासासाठी लोकशाहीवर बंधने घालणे चूक होईल. उलट ती अधिक जागरूक, सबल व कार्यक्षम करण्याची गरज आहे. अशा लोकशाहीचाच शासनावर, नोकरशहावर व राजकीय नेतृत्वावर योग्य तो वचक राहू शकेल व हे विकास व सामाजिक न्याय यांच्या एकसाथ प्रवर्तनासाठी उपकारक होऊ शकेल.

**खाचखळगे**

चीनने जागतिकीकरणाच्या क्षेत्रात अचानक उडी घेतली. दरिद्री देशाने यापूर्वी अशी उडी घेतली नव्हती. त्यामुळे चीनला आपल्या चुकांतूनच शिकावे लागले. आपल्या विकास प्रक्रियेने विषमतेची अंतर्गत दरी वाढत गेल्याचा अनुभव चीनला आला. प्रादेशिक असमतोलातही भर पडली. भारताला हे परिणाम टाळण्यासाठी जागरूकपणे नियोजनबद्ध पाऊले उचलावी लागतील.

तसेच चीनला परकीय तंत्रज्ञान, परकीय तंत्रज्ञ, परकीय पेटंटचे अधिकार यांची मोठ्या प्रमाणात आयात करावी लागली व त्यावर विसंबून राहावे लागले. भारतात खाजगी औद्योगिक क्षेत्र त्यामानाने अधिक विकसित आहे. त्यामुळे भारतात परकीय तंत्रज्ञांची, उद्योजकांची मुळीच गरज नाही असे विधान कोणी केले तर ते मूर्खपणाचे होईल. या प्रश्नाचा विचार करताना आपल्याला योग्य ते तारतम्य बाळगावे लागेल.

अर्थव्यवस्थेत शासनाचा हस्तक्षेप किती असावा या समस्येविषयीही असेच म्हणता येईल. या संदर्भात भारतात विभिन्न मतांच्या गटात कर्कश व पराकोटीचे मतभेद आहेत, ही सध्याची दुर्दैवी परिस्थिती आहे. व्यवहारात सुजाण विचार-विनिमयाने ते कमी करता येतील.

जनतेचे शिक्षण, सार्वजनिक आरोग्यसेवा, भूमि-वितरणात समतेच्या तत्त्वावर सुधारणा या क्षेत्रात भारतात शासनाला आजच्यापेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात परिणाम-कारक कार्य करण्याची आवश्यकता आहे. शासनाला ते केले पाहिजे व करता येईल. या क्षेत्रातील शिक्षकांना, कामगारांना, कर्मचाऱ्यांना अधिक कार्यक्षम व कार्यप्रवण करण्याचे कार्यक्रमही सर्वांच्या सुजाण सहकार्याने हाती घ्यावे लागतील.

आपला विकास कोणत्या गतीने व दिशेने होत आहे, त्यातील खरा 'विकास' किती व त्यापैकी खालच्या वर्गापर्यंत पोचणाऱ्या खऱ्या विकासाचे प्रमाण किती याचे सतत मूल्यमापन करीत आपल्याला आपल्या कार्यक्रमांची फेरमांडणीही यथाकाल करत राहावे लागेल.

आज IT तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात जागतिक स्तरावर आघाडीवर आहे. याचे प्रमुख श्रेय खरे तर जवाहरलाल नेहरू यांना द्यावयास हवे. आपल्या हे सहसा लक्षात येत नाही. साक्षरतेच्या विकासाच्या कार्यक्रमाविषयी त्यांना त्यामानाने कमी आस्था होती. परंतु सर्वोच्च शास्त्रज्ञ तयार करण्याच्या दृष्टिकोणातून आय०आय०टी०च्या स्थापना हे त्यांचे स्वप्न होते व ते त्यांनी प्रत्यक्षात उतरवून दाखवले. इतर मागास देशांनाही यातून प्रेरणा मिळाली. त्या धोरणाच्या सफलतेची फळे भारत आज चाखत आहे. IT क्षेत्राच्या यशाच्या कक्षा आजच्या मर्यादांनाही पार करून पुढे जातील व शिक्षण व आरोग्य यांसारख्या क्षेत्रांतही IT क्षेत्र प्रभावी कार्य करील अशी आशा मला आहे. त्या क्षेत्रांतील नेतृत्व या दिशेने क्रियाशील होताना दिसत आहे याचाही मला आनंद आहे.












अनुक्रमणिका

# लोकशाही समाजवादासाठी अभिनव चिंतन

## डॉ० वसंत प्रभाकर पेठे

गरिबी व लोकसंख्या या गुंतागुंतीच्या मूलभूत प्रश्नासंबंधी माझे दोन लेख प्रसिद्ध झाले. एक प्रबंधरूपाने अर्थसंवाद मध्ये आणि दुसरा साररूपाने साधनेत. (अर्थसंवाद : १२ जुलै २०००, साधना : १२ जुलै २००३) या दोनही लेखांचे शीर्षक होते - 'लोकसंख्या, गरिबी व मानवी गुणवत्ता : नव्या युगासाठी नवीन मॉडेल.' पुणे विद्यापीठाचे भूतपूर्व कुलगुरू ज्येष्ठ विचारवंत प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्या विचारानुसार साधना साप्ताहिकाचे संपादक डॉ. नरेंद्र दाभोलकर यांनी साधना साप्ताहिकातर्फे १४/९/०३ रोजी माझ्या मॉडेलवर एका चर्चासत्राचे आयोजन केले. चर्चेचा विषय जाहीर करताना साधनेत लिहिले होते : 'डॉ. वसंत पेठे यांचे प्रतिमान नवीन, अभिजात व विचार-प्रवर्तक आहे असे मूल्यमापन केले आहे. ते प्रस्थापित विचारसरणीला आव्हान देणारे आहे. तसेच लोकशाही समाजवादाच्या संदर्भात नव्याने विचारमंथन करण्यास आवाहन करणारे आहे.' म्हणून चर्चासत्राच्या विषयाचे शीर्षक होते, 'लोकशाही, समाजवादासाठी अभिनव चिंतन.'

### विचार-मंथनासाठी तीन महत्त्वाच्या बाजू

समाजवादासाठी नव्याने फेर विचारमंथन करताना तीन महत्त्वाचे प्रश्न निर्माण होतात. ते असे - १. अशा नवचिंतनाची निकड आजच का निर्माण झाली ? २. नव-चिंतनाची दिशा व आशय काय असावा? ३. माझ्या मॉडेलचा नवचिंतनासाठी काय उपयोग होऊ शकेल?

**प्रश्न १ : विचारमंथनाची आवश्यकता आजच का?**

या प्रश्नाचे उत्तर असे आहे की गेल्या १०-१५ वर्षात आंतरराष्ट्रीय स्तरावर प्रचंड व धक्कादायक बदल झाले. प्रामुख्याने दोन अतिमहत्त्वाच्या घटना घडल्या.

१. भूतपूर्व सोव्हिएत युनियनमध्ये साम्यवादाच्या बालेकिल्ल्यातच गोर्बाचेव्ह यांच्या पेरेस्त्रोईका आणि ग्लासनोस्त या महालाटांपुढे साम्यवाद पुरा कोसळून पडला.

२. सोव्हिएत युनियनचे विघटन झाले.

या घटनांचा परिणाम असा झाला की, राजकीय क्षेत्रात अमेरिकेचा एकध्रुवीय महासत्ता म्हणून उदय झाला. आर्थिक क्षेत्रात भांडवलशाहीचे पुनरागमन झाले. जागतिकीकरणामुळे अमेरिका व पाश्चात्त्य देश यांचा आर्थिक नव-साम्राज्यवाद वेगाने जगभर पसरत आहे. याचे दुष्परिणाम आता प्रकर्षाने दिसू लागले आहेत. आंतरदेशीय आणि देशांतर्गत विषमता, शोषण, वंचितता, बेरोजगारी, दारिद्र्य, कुपोषण अशा अनंत समस्या निर्माण झाल्या आहेत. खरे तर यावर लोकशाही समाजवाद हाच एकमेव उपाय आहे. परंतु भूतपूर्व सोव्हिएत-युनियनसारखा समाजवाद आता कोणीही मान्य करणार नाही. कारण तेथे 'श्रमजीवींच्या अधिपत्याऐवजी (Dictatonship of the proietariat) व्यक्तिकेंद्रित अशी क्रूर हुकुमशाही अस्तित्वात आली. म्हणून नवचिंतन करून, जनमानसाला दिलासा देईल आणि मानवी चेहरा असेल अशा रुपात समाजवादाचे पुनरुज्जीवन करणे आवश्यक आहे. याला 'नवसमाजवाद' म्हणायला हरकत नाही.

**प्रश्न २ : नव-चिंतनाचा आशय कोणता असावा? विविध 'वादां'चे मूल्यमापन**

या प्रश्नाच्या विवेचनासाठी प्रथम दोन महत्त्वाच्या मुद्द्यांचे स्पष्टीकरण करणे मला आवश्यक वाटते. पहिला मुद्दा लोकशाही-समाजवाद या जोडशब्दाबद्दल आहे. या जोड-शब्दात तत्त्वांची पुनरुक्ती झाली आहे, असे मला वाटते. लोकशाही या संकल्पनेत तीन मूलभूत तत्त्वे आहेत. अब्राहम लिंकन याने लोकशाहीची व्याख्या (Government of the people; by the people; and for the people) अशी केली. यात तीन तत्त्वांचा अगदी थोडक्यात आविष्कार झाला. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळी या तीन तत्त्वांचा स्पष्ट शब्दात उद्घोष झाला. ती म्हणजे, स्वातंत्र्य, समता आणि बंधुता. समाजवादाचा समता हा आत्मा आहे. म्हणून समाजवाद हा लोकशाही संकल्पनेत अंतर्भूत आहे. हा मुद्दा नवचिंतनाची दिशा या दृष्टीने महत्त्वाचा आहे. समाजवाद हा एकच शब्द ठेवावा किंवा त्याला नवसमाजवाद अशी नवीन संज्ञा द्यावी.

दुसरा मुद्दा असा, की अभिनव चिंतनासाठी विविध





मॉडेल्सचे किंवा 'वादां'चे मूल्यमापन करणे आवश्यक आहे. हे मूल्यमापन करताना, विशिष्ठ मॉडेलची तात्त्विक बैठक काय आहे; वास्तवात त्याचे प्रकटीकरण कसे झाले आणि त्याला 'मानवी चेहरा' आहे की नाही, हे पहायला हवे.

भांडवलशाही किंवा उदारमतवाद यात तात्त्विक-दृष्ट्या स्वातंत्र्य आहे. ॲडम स्मिथ हा याचा उद्‌गाता होता; परंतु वास्तवात या वादाचा आविष्कार विषमता, शोषण व वंचितता या विकृतीत झाला. साम्यवाद किंवा समाजवादात समतातत्त्व आहे. कार्ल मार्क्स याचे योगदान या वादाच्या संदर्भात अद्वितीय होते. पण प्रत्यक्षात या वादाचे प्रकटीकरण हुकुमशाहीत झाले. स्टॅलिन, माओ व कॅस्ट्रो यांच्या दंडशाहीत राष्ट्र म्हणजे एक तुरुंगच होता. उदारमतवात किंवा समाजवाद या दोनही समाजव्यवस्थेत तात्त्विक भूमिका कितीही उच्च असली तरी प्रत्यक्षात मानवी चेहरा कलंकित होतो, असे इतिहासाने दाखविले आहे. एका विचारवंताने उदारमतवाद आणि साम्यवाद यांची मोठी भेदक तुलना केली आहे. तो म्हणतो, 'In Capitalism, man exploits man; in communism, it is the other way round!' कम्युनिस्ट आणि सोशॅलिस्ट यात फरक काय, यासंबंधी एक खुमासदार व्याख्या अशी - 'A Communist is a Socialist, without a sence of humour.' गांधीवादात तीनही तंत्रांचा समावेश आहे. परंतु दुर्दैवाने कोणत्याही देशात - भारतातसुद्धा ही तत्त्वप्रणाली पूर्णत्वाने कार्यान्वित केली गेली नाही, म्हणून प्रत्यक्षात याचा आविष्कार कसा झाला असता, याबद्दल अटकळ बांधणे हे वस्तुनिष्ठतेला सोडून होईल. या मुद्‌द्याचा संदर्भ माझ्या मॉडेलचा उपयोग काय, याचे विवेचन करतानाही उपयोगी पडेल.

### समाजवादाची व्याप्ती विस्तारित करणे ही काळाची गरज

आता समाजवादासाठी, नव-चिंतनाची दिशा कशी असावी, य प्रश्नाचा सरळसरळ विचार करू. हे विचार-मंथन १. सैद्धांतिक आणि २. व्यावहारिक असा दोन्ही स्तरांवर करायला हवे.

तात्त्विक स्तरावर समाजवादाची व्याप्ती दोन दिशांनी विस्तारित करणे आवश्यक आहे.

१. प्रथम, समाजवाद म्हणजे समतावाद असे समीकरण जनमानसात रुजले आहे. ही प्रतिमा संकुचित आहे. म्हणून सोव्हिएत युनियनचा अनुभव लक्षात घेऊन, समते-इतकाच, किंबहुना अधिक भर, स्वातंत्र्य आणि बंधुता या दोन तत्त्वांवर दिला पाहिजे. 'लोकशाही समाजवाद' या संज्ञेत दुरुक्ती होते हा मुद्दा येथे प्रस्तुत ठरतो.

२. दुसरे, समाजवादाचे तत्त्वज्ञान, व्यष्टीमितीची जोड देऊन, विस्तारित केले पाहिजे. समाजवाद या शब्दातील 'समाज' हा शब्द 'समष्टीवाचक' आहे. खरे तर सर्व 'वादां'च्या संज्ञा समष्टीदर्शकच आहेत. उदाहरणार्थ, 'लोक'शाही, 'सर्वो'दय, मुक्त अर्थव्यवस्था, 'जागतिकी'करण हे शब्द समष्टी दाखवितात.

समष्टी पातळीवरील संकल्पनात काही दोष आणि धोके आहेत. १. दोष असा की आशयाच्या दृष्टने समष्टीदर्शक संज्ञा असंदिग्ध व अस्पष्ट असतात. उदा. समाजवादातील 'समाज' हा शब्द एकसंधपणा दाखवितोच असे नाही. कारण समाजात अनेक उपसमज, समूह, वर्ग, गट असू शकतात. नाव 'लोक'शाही असले तरी प्रत्यक्षात उच्च-मध्यम व श्रीमंत वर्ग यांनाच आर्थिक विकासाची फळे चाखायला मिळत आहेत.

२. धोका असा की, 'लोक', 'समाज' अशा समष्टीवाचक शब्दांचा राजकारणात गैरवापर हमखास होतो. 'लोक', 'जनता' यांच्या नावाने हितसंबंधी व्यक्ती व गट सर्वसाधारण जनतेची लूटमारच करताना दिसतात. सत्ता, धन आणि बाहुबल यांनी संपन्न असलेले हे गट आहेत. म्हणून समाजवादाच्या तत्त्वज्ञानात समष्टीपर आशयाबरोबर व्यष्टिपर आशयाचीही भर घालणे हिताचे आहे. समाजवादाने 'समाज' असा समष्टीवाचक शब्द वापरुन केवळ हवेत बोलता कामा नये. तर हरएक व्यक्तीचे कल्याण कसे साधणार, यासंबंधीची स्पष्ट तात्त्विक भूमिका नवसमाजवादात समाविष्ट केली पाहिजे. यासंबंधीचे अधिक स्पष्टीकरण माझ्या मॉडेलच्या संदर्भात लगेचच तिसऱ्या प्रश्नाच्या विवेचनात आले आहे.

व्यावहारिक स्तरावरही नवचिंतनात मानवतेचा ('बंधुता' तत्त्वाचा) विचार करून नवसमाजवादाची व्याप्ती वैश्विक केली पाहिजे. रशिया, चीन, क्यूबा यांच्या अमानुष साम्यवादी प्रयोगामुळे जनमानसात समाजवादाबद्दल घृणा, विरोध यांबरोबर निराशाही निर्माण झालेली आहे. रशियाने साम्यवादाला तिलंजली दिल्यानंतर खुद्द काही समाज-वाद्यांनाही समाजवादाची प्रस्तुतता नष्ट झाली आहे की काय, असा अंतर्यामी संभ्रम निर्माण झाला होता. म्हणून तर नानासाहेब होरे यांनी 'रिलेव्हन्स ऑफ सोशॅलिझम' हा लेख 'जनता वीकली' या मासिकात प्रसिद्ध केला. समाजवादाच्या



अनुक्रमणिका

भविष्यासाठी त्याला 'मानवी चेहरा' देणे ही सर्वात महत्त्वाची व निर्णायक बाब ठरु शकेल.

**प्रश्न ३ : माझ्या मॉडेलचा नवचिंतनासाठी काय उपयोग होऊ शकेल?**

आता तिसऱ्या प्रश्नाकडे वळू. माझ्या मॉडेलचा अभिवन चिंतनासाठी काय उपयोग होऊ शकेल? या संदर्भात माझे प्रतिमान अनेक बाबतीत उपयुक्त आहे, अशी माझी धारणा आहे. ही उपयुक्तता सैद्धांतिक आणि व्यावहारिक अशी दोनही स्तरांवर आहे.

१. प्रथम तात्त्विक दृष्टीने, माझे मॉडेल समाजवादाचा आशय किंवा व्याप्ती विस्तारित करण्यासाठी उपयोगी पडेल. याचे कारण असे, की माझे मॉडेल हे साकल्यशील व सर्वसंग्राहक आहे. यात उदारमतवाद, समाजवाद, गांधीवाद या प्रमुख वादांतल्या सकारात्मक तत्त्वांचा समावेश झाला आहे. उदामतवाद्यांतील स्पर्धा (गळे-कापू स्पर्धा नव्हे), समाजवादातील समन्वय व गांधीवादातील नैतिक मूल्ये यांचा यात समावेश झाला आहे. हे माझ्या मॉडेलचा १. मध्यवर्ती सिद्धांत आणि २. विकृतीकडून संस्कृतीकडे जाणाऱ्या पथ-नकाशावर स्पष्ट होते. (साधना : ७/८, अर्थसंवाद : पृष्ठ ४६)

२. दुसरे व्यावहारिकदृष्ट्या, माझ्या मॉडेलला 'मानवी चेहरा' आहे. याची अंतस्थ हमी या प्रतिमानात आहे. ही हमी किमान चार प्रकारची आहे.

१. व्यष्टिस्तरावरचे (म्हणजे व्यक्तिगत स्तरावरचे) तत्त्व हे माझ्या मॉडेलचे अनन्यसाधारण वैशिष्ट्य आहे, असे मला व माझ्या मॉडेलच्या तज्ज्ञ समीक्षकांनाही वाटते. माझ्या प्रतिमानात हरएक व्यक्तीसाठी सुस्पष्ट व ठोस कार्यक्रम आहे. तो म्हणजे प्रत्येक व्यक्तीच्या सुप्त गुणांच्या संपूर्ण विकासासाठी १. शिक्षण, २. आरोग्य आणि ३. सुसंस्कार हा त्रिसूत्री-निविष्टीचा कार्यक्रम. या कार्यक्रमामुळे प्रत्येक व्यक्ती आणि पर्यायाने सर्व समाज, सक्षम व सुसंस्कृत होईल.

२. वास्तवात त्रिसूत्री निविष्टीचा कार्यक्रम सर्वथा व्यावहारिक आहे. त्यांत कल्पितादर्शवादी असे काही नाही. विशेष म्हणजे सरकार, सेवभावी संस्था, याबरोबर पालक, एढेच नव्हे तर कोणतीही व्यक्ती यात सहभाग घेऊ शकेल.

३. सुसंस्कार ही माझ्या मॉडेलनुसार सर्वात महत्त्वाची निविष्टी आहे. अनिष्ट संस्काराने ओसामा बिन लादेनसारखा अतिरेकी तयार होतो, तर सुसंस्काराने अब्दुल कलाम यांच्यासारखा सर्जनशील शास्त्रज्ञ निर्माण होतो. स्वातंत्र्य, समता आणि मानवता यांवर घाला घालणाऱ्यांविरुद्ध सर्वस्वाचा त्याग करून लढा देणे, हा सर्वात मूलभूत संस्कार आहे. स्वातंत्र्य संग्रामासाठी हा महान संस्कार महात्मा गांधींनी सर्व समाजावर केला. याचे प्रचंड सामर्थ्य राष्ट्रीय आणीबाणीच्या काळातही दिसून आले.

४. राष्ट्र सामर्थ्यवान असले तरी सर्व नागरिक सक्षम असतीलच असे नाही. आज आर्थिक-विकास, दर-वाढ या निकषावर भारताचा क्रमांक जरी खूप वर (पांचवा) असला तरी मानवी विकास निकषावर तो खूपच खाली (१२६) वा आहे. याउलट, प्रत्येक नागरिक सक्षम असेल तर राष्ट्र सामर्थवान असणारच. म्हणून समाजपरिवर्तनाच्या तुलनेत व्यक्ति-परिवर्तन अधिक मूलभूत व महत्त्वाचे आहे. माझ्या मॉडेलला संज्ञा द्यावयाचीच झाली तर मी त्याला 'व्यक्तीपरिवर्तन-वाद'म्हणेन. व्यक्तिपरिवर्तनातून समाजपरिवर्तन असा मूल-भूत, सरळ, सोपा व वेगवान प्रवास आहे. व्यक्तिपरिवर्तन म्हणजे सुशिक्षित, आरोग्यशील व संस्कारित अशी सुसंस्कृत व्यक्ती तयार होणे. म्हणून माझ्या मॉडेलला सुसंस्कृत व्यक्तिप्राङ्मुखी मानवतावाद' असेही म्हणणे उचित ठरेल. नवसमाजवादात हरएक व्यक्तीला केंद्रीभूत मानणे जरूरीचे आहे. तरच प्रत्येक व्यक्तीला, विशेषत: वंचितांना, नवसमाज-वादाबद्दल आत्मीयता वाटेल. यानेच समाजवादाला नव-चैतन्य प्राप्त होईल, आणि आम जनतेत तो लोकप्रिय होऊ शकेल.

### नवसमाजवादाकडे

लोकशाही समाजवाद या जोडशब्दात आधी म्हटल्याप्रमाणे, द्विरुक्ती आहे. याबरोबर, भारतातील लोकशाहीचे विडंबन पाहून लोकशाही या शब्दाच्या मोहकतेचे वलय नष्ट झाले आहे. म्हणून मला असे वाटते, की नवसमाजवादाचे नामकरण 'मानवतावादी समाजवाद' असे करणे अधिक सार्थ होईल. अशा समाजवादाला, गरिबांतल्या गरिबांपासून ते समाजातील सर्व थरांतील व्यक्तींपर्यंत पोहोचण्याचा, एकमेव मार्ग म्हणजे माझ्या प्रतिमानातील त्रिसूत्री निविष्टीचा कार्यक्रम. डॉ. रघुनाथ माशेलकर यांच्या 'पंचशील'पेक्षा माझी 'त्रिसूत्री निविष्टी' ही अधिक मूलगामी आहे; आणि ती अनिवार्यही आहे. - त्याला पर्याय नाही. या संदर्भात मी एक धाडसाचे विधान करू इच्छितो. आज ते कदाचित अव्यवहार्य वाटेल. पण ते अतिमहत्त्वाचे आहे. आधी

म्हटल्याप्रमाणे सुसंस्कार हा त्रिसूत्री निविष्टीत मूलभूत आहे. आजकालच्या शिक्षणाचे व्यापारीकरण झाले आहे. शिक्षण-क्षेत्रातील महर्षी, कर्मवीर गेले. त्या जागी 'सम्राट' आले. यामध्ये सुसंस्कार तो काय होणार ? म्हणून सध्याच्या औपचारिक शिक्षण 'विकणाऱ्या' शाळा, महाविद्यालये बंद करावीत. यातला जनमानसात असणारा तीव्र असंतोष, संताप जरी क्षणभर बाजूला ठेवला तरी अशा संस्थांचे आमूलाग्र रूपांतरण करणे अत्यावश्यक आहे. हे रूपांतरण व्यवहार्यही आहे. अशा संपादित शाळा, कॉलेजांना संस्कार केंद्रे किंवा आश्रम म्हणणे उचित होईल. यांत १. व्यावसायिक शिक्षण, २. आरोग्य शिक्षण, ३. संस्कार. हे तीन प्रमुख विभाग असावेत. सुसंस्कार विभाग केंद्रस्थानी असावा. पूर्वीच्या ऋषीमुनींच्या आश्रमाची धारणा व संरचना अशीच होती. यात राजा आणि रंक या दोघांनाही 'मानव' घडविण्याचे महान कार्य होत असे. नवसमाजवादासाठी 'माणसाचा मानव घडविण्याचे तत्त्व' मध्यवर्ती असावे. यानेच समाजवादाचे पुनरुज्जीवन होईल असे वाटते. माझ्या मॉडेलमधील व्यक्ती व समाज यांच्या परिवर्तनासंबंधीचे पथ-नकाशे, या पुनरुज्जीवनाच्या प्रक्रियेत, तात्त्विक दृष्टीने व व्यवहारात स्पष्ट व ठोस कार्यक्रम कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने, निश्चितपणे उपयुक्त आहेत, अशी माझी धारणा आहे.

(साधना, ६ डिसेंबर २००३)

☑☑☑

## Science Education in Danger ?

Let's for one instant imagine a world where people do not have sufficient understanding of basic science and technology concepts to understand issues relating to water shortage, pollution, health, forests or climate change. Who will take the decision that are needed to these questions ? Who will influence the decision-makers ?

With just a little stretch of the imagination this world may not be that far away. Studies are constantly reminding us that young people today are less interested in studying science and technology subjects than before. They are opting for fields that pay better salaries and require less hard work. As the dossier in this issue points out, at a time when the demand for scientific advances and innovations are needed, the number graduates in science and technology is falling.

Clearly, it is vital that nations wake up not only to the importance of science and technology, but also to the fact that every citizen - male and female - should have a basic understanding of both.

Efforts are being made to bring science closer to the concerns of young people and to make it more gender-sensitive. Two sectors within UNESCO - Education and Natural Sciences - have developed a joint programme through which they are assisting policy-makers, curriculum developers, trainers and educators, empowering them to improve the quality, relevance and attractiveness of this science and technology education policies and adapting them to the needs of students and teachers.

Emphasis is being placed on adapting programmes to the local socio-cultural contexts. these programmes need to have a bearing on what is happening in the community, whether it is desertification, over-population, pollution, diseases, lack of water or energy resources, etc.

Science and technology education contributes to three of the Education for All goals : attainment of life skills for youth (Goal 3), elimination of gender disparities in education (Goal 5) and enhancement of the overall quality of education (Goal 6). It is above all ensuring sustainable development. Science and technology education is a universal requirement, not an empty slogan.

**- Aicha Bah Diallo**

Acting Assistant Director-General For Education

(Perspectives in Education, July 2005, Backcover)

☑☑☑

अनुक्रमणिका








# जीर्णोद्धार
## लेखांक १२ वा
# 'रोजनिशी' : गोविंद बाबाजी जोशी
### श्री. मा. भावे

गोविंद नानाजी जोशी (वसईकर) (१८२६-१९०६) यांनी 'गेल्या तीस वर्षांपूर्वीचे लोक व त्यांच्या समजुती अथवा माझे प्रवासाची हकीकत (रोजनिशी)" अशा लांबच लांब नावाचे पुस्तक १८९६ साली प्रसिद्ध केले. पुस्तकाच्या सुरुवातीला लेखकाने स्वतःची ओळख 'सरकारी भाषण करणारे, निसबत श्रीमंत गायकवाड सरकार', अशी करून दिली आहे. गोविंद बाबजी यांनी आणखी आठ पुस्तके लिहिली होती. त्यात 'ढोरांस देवाचा भयंकर रोग होतो त्याविषयीं', 'हिंदू लोकांस विनंती' आणि 'रायगड किल्ल्याचे वर्णन' अशा नावांची पुस्तके आहेत.

ही सारीच पुस्तके 'अत्यंत दुर्मिळ' आहेत. इतकेच नव्हे तर काळ जातो आहे तशी ती 'गायब' होत चालली आहेत. मी 'रोजनिशी' हे पुस्तक १९६१ साली फर्ग्युसन महाविद्यालयाच्या ग्रंथालयातून घेऊन वाचले. त्याच वेळी हे काही निराळे व विलक्षण रसायन आहे हे मला जाणवले व मी त्या पुस्तकाची टिपणे काढली. आता फर्ग्युसन महाविद्यालयाच्या ग्रंथालयात हे पुस्तक मिळत नाही. पुणे विद्यापीठाच्या जयकर ग्रंथालयात या पुस्तकाची प्रत होती. पण ती नाहीशी झाली आहे. नायगावच्या मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात या पुस्तकाची जीर्ण प्रत आहे. आधुनिक महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनाच्या पहाट-काळाचे प्रांजळ व लाघवी वर्णन देणारा हा महत्त्वाचा दस्तऐवज थोड्याच वर्षात अदृश्य होणार आहे असे वाटू लागले आहे.

मी सोयीसाठी प्रस्तुत पुस्तकाचा उल्लेख 'रोजनिशी' असा करीत आहे. पण शंभर वर्षांपूर्वी लोकात या पुस्तकाची ओळख 'माझे प्रवासाची हकीकत' अशी होती. गोविंद बाबाजी यांनी १८६२ ते १८७७ या काळात सार्वजनिक कामांच्या निमित्ताने बरेच प्रवास केले. प्रवासातील घडामोडींची नोंद ते 'रोजनिशी'त ठेवीत. थोडक्यात, 'रोजनिशीत आलेली माझ्या प्रवासाची हकीकत' असे ह्या पुस्तकाचे स्वरूप आहे. पण पुस्तकात केवळ दैनंदिनीच आहे असे नाही. सुरुवातीला प्रास्ताविक म्हणून त्यांनी स्वतःच्या शिक्षणाविषयी, प्रवासाच्या सोयी व अडचणी यांच्याविषयी माहिती दिली आहे. खेरीज, आपल्या कार्याच्या निमित्ताने वेळोवेळी लिहिलेल्या सात पुस्तिका या ग्रंथात आहेत. ठिकठिकाणी तळटीपा दिल्या आहेत व त्याही वेधक आहेत.

ठाण्याचे डॉ. अरुण रा. जोशी यांनी १९८१ साली गोविंद बाबाजी यांचे चरित्र लिहिले. त्यासाठी त्यांनी बहुत कष्ट घेतले. 'नेटिव्ह ओपिनियन', 'केसरी' इ. वृत्तपत्रांच्या तत्कालीन संचिका तपासल्या. गॅझेटियर्समधून माहिती गोळा केली. वसईला जाऊन गोविंद बाबाजींच्या वंशजांची गाठ घेतली व गोविंद बाबाजींचा खाजगी पत्रव्यवहार पाहिला. इतके करूनही डॉ. जोशी यांनी लिहिलेले चरित्र बहुतांशी 'रोजनिशी'तील मजकुरावरच आधारलेले आहे. तथापि, डॉ. जोशी गोविंद बाबाजींची ओळख एक समाजसुधारक अशी करून देतात. गोविंद बाबाजी हे काही प्रमाणात समाजसुधारक होते व त्यासाठी त्यांनी समाजातून बहिष्कारासारख्या शिक्षादेखील स्वतःवर ओढवून घेतल्या. पण समाजसुधारणा हा गोविंद बाबाजींच्या कार्याचा एक भाग झाला. त्यांची खरी ओळख समाज-निरीक्षक आणि 'आद्य सार्वजनिक कार्यकर्ता' अशीच करून देणे समर्पक होईल.

१

माणूस शेतीचा व्यवसाय पत्करून गाव करून राहू लागला तेव्हापासून सार्वजनिक कार्य ही संकल्पना जन्माला आली व ते करणारे स्वयंसेवकही दिसून येऊ लागले. गावाच्या देवाचा उत्सव, यात्रा, गावच्या पाणवठ्याची स्वच्छता व व्यवस्था, परचक्र आले तर त्याच्या मुख्याशी वाटाघाटी करून खंडणी ठरवणे व ती गोळा करून देणे अशा निमित्तांनी गावकऱ्यांना गोळा करून, त्यांची समजूत घालून कामे पार पाडावी लागत. त्यातून कार्यकर्ता घडत जाई. पण या झाल्या जुन्या गोष्टी.

इंग्रजांचे राज्य महाराष्ट्रात अवतरल्यावर 'सार्वजनिक कार्य' या शब्दाला एक नवा अर्थ आला. इंग्रजांचे राज्य हे

कायद्याचे राज्य होते व एका समूहातील सर्व घटकांना कायदा एकसारखा लागू होई. उदाहरणार्थ, मिठागरे चालविणाऱ्यांवर कर लावलेला होता. तो सर्व मिठागर-मालकांना एकत्र प्रमाणात लागू होई. त्यामुळे एखाद्या मिठागर-मालकाने परस्पर सरकारी अधिकाऱ्याकडे जावे आणि स्वतःपुरती सवलत मिळवून घ्यावी असे होण्याची शक्यता नव्हती. साहजिकच कर भरताना जो काही त्रास होई, अडचणी सोसाव्या लागत त्या सर्व मिठागर-मालकांनी एकत्रितपणे प्रशासनापुढे मांडल्या तरच प्रशासनाकडून त्यांचा विचार होई. गावात सरकारने शाळा चालू करावी अशी मागणी असेल, शाळेच्या खर्चाचा काही वाटा उचलण्याची ग्रामस्थांची तयारी असेल तर ही मागणी व खर्चाची तयारी यांची माहिती चॅटफील्डसारख्या शिक्षण-संचालकांपर्यंत पोचवली पाहिजे. साहजिकच गावातील एखाद्या खटपट्या मनुष्याने पुढाकार घेऊन हे काम लागी लावले पाहिजे. प्रशासन आणि रयत यांच्यातील दुवा असणारा सार्वजनिक कार्यकर्ता ही संस्था जुन्या मराठी राज्यात अगदीच नव्हती असे नाही. पण मराठी राज्य हे लोककल्याणकारी राज्य नव्हते. शिक्षण, आरोग्य, रस्ते यांच्या विकासाची जबाबदारी राज्ययंत्रणेने स्वीकारली नव्हती. इंग्रजी राज्याने आपले ध्येयच असे ठरविले होते - किंवा तसे ते दाखवित तरी होते, की इथल्या अंधश्रद्धाळू, अज्ञानी व दरिद्री समाजाला इतिहासाच्या मुख्य प्रवाहात आम्ही आणून सोडणार. त्यामुळेच रयत या राज्याला 'मायबाप सरकार' म्हणून ओळखत होती. इंग्रजी राज्याचा हा जो 'कल्याणकारी' पैलू होता त्याच्यामुळे, वर म्हटल्याप्रमाणे 'सार्वजनिक कार्य' ही संकल्पना अधिक विस्तार पावली होती.

इंग्रजी राज्याच्या सुरुवातीला जे इंग्रजी अधिकारी जिल्हाप्रमुख, न्यायाधीश, शिक्षणसंचालक किंवा शाळा तपासणी अधिकारी म्हणून काम करीत त्यांना मराठी भाषा येत असे व ते लोकांत मिसळून कामे करीत, परंतु दैनंदिन कामासाठी त्यांना एतद्देशीय दुय्यम अधिकाऱ्यांच्या सल्ल्यावर व निर्णयावर अवलंबून राहावे लागे. हे एतद्देशीय सल्लागार बरेच मतलबी व अन्याय करणारे असत. विशेषतः मामलेदारा-सारखे अधिकारी तर अरेरावीने वागत. सुखवस्तू घरातील लागेल ती वस्तू अगदी गाई-म्हशी देखील उचलून नेणारे मामलेदार होते. अशा अधिकाऱ्यांविरुद्ध तक्रार करूनही उपयोग होत नसे. इंग्रज अधिकाऱ्यांना अशा जुलुमाची माहिती नसे असे नाही. त्यामुळे इंग्रजी प्रशासकीय अधिकाऱ्यांनाही आपण आणि रयत यांच्यातील अनौपचारिक दुवा होऊन राहणारे सार्वजनिक कार्यकर्ते हवेसे वाटत. विश्वनाथ नारायण मंडलिक, दादाभाई नौरोजी, विष्णू परशुराम पंडित अशां-सारखे येथील समाजाच्या वरच्या स्तरातील लोक इंग्रजी राज्याने याच कारणाने उत्तेजन देऊन पुढे आणले होते. ही माणसे आपली कामे आपापल्या मगदुराप्रमाणे पार पाडत. पण हे मोठे लोक मुंबईत राहात. त्यांना जिल्ह्या-जिल्ह्यातून लोकांच्या काय अडचणी आहेत, सरकारी अधिकाऱ्यांचा त्यांना काय जाच होतो, याची माहिती नसे.

ही अडचण गोविंद बाबाजींच्या ध्यानी आली, किंबहुना विश्वनाथ नारायण यांनी ती गोविंद बाबाजींना बोलूनही दाखवली. ते म्हणाले, 'जिल्ह्या-जिल्ह्यातील अहवाल आम्हास बिलकुल कळत नाही... मामलेदार व मुनासिफ कोर्टात (आपले) रिपोर्टर्स पाहिजेत. ही १८६७ सालची गोष्ट. पुढे १८७२ साली गोविंद बाबाजी मुंबईस आले असता 'जनार्दन सखाराम गाडगीळ यांनी सांगितले की, ठाणे जिल्ह्यात जंगलासंबंधी जो जुलूम होत असेल त्याची हकीकत मेहेरबान दादाभाई नौरोजी यांना हवी आहे. करिता ती आणून द्यावी.' (३८६-३८७).

या मसल्यावरून दिसून येते, की इंग्रजी राजवटीच्या काळात गाव-तालुका-जिल्हा-प्रांत अशा स्तरांवरील कार्य-कर्त्यांची साखळी रचण्याची गरज भासत होती. प्रत्येक पातळीवरचा कर्ता मनुष्य खालच्या पातळीवरील खटपट्या माणसाच्या शोधात होता. त्यामुळे गोविंद बाबाजींसारख्या जवळपास अशिक्षित परंतु रयतेच्या प्रश्नांविषयी कळकळ बाळगणाऱ्या सामान्य माणसाला मंडलिक किंवा दादाभाई अशांसारख्या श्रेष्ठ व्यक्तींपर्यंत पोचता येत होते. इतकेच नव्हे तर सर टी. माधवराव, श्रीमंत मल्हारराव गायकवाड, इंदूरचे महाराज तुकोजीराव अशांसारख्या अधिकारी व्यक्तींकडून त्यांची चहा व अगत्य होत असे.

२

हे जे सार्वजनिक जीवन आकार घेत होते त्यात गोविंद बाबाजी यांनी उत्साहाने कळकळीने, निस्वार्थपणे व पदरमोड सोसूनही भाग घेतला. त्यांनी वसईमध्ये १८६२ साली ग्रामसभा स्थापन केली, ही सभा रविवारी रात्री शाळेत भरत असे. सभेत भाग घेणे दूरच राहिले, पण नुसते हजर राहण्याससुद्धा लोक


अनुक्रमणिका

राजी नसत. गोविंद बाबाजींच्या भिडेखातर काही लोक येत. पण गोविंद बाबाजी जिद्दीने ग्रामसभा चालवीत व या सभेच्या नावावर त्यांनी तीन अर्ज थेट 'विलायत सरकारा'कडे पाठविले. आणि आश्चर्याची गोष्ट अशी की, विलायत सरकारकडून त्यांना उत्तरेही मिळाली. यावरून विलायतेतील राज्यकर्त्यांनाही हिंदी जनतेच्या अर्जांची बूज राखावीशी वाटत होती, असे दिसते.

सभेचा पहिला अर्ज होता की, 'कायदे करणारे सभेत स्वदेशी लोक नेमावेत.' उत्तर 'याप्रमाणे ठराव झाला आहे.' दुसरा अर्ज की, 'हायकोर्टात स्वदेशी जज्ज नेमावेत.' उत्तर, 'एक स्वदेशी जज्ज नेमला जाईल.' शेवटच्या अर्जात म्हटले होते की, 'सनदी जागेवर स्वदेशी माणसे नेमावीत.' याला काहीसे निराशाजनक उत्तर आले की, 'लोकांची परीक्षा घेणारी कमिटी हिंदुस्थानात स्थापन होणेविषयी बराबर विचार झाला नाही. पुढे योग्य दिसल्यास तजवीज होईल.'

आम्ही वर म्हटलेच आहे, की या सुरुवातीच्या काळात समजूत अशी होती की, जुलूम होतो तो इंग्रजांच्या दिमतीला असणाऱ्या एतद्देशीय नोकरांकडून. या स्थानिक नोकरवर्गाची ही भावना होती की, लोक एकत्र आले की ते आपल्याच विरोधात गिल्ला करणार. गोविंद बाबाजींच्या वसई-ग्रामसभेच्या कामाचे गावातील सरकारी नोकरांस वैषम्य वाटू लागले. यांनी लोकांवर 'सभेस जाऊ नये' असे दडपण आणण्यास सुरुवात केली. रविवारी रात्री सभा संपल्यावर शाळेतील शिक्षक 'मुंडकर' हे शाळा बंद करून घरी चालले असता पोलिसांनी त्यांना चौकीवर अडवून ठेवले. सकाळी मला खबर लागताच याबाबत (मी) पुढे योग्य इलाज करण्यास सुरुवात केली. पण पोलिसांनी माफी मागितल्यावरून मास्तराने माघार घेतली (३४). मुळातच लोकांचा उल्हास थोडा व त्यात हा जाच त्यामुळे ग्रामसभा संपुष्टात आली.

ग्रामसभेचा प्रयत्न अशा रीतीने स्वतःच्या गावातच फसला, तरी गोविंद बाबाजींच्या उमेदीला अडसर बसला नाही. 'ग्रामसभा' या संकल्पनेचा एक प्रकारचा मोहच त्यांना पडल्यासारखा झाला. ग्रामसभेची घटना व उद्देश काय असावेत, कोणत्या जातींचे प्रतिनिधी सभेत घ्यावेत, ग्रामसभा स्थापन करण्यात व चालवण्यात काय अडचणी येतात आणि त्या दूर कशा कराव्यात, सभेचे दप्तर कसे ठेवावे, सभेच्या मुख्याचे अंगी कोणते गुण असावेत, इत्यादी मुद्द्यांची चर्चा करणारे एक पुस्तकच गोविंद बाबाजी यांनी लिहिले. त्याचे नाव 'मॅन्युअल ऑफ एस्टॅब्लिशिंग अँड कंडक्टिंग ग्रामसभा'. पुस्तर मराठीतच आहे. इतकी तयारी करून तारीख १ माहे जून १८६७ या दिवशी गोविंद बाबाजी यांनी 'ठाणे जिल्हा लोकर्नियुक्त सभा स्थापन करण्याचे प्रवासास आरंभ केला. पुढे हा प्रवास उत्तरेत इंदूरपर्यंत, दक्षिणेत कोल्हापूरपर्यंत पोचला.

३

१८६७-७७ च्या दशकात प्रवास ही अतिशय जिकीरीची गोष्ट होती. आगगाडी अगदीच थोडक्या ठिकाणी पोचली होती. बैलगाडी व टांगे जाऊ शकतील असे रस्ते विरळा होते. उन-पावसापासून रक्षण मिळण्याची साधने नव्हती. गावोगावी राहण्या-जेवण्याची सोय होईल याची खात्री नव्हती. गोविंद बाबाजींनी घेतलेला वसा किती खडतर होता याची प्रचिती पानोपानी येते. प्रस्तावनेत गोविंद बाबाजी सांगतात, 'एकंदर तीन हजार मैल जवळ-जवळ मी प्रवास केला आहे. त्यापैकी रेल्वे व बैगगाडीने मिळून २२४१ मैल, जलमार्गाने २५७ मैल, घोड्याने १९१ मैल व पायी १९० मैल. एकंदर ६५ गावी सार्वजनिक विषयांवर भाषणे केली आहेत व ती माझी भाषणे ऐकावयास लोक ५००० जवळ-जवळ आले होते."

त्यावेळी लोकांना 'कार्यकर्ता' ही चीज अगदी अनोळखी होती. एखाद्या गावात गोविंद बाबाजी पोचले की, ते तेथील प्रतिष्ठित मनुष्याची भेट घेऊन व त्याला पुढे घालून सभा भरवीत. पण असा तालेवार माणूस हाती न लागला तर गावातील चौकात उभे राहून उपदेशपर भाषण करीत. त्या काळात असे फिरस्ते उपदेशक ख्रिस्ती पाद्री लोक असत. त्यामुळे गोविंद बाबाजी हेदेखील आपल्याला बाटवायला आले आहेत, अशी समजूत करून घेऊन लोक गोविंद बाबजींस मारहाण करीत किंवा त्यांच्यावर दगड फेकत. सिन्नर येथील हकीकत 'सर्व लोक मला ख्रिस्ती समजले होते... मी जानवे दाखवले, गायत्री म्हणून शेंडी दाखवली, तेव्हा त्यांची खात्री पटली.' (४१३). भुसावळ येथे रस्त्यात उपदेशास उभा राहिलो असता लोकांनी मजला धोंडे मारले. माझी छत्री फाडली. हा गृहस्थ हिंदू आहे अशी खात्री पटल्यावर क्षमा मागितली. हे लोक लोकोमोटिव्ह खात्यातील सुतार-लोहार होते. (४८३)

प्रवासात इतर कोणत्या आपत्ती येतील, याचाही






भरवसा नसे. ८ ऑक्टोबर १८७० रोजी सासवड जवळच्या वाल्हे गावात, नदीच्या वाळवंटात दशमी खात बसले असता नदीला अचानक पूर आला व गोविंद बाबाजी यांच्यावर वाहून जाण्याचा प्रसंग आला. (२४३). जेवणाचे हाल तर अतोनात होत. अलीबागेतल्या खानावळीचे त्रिरात्र सांभाळून ठेवलेले सुवासिक ताक प्यावे लागले. त्याला बागुरड्याचे लेंड्यांचा वास येत होता. बरेचदा उपवास काढावे लागत. 'आज रोजी घरी येताना बारा वाजून गेले. सबब माधुकरीची वेळ चुकल्यामुळे उपास पडला (५४३). आणखी एक प्रसंग पहा, 'पेट गावी धर्मशाळेत वस्ती. खापराची पणती जवळच्या देशस्थ ब्राह्मणाकडे मागितली. घरात पुरुष माणूस नव्हते. बाईंनी सांगितले, 'मला लाकूड फोडून द्याल तर तुम्हास पणती देईन.' (२६९-७०)

ठाणे जिल्ह्यातील मुख्य गावातून फिरून तेथील प्रतिष्ठित लोकांच्या ग्रामसभेच्या स्थापनेच्या पत्रकावर सह्या घेऊन व त्यांच्या नेतृत्वाखाली त्या त्या गावात ग्रामसभा स्थापन केल्यानंतर गोविंद बाबाजी ठाण्यास आले व तालुकानिहाय सर्व सभासदांनी ठाण्यास जनरल सभा भरविण्याचे यत्नास आरंभ केला. प्रथम ठाणे येथील पुढारी मंडळी रामचंद्र त्रिंबक आचार्य, गोविंद बाबा गुर्जर, गोपाळ गोविंद दाबक, सूर्योदयकर्ते, आणि डॉ. आपाजी विनायक दाते यांचे अनुमोदनाने तारीख ८ जानेवारी १८६८ रोजी ही सभा भरविण्याचा निश्चय करून त्याप्रमाणे निमंत्रणपत्रे छापून ती तालुकानिहाय पाठवली... तारीख ८, माहे फेब्रुवारी १८६८ ही सभा चार वाजता ठाणे येथील इंग्रजी शाळेत भरली होती. जज्ज कोर्टातून बाके व खुर्च्या पाठवून दिल्या होत्या. पेन्ही साहेब स्वत: व आपले असिस्टंट लायन्स साहेब असे उभयता येऊन सभास्थानी विराजमान झाले. 'इंदुप्रकाश'चे एडिटर विष्णू परशरामशास्त्री पंडित यांनी भाषण केले. एक हजार लोक आले होते (१३६-१३९).

अशा रीतीनें ठाणे जिल्ह्याची प्रतिनिधीक सभा स्थापन झाली. तिचे तीन चिटणीस होते. १) स. रा. वामन बकले - ऑनररी, २) रा. रा. आपाजी विनायक दाते, ऑनररी, ३) रा. रा. गोविंद बाबाजी जोशी (काम करणारे)(१४०). सभेचे उद्दिष्ट स्पष्ट शब्दात मांडले आहे. या इलाख्याच्या सरकारचे व मुख्यत्वेकरून ण: जिल्ह्याच्या कलेक्टरचे अमलाखाली जे एतद्देशीय लोक राहतात त्यांच्या अनेक गोष्टींची चौकशी करून या देशाची व जिल्ह्याची सुधारणा करण्यास व त्यातील लोकांची कल्याणवृद्धी करण्यास कोणते उपाय अवश्य आहेत याचा विचार करून ते सरकारास नेहमी कळविणे हा या मंडळीचा मुख्य उद्देश आहे (१४५).

४

ठाणे जिल्ह्यात गावोगाव फिरून ग्रामसभा स्थापन केल्या. नंतर जिल्हा सभा स्थापन केली. हाच उपक्रम इतर जिल्ह्यात पसरावा या हेतूने गोविंद बाबाजी पुणे, सातारा, कोल्हापूर, नाशिक, खानदेश या भागातही हिंडले. त्यांच्या कामाचे व प्रचाराचे स्वरूप ठरून गेल्यासारखे झाले होते. गावातील प्रतिष्ठित लोकांना हाताशी धरून गावकऱ्यांची सभा भरवायची आणि सभेत 'ग्रामसभा' स्थापन करण्याचा ठराव मंजूर करून घ्यावयाचा. 'कऱ्हाड येथे ग्रामस्थ लोक गोळा करून तारीख १६ ऑक्टोबर १८७० रोजी भाषण केले. लायब्ररीत सभा झाली होती. एकंदर सुमारे १५० पर्यंत लोक एकत्र आले होते. अध्यक्षस्थानी नारायण अनंत मुतालिक बसले होते. हे गृहस्थ मॅट्रिक्युलेटेड आहेत. यांजला बारा हजारांची जहागीर आहे.' (२५२). कोल्हापुरात तारीख २५ ऑक्टोबर १८७० रोजी व्याख्यान झाले. शहरात लेखी जाहीरनामे (गोपाळ गोविंद, न्यायाधीश आणि माधवराव मोरेश्वर कुंटे ऑनरेबल हेडमास्तर यांच्या सहीने) लावले होते. सुमारे १५० लोक जमले होतते. एक कलाक पर्यंत भाषण केले. सुमारे सहा वाजता सभा बरखास्त झाली. (२७७-२७९).

या फिरस्तीच्या निमित्ताने गोविंद बाबाजी यांना मराठी समाजाचा जो अनुभव आला, निरनिराळ्या ठिकाणच्या नामवंत व्यक्तींशी त्यांची चर्चा झाली. परिस्थितीचे त्यांनी जे निरीक्षण केले, त्याबद्दलची निवेदने मनोरम आहेत. गोविंद बाबाजी यांना लोकांविषयी आस्था व कळकळ होती. त्यांचा स्वभाव चौकस होता. त्यांना एक ऐतिहासिक दृष्टी होती आणि त्यांच्या विचारात आधुनिकता होती. या सर्वांच्या योगाने त्यांचे लिखाण १९ व्या शतकाच्या मध्याला महाराष्ट्रातील लोकांची राहणी, त्यांचे विचार, त्यांच्या आशा-आकांक्षा यांच्या विषयीचा एक रोचक दस्तऐवज बनून राहिले आहे.

कऱ्हाड येथे दोन उंच मनोरे आहेत. या मनोऱ्यांची हकीकत तेथील काजीच्या दप्तरावरून गोविंद बाबाजी यांनी समजावून घेतली. नंतर त्यांनी मनोऱ्यांची पहाणी केली.

त्यापैकी एक मनोरा कलला आहे, हे निरीक्षण नोंदविले. 'मनोऱ्याच्या एकंदर पायऱ्या सुमारे ९० आहेत व प्रत्येक पायरीची उंची एक चीत आहे. व पायरीची जाडी, म्हणजे धोंडा, सहा बोटे आहे... मनोऱ्याच्या एकंदर उंचीची मोजदाद दर पाच पायऱ्यांस तीन हात होते. हा मनोरा जमिनीपासून सुमारे ५४ हात उंच आहे. आणि सुमारे ४-५ कोशांवरून हे भव्य मनोरे दिसतात. (२५१)' इमारतीची इतकी सूक्ष्म रहाणी करणारी ही दृष्टी आधुनिक आहे. अंबाबाईचे देऊळ (कोल्हापूर) गोविंद बाबाजींनी पाहिले. त्याच्या रचनेचे तपशीलवार वर्णन त्यांनी दिले आहेच; पण एक नकाशाही जोडला आहे (२५०).

गावोगावची परिस्थिती, लोकांची मनस्थिती, त्या त्या गावाची खासियत यांच्या नोंदी फारच मनोरंजक आहेत. सासवड येथे एक महार वकील आहे. आणि ऐकण्यात हा वकील सालाचे चारशे-पाचशे रुपये मिळवितो. मुखत्यार वकील आहे. याची मुले येथील सरकारी शाळेत अभ्यासास येत असतात. ज्या समयी हे बॅरिस्टर साहेब मामलेदार कोर्टात काम करण्यास जातात, त्या समयी मॅजिस्ट्रेटास अशौच येते, म्हणजे जाजम वगैरे दूर टाकून त्यास बसावे लागते. (२३५). अलीबाग येथे दोन प्रकारचे (घड्याळांचे तास वाजतात. व त्यात इतका फेर आहे की, पहिल्यात १२ वाजले तर दुसऱ्यात ६ वाजतात. येथे बिवलकरांचे व मामलेदार कचेरीचे (सरकारी) अशी दोन घड्याळे चालतात. इंग्रजी पद्धतीप्रमाणे दुपारी १२ वाजता. दिवसाच्या (तासांना) प्रारंभ होतो तो रात्रीचे १२ पर्यंत एक दिवस मानला जातो. आणि आपले मराठीशाहीतील रीत म्हटली म्हणजे प्रातःकाळापासून आरंभ होतो तो संध्याकाळपर्यंत दिवस धरण्याची रीत आहे (९९). या दोन्ही उताऱ्यांवरून इंग्रजी राज्यात महाराष्ट्र आधुनिकतेकडे कशा रीतीने क्रमणा करीत होता, ते दिसून येते. महार मनुष्य वकील झाला ही गोष्ट व्यक्तिस्वातंत्र्याची द्योतक आहे. तर घड्याळातील तफावतीवरून इंग्रजी प्रघातांचा वाढता प्रभाव दिसून येतो. अजूनही आपण दिवस म्हणजे सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा कालावधी असेच समजतो. पण तासांची सुरुवात रात्री १२ पासून करतो.

कुटुंबातील तरुणांचा बहकलेपणा कुटुंबातील पोक्तांचा नेहमीच तक्रारीचा विषय. रावसाहेब जयराम गोपाळ सुळे, रा. पनवेल, आपल्या मुलांविषयी गोविंद बाबाजीस म्हणाले की, 'त्यांच्या हातून घरच्या शेतीचा किंवा व्यापारव्यवसाय मुळीच चांगला होत नाही. पैशाचा जमाखर्च मुळीच समजत नाही. अंगात वानातीचे (म्हणजे लोकरीचे) अंगरखे घालणे, बंडीचे खिशात घड्याळ, गळ्यात पट्टा व हातात कुत्र्या-मांजराचे तोंडाची काठी घेऊन आणि तोंडात त्या गोवेगिरी विड्या, की चालले सकाळ-संध्याकाळ फिरायला... आमच्या प्रभू जातीत दारूस प्रतिबंध नाही, हे मी कबूल करतो, कधी सठी-सहामासी सणावारी; पण यांची रीत पाहिली तर सांजसकाळ त्याशिवाय चालावयाचे नाही. आणि पुनः मुंबईच्या शिवाय परवडत नाही (७७). सुळ्यांचे घराणे हे पनवेल भागातील तलेवार घराणे; तर दांडेकरांचे कुटुंब हे पालघर भागातील श्रीमंत जमीनदार कुटुंब. दांडेकर यांच्या घरची सर्व व्यवस्था एखादे जहागीरदाराप्रमाणे आहे. प्रत्येकाकडे तीन-तीन, चार-चार कारकून व गडीमाणसे. यांचा व्यापार विशेषकरून शेतीभातीचा व देवघेवीचा असेल. आल्यागेल्या ब्राह्मणास गोपाळआबाकडे जेवावयास मिळते. गावात किंवा माहीम प्रांतात दांडेकरांची देणेदार नाहीत अशी घरे थोडी सापडतील. (६)'

दांडेकर, सुळे ही घराणी मुंबईच्या घेऱ्यात होती. त्यांनी व्यवहाराची आधुनिक टापटीप उचलली होती. त्यामुळे ती आपली वतनवाडी राखून होती. पण मुंबईपासून दूर जावे तो मराठेशाहीपासून चालत आलेली वतनदार मंडळी मोडकळीला आलेली दिसत होती. गोविंद बाबाजींनी कराडला सभा घेतली. तिचे अध्यक्ष, तेथील घरंदाज गृहस्थ अनंत नारायण मुतालिक हे होते. 'यांजला बारा हजारांची जहागीर आहे आणि लिहिण्यास आनंद वाटतो की, कर्ज सुमारे अगदी थोडे आहे. आमचे सरदार जाहागीरदार ऋणापासून मुक्त असे फार थोडे सापडतात.' मुतालिक हे जातीने ब्राह्मण; त्यातून मॅट्रिक झालेले होते, त्यामुळे त्यांनी खर्च माफक ठेवून वडिलार्जित कर्जाचा बोजा कमी करण्याचा प्रयत्न चालवला असेल. पण भुसावळ येथील जहागीरदार निंबाळकर यांच्याविषयी गोविंद बाबाजी सांगतात, 'दरमहा दर शेकडा २ रु. व्याज, कर्ज रक्कम रु. २००००. व्याज फिटते, मुद्दल तसेच राहते.' (४४०)

इंग्रजी राज्याचे विविध परिणाम मराठी समाजावर होत होते. अगदी घड्याळी तासापासून ते तरुणांना वाटणाऱ्या शहराच्या आकर्षणापर्यंत आणि परंपरागत प्रतिष्ठितांच्या अवनतीपासून ते महाराने वकील होण्यापर्यंत. परंतु याहून



अनुक्रमणिका

अगदी निराळा व अकल्पित असा परिणाम इंग्रजी साम्राज्याचा होता, जो आपल्याला आजही जाणवतो. तो म्हणजे साम्राज्यातील प्राजाजन असण्यामुळे हिंदी लोकांना साम्राज्यभर पसरण्याची आलेली संधी. मॉरिशस, पूर्व आफ्रिका, वेस्ट इंडीज अशा दूर ठिकाणी व्यापारी म्हणून, व्यवसायिक म्हणून किंवा वेठीला धरलेले मजूर म्हणून भारतीय लोक गेले व तिथे स्थायिक झाले. दक्षिण आफ्रिकेत स्थायिक झालेल्या भारतीयांच्या हक्कांसाठी गांधीजींना केवढा लढा द्यावा लागला ते सुपरिचित आहे. विशेष म्हणजे गोविंद बाबाजी यांच्या 'रोजनिशी'त मॉरिशसला कंत्राटी मजूर म्हणून गेलेल्या व तेथून पळून आलेल्या रामशेट वाण्याची हकीकत येते. रामशेट मूळचा कोकणातील. तो अकरा वर्षांचा असताना मुंबईला पळून आला. त्यावेळी इंग्रजांनी एडन येथे किल्ला बांधण्याचे काम चालविले होते, तेथे रामशेट मजूर म्हणून गेला. तिथे पेस्तनजी नावाच्या पारध्याला रामशेटने एका खटल्यातून वाचवले. रामशेट परत मुंबईला आल्यावर 'एक ' घाटी मनुष्य येऊन म्हणू लागला. 'तू जर मॉरिशस येथे येशील तर तुजला द.म. रु. ५० मिळेल.' वीस वीस माणसांचा एक जथा किंवा 'नंबर' करून माणसे मॉरिशसला पाठवीत. 'अशी वीस माणसे तयार झाल्यावर आम्हाला गलबतावर चढविले... एकोणतिसावे दिवशी मॉरिशस टापूला पोचलो. जशी मुंबई तसे मॉरिशस शहर आहे... मग कोणी अर्धा नंबर (१० माणसे) कोणी एक नंबर (२० माणसे) अशा फराशिसांनी विकत घेतले.' (३०१).

उसाच्या मळ्यावर रामशेटला जेवून-खाऊन द.म. रु. ५ पगारावर काम करावे लागले. या मजुरांना मळा सोडून जावयाचे असल्यास पास काढावा लागे. रामशेटची फसगत झाली होती आणि मळ्यावरची मजुरी त्याला झेपेना. त्याने १४ रु. देऊन बनावट पास तयार केला व मळ्यामळ्यातून उसाच्या आडोशाने तो मॉरिशस शहरात पोचला. शहरात साखरेचा कारखाना होता. त्या कारखान्यात पूर्वी एडनला भेटलेला पारशी पेस्तनजी अधिकारी होता. पेस्तनजीने रामशेटला घरी चोरून आश्रय दिला. कारखान्याच्या मालकिणीच्या मदतीने पेस्तनजीने रामशेटला सोडविले व मुंबईला पाठवून दिले.

नंतर रामशेटच्या चरित्राची एक नक्कल करून रा. विश्वनाथ नारायण मंडलिक यांजकडे (पाठविली.) परदेशात जे मजूर हिंदुस्थानातून जातात त्यांच्यावर कसा जुलुम होतो हे सरकारचे कानापर्यंत जाईल अशी आपण काय तजवीज लिहिली आहे. ती अशी - 'परदेश गमनाबाबतच्या कायद्यात मजूर लोकांसंबंधाने ज्या सवलती झाल्या आहेत त्यास या माझे पत्राचा बराच उपयोग झाला आहे.'

५

समाजातल्या या घालमेलींची तत्पर नोंद गोविंद बाबाजी यांनी जाग-जागी घेतली आहे. पण या घडामोडीं-मागील कर्ती संस्था जी इंग्रजी राज्य त्याच्याविषयी आपला अभिप्राय त्यांनी नमूद केलेला नाही. १८५७ चा भडका गोविंद बाबाजींनी पाहिला होता. पण त्याबद्दल गोविंद बाबाजींनी एवढेच म्हटले आहे की या धामधुमीचा उपयोग देशी संस्थाने कायम होण्याइतकाच झाला. एका तळटीपेत ते सांगतात, 'थोडक्यात सांगितले तर सर्व नेटिव्ह राज्ये कायम राहण्यास नानासाहेब कारण आहेत आणि ते उत्पन्न झाले नसते तर डलहौसीचे होमकुंडात यावत् सर्व नेटिव्ह राज्यांचा आणि इनामदार जहागीरदार यांचा स्वाहाकार झाला असता यात संदेह नाही.'(२३८)

गोविंद बाबाजी यांच्या समोर इंग्रजी राज्याविरुद्ध एक स्थानिक उद्रेक झाला व त्याचे तपशीलवार वर्णन त्यांनी केले आहे. गोष्ट अशी झाली की १८५९ साली सरकारने इन्कमटॅक्स चालू केला. वसईतील लोकांनी - म्हणजे इन्कमटॅक्स भरण्यास पात्र लोकांनी हा कर देणयाचे नाकारले. तेव्हा ठाणे जिल्ह्याचा प्रांताधिकारी हंटर नावाचा साहेब ठाण्याहून वसईस एका गलबतातून आला व लोकांची समजूत घालू लागला. रयत म्हणाली की, "हा कर सरकारने विचार केल्याशिवाय व आमच्या प्राप्तीचा पुरा तपास केल्यावाचून आम्हावर बसविला आाहे. आम्ही खुशीने कर देण्यास राजी नाही."

हे बोलणे चालले असता वसईचे लोक कोणत्या क्रमाने साहेबाचे पुढे उभे होते, तेही पाहण्यासारखे आहे. 'सर्वांचे पुढे पांढरपेशे (ब्राह्मण, प्रभू, गौडब्राह्मण वगैरे), त्यामागे वाणी-उदमी, त्यांचे मागे कासार, सोनार, मुसलमान, व सर्वांचे शेवटी, काही अंतरावर मच्छी मारणारे कोळी व वसई-आगारातील किरिस्ताव, पोर्तुगीज, माळी सुमारे तीनशेपासून चारशे लोक उभे होते.' (४८) एके काळी वसईतील राज्यकर्ती जमात म्हणजे किरिस्ताव व पोर्तुगीज. पण






त्यांची आता इतकी घसरण झाली होती.

साहेबाने लोकास निवेदन केले की, सरकारास नानासाहेबांबरोबर लढाई करताना बहुत खर्च झाला आहे. हाल-अपेष्टाही पुष्कळ भोगाव्या लागल्या आहेत. कर्ज फार झाले आहे व त्याचे फेडीकरिता इन्कमटॅक्स (हा) नवीन कर बसविणे भाग आहे. (४९) वसईचे गोवर्धनदास शेट यांना कर भरण्याचे मागणीपत्र (नोटीस) आले होते. त्यांनी जबाब दिला की, "सरकारचे पुष्कळ अव्यवस्थित खर्च आहेत... साहेब लोकांस इतकाले मोठे पगार आहेत की, एका साहेबाचा जो पगार असतो त्याच्या चौथ्या हिश्शात त्याच्या ऑफिसचा सर्व एस्टॅब्लिशमेंटचा पगार असतो. आम्ही हिंदुस्थानवासी लोकांनी अगदी दरिद्री व्हावे, आमच्या घरात जी धातूची मोठी भांडी व दागदागिने आहेत ते नाहीसे होऊन ज्याप्रमाणे अमेरिकेतील रेडइंडियन लोकांचा निकाल झाला तसा आमचा निकाल व्हावा अशी आपल्या लोकांची इच्छा आहे." (५०)

यानंतर हंटर साहेब व त्याचे ७-८ शिपाई यांनी शेठजीस धरले व पायऱ्या चढवून बहुधा डाकबंगल्यात नेले. तेव्हा जमावाने बंगल्यावर हल्ला करून शेटजींची सुटका केली. त्यामुळे हंटर साहेब घाबरला व पळत धक्क्यावर जाऊन आपल्या जहाजात बसला. जहाज धक्क्यापासून सोडले व ते समुद्रात गेले. जमाव साहेबाच्या मागे होताच. कोळी लोकांनी पोहत जाऊन जहाज धरले व पुन: धक्क्यावर आणले. साहेबाच्या भोवती घोळका करून त्याला विनंती करू लागले की, इन्कमटॅक्समधून आमची सुटका करा. साहेब मोठ्याच अडचणीत आला होता व तो घाबरलाही असणार. पण तितक्यात पांढरपेशे लोक आले. त्यांनी लोकांची समजूत घालून साहेबाची सुटका केली व त्याला जहाजावरून रवाना केले. (५४)

'दोन दिवसांनी काही साहेब लोक व शंभर पोलिसाचे शिपाई ठाण्यातून एकदम वसईत पहाटे येऊन गावात शिरले. सुमारे ३०-४० सावकार व व्यापारी लोक यांस एकदम पकडून ठाण्यास नेले. हा कज्जा ठाण्याचे सेशन जज्ज मे. फार्बससाहेब यांजपुढे ऑनेस्ट्री साहेब, बॅरिस्टर यांनी चालविला. एकदोन आसामींवर धिंगामस्ती व गर्दी केल्याचा पुरावा झाल्यामुळे तितक्यांस मात्र वर्ष सहा महिन्यांच्या शिक्षा झाल्या.' (५५)

या प्रकरणात वसई गावातील लोकांच्या स्पृहणीय एकोप्याचे दर्शन झाले. 'हिंदू लोकांनी अनुष्ठाने बसविली. ख्रिस्ती, मुसलमान लोकांनी आपापल्या देवळातून पुढारी लोकांच्या सुटकेकरिता प्रार्थना केल्या.' (५६)

या उताऱ्यात शेट गोवर्धनदास यांनी इंग्रज लोकांची इच्छा हिंदी लोकांची स्थिती रेड इंडियनांच्या स्थितीप्रमाणे व्हावी, अशी असल्याचा आरोप केला आहे. ही भीती बऱ्याच विचारी लोकांस तेव्हा वाटत होती, असे दिसते. गोविंद बाबाजी ग्रामसभा स्थापण्याचा प्रचार करीत कल्याणला गेले असता तेथील रामभाऊ केळकर म्हणाले, "पन्नास-शंभर वर्षांनी सांप्रत वारली कोळी लोकांची जशी स्थिती झाली आहे तशी दशा इंग्रज सरकार आमची करणार आहे, यात संशय नाही... ज्यांचे मनात तुम्हाला निर्धन करून टाकावयाचे आहे, ते तुमच्या अशा सभांकडे कशास पाहतील? (४२) दादाभाई नौरोजी यांनी याच सुमारास (१८६८ साली) कसून अभ्यास करून इंग्लंड हिदुस्थानाची संपत्ती लुटून नेत आहे हे दाखवून दिले होते. रामभाऊ केळकर यांना हा सिद्धांत नाहीत नसेलही. पण देश दरिद्री होत आहे, याचा अनुभव त्यांना येत होता.

यानंतर १८७२ साली गोविंद बाबाजी यांना लेले नावाचा मुलगा भेटला. तो पुण्याला वक्तृत्वोत्तेजक सभेपुढे भाषण करण्यास जाणार होता. त्याने बहुधा एक सराव-व्याख्यान ठाण्याला दिले. त्यावर गोविंद बाबाजींचा शेरा असा - 'मुलगा धीट आहे. परंतु त्याचे मनात वाईट ग्रह भरले आहेत की इंग्रज सरकारचे राज्य वाईट वगैरे, ते अगदी बरोबर नाहीत. ज्या लोकांत मागील राज्याची शेवटील पद्धत पाहून माहीत आहे, तो कधी असे म्हणणार नाही. परंतु अलीकडे अशी चमत्कारिक समजूत होत चालली आहे; आणि याजला मुख्य कारण अलीकडील जे युरोपियन लोक या देशात येत चालले आहेत, त्यांजपैकी कित्येक हलकट असल्यामुळे रयतेवर जुलुम होतो. (३८७-८८)' यानंतर गोविंद बाबाजी पोक्तपणे उपदेश करतात, "या भाषण करणाऱ्या मुलाचे वय मला वाटते की, सुमारे पंधरा वर्षाचे असेल. तर अशावेळी त्याने अभ्यासाकडेच मन ठेवावे हे चांगले; व अशा गहन विषयाचा विचार हल्लीपासून करू नये. (३८९).

व्यवस्था व व्यवस्थेच्या चौकटीतील अधिकारी यांच्यापैकी कोणाला जबाबदार धरायचे असा प्रश्न नेहमी निर्माण होतो. अगदी विज्ञानात देखील 'वैज्ञानिक सिद्धांत' त्याज्य झाला आहे की त्या सिद्धांताला धरून संशोधन करणारा शास्त्रज्ञ कुचर ठरला आहे, याचा निर्णय करावा लागतो.

राष्ट्रीय चळवळीचा विकास होत गेला तसतशी लोकांची खात्री पटत गेली की, इंग्रज राज्य हेच 'सैतानी' आहे. त्या राज्याची हुकुमत राबविणारे अधिकारी केवळ निमित्तमात्र आहेत. अधिकाऱ्यांच्या वागणुकीमुळे जुलुम होतो, असे नसून मुळात राज्याचे उद्दिष्टच जुलुम करण्याचे आहे. गोविंद बाबाजी हे लोकहितवादींच्या पिढीतले होते. कंपनीचे अधिकारी शिक्षित आणि घरंदाज एतद्देशीय लोकांत मिसळून खेळीमेळीने कारभार करीत, हे त्यांनी पाहिले होते. पण १८५७ नंतर परिस्थिती बदलली. इंग्रज अधिकारी एतद्देशियांपासून तुटून राहू लागले व अविश्वास दाखवू लागले. त्याचवेळी राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला आणि त्यात राणीच्या सर्व प्रजाजनांना समतेने वागविले जाईल, प्रशासन धर्मात ढवळाढवळ करणार नाही, संस्थाने जप्त होणार नाहीत अशी तोंड भरून आश्वासने दिली होती. साहजिकच गोविंद बाबाजी इंग्रजी राज्यातील अन्यायाचा दोष व्यवस्थेला न देता व्यवस्थेची अंमलबजावणी करणाऱ्यास देऊ लागले. उलट राणीने कारभार हाती घेतल्यावर जे जन्मले व शिकले त्यांना मात्र प्रत्येक अन्यायातून राणीच्या जाहीरनाम्याचा खोटेपणा प्रतीत होऊ लागला.

६

गोविंद बाबाजी हे वसईच्या पंतोजीच्या शाळेत शिकले. 'त्या वेळी अभ्यासाची रचना अशी असे की मोडी कागद वाचणे व मोडी अक्षर लिहिणे हे सर्व आणि विद्याभ्यासात प्राधान्य गुण असत... त्रैराशिक, पंचराशिक, अपूर्णांक, भूगोल, व्याकरण तोंडपाठ करणे व दोन-चार वाक्यांचे व्याकरण करता आले की ज्यास आपण बी.ए., एम.ए. म्हणतो तितकी त्याची योग्यता मानली जात असे. शुद्धलेखन मास्तरलाच माहीत नसे, मग शिष्यास कोठून येणार?'(VI) या ठिकाणी गोविंद बाबाजी यांनी तळटीप दिली आहे ती अशी - 'या पुस्तकात जी अशुद्धे पुष्कळ राहिली आहेत त्याचे कारणही आपल्या ध्यानात येईलच.' बरे, हे शिक्षणही प्रत्यक्षात शिक्षकाकडून विद्यार्थ्यापर्यंत जात नसे. प्रत्येक खड्यावर बसलेल्या मुलापुढे एक-एक धुळाक्षराचा मुलगा असावयाचा. त्याने (पक्षी : खड्यावर बसलेल्या मुलाने) दररोज एकीकडे कित्ता गिरविणे आणि एकीकडे त्या मुलाची (पक्षी : धुळाक्षराच्या मुलाची) उजळणी घेणे, त्याच धड्याची वाचणी देणे असा विद्याभ्यास चालत असे. (VII)

अशा या शाळेतील शिक्षण गोविंद बाबाजी यांनी चौथ्या इयतेतच संपविले. त्यांना इंग्रजी शिक्षण मिळालेच नाही. त्यांनी पुढे प्रसंगाप्रसंगाने इंग्रजीचा अभ्यास करून वाचण्यापुरते इंग्रजीचे ज्ञान संपादिले असावे. पण त्यांना इंग्रजी बोलता येत नव्हते इतके नक्की. कारण पुढे ते चॅटफिल्डसाहेब (शिक्षण संचालक) यास भेटण्यास गेले असता त्यांनी बरोबर इंग्रजी जाणणारा मुलगा दुभाषाचे काम करण्यासाठी घेतला होता. परंतु, आपल्या अशिक्षितपणाचा व इंग्रजी न येण्याचा कोणताच न्यूनगंड त्यांच्या ठिकाणी असल्याचे दिसत नाही. कोकणी माणसाच्या ठिकाणी जी एक ढकलगिरी (पुशिंग नेचर) आढळते तिची उपस्थिती गोविंद बाबाजींच्या स्वभावात असावी.

गोविंद बाबाजींच्या या ढकलगिरीस तात्त्विक आधारही होता. प्रस्तावनेत ते लिहितात, 'सरतेशेवटी माझे प्रिय देशबंधूस इतकीच विनंती आहे, की जे काही खरे, सत्य तुम्हास वाटेल ते करण्याकरिता बिलकुल घाबरू नका. कोणतीही गोष्ट करण्याचे तुमचे मनात आले तर प्रथम हे माझे कर्तव्य आहे की नाही, याचा चांगला विचार करून एकदा मनाची खात्री झाली की माझे कर्तव्यापैकी ही गोष्ट आहे, त्यानंतर त्या गोष्टीत धर्माचा सुलाख (कसोटी) लावा. प्रमाणे या दोन्ही बाबतीत तुमची एकदा खात्री झाली म्हणजे लोक काय बोलतील इकडे बिलकुल लक्ष देऊ नका. माझे कर्तव्य आहे आणि ईश्वर राजी आहे, मग देशरिवाज, देशाचार आणि सरतेशेवटी प्राण यांची बिलकुल भीती बाळगू नका.' अशा निश्चयाने गोविंद बाबाजींनी नाना उपक्रम केले; काही सिद्धीस गेले व काही गेले नाहीत.

गोविंद बाबाजी हे चित्पावन ब्राह्मण. त्याकाळी ब्राह्मण-पोटजातीय विवाह होत नसत. (बाळाजी ऊर्फ बाजीराव नानासाहेब पेशवे यांनी मात्र देशस्थ मुलीशी १७६० मध्ये विवाह केला होता.) पण गोविंद बाबाजींनी ठरवून आपल्या एका मुलीचा विवाह कऱ्हाडे ब्राह्मण वराशी व दुसरीचा विाह देशस्थ ब्राह्मण तरुणाशी केला. विधवा-विवाहाला पाठिंबा ही तेव्हा सुधारणेची पराकाष्ठा समजली जाई. गोविंद बाबाजी यांची विधवा-विवाहाला अनुकूलता होतीच, पण अशा प्रकरणात ते सक्रीय मदत करीत. या 'धर्मलंड' वागणुकीमुळे गावातील लोकांनी गोविंद बाबाजी

यांना अनेकदा बहिष्कृत केले. शेवटी वारंवार बहिष्कार टाकण्याच्या उद्योगाला कंटाळून 'मजला जातीबाहेर टाकण्याचे सोडून दिल्यासारखे सांप्रतच्या कालमानास अनुसरून केले आहे त्याजमुळे मी त्यांचा आभारी आहे. (४२)'

'पैसाफंड' ची चळवळ पुढे टिळकयुगात बऱ्याच भरभराटीला आली. अंताजीपंत काळे यांनी पैसाफंडाचा प्रचार करण्याचे व्रतच घेतले. जी रक्कम जमा झाली तिच्यातून तळेगावला पैसाफंड काचकारखाना उभा राहिला. तळेगावच्या 'समर्थ विद्यालय' या राष्ट्रीय शाळेतील विद्यार्थी या कारखान्यात काच टाकण्याचे कसब शिकले व त्यापैकी गोपाळराव ओगले यांनी स्वतःचा कारखानाही काढला. पण या पुढच्या गोष्टी. पैसाफंडाची मूळ रचना गोविंद बाबाजी यांची. 'रोजनिशी'त २२ जुलै १८७२ ची नोंद अशी आहे की, 'आम्ही नांदगाव येथे रा. हरी परशराम बर्वे यांच्याशी बोलत असता सार्वजनिक 'पै फंडाची पेटी' गावोगावी स्थापन करावी आणि त्यायोगे एक राष्ट्रीय फंड उभा करावा याबाबत बोलणे झाले होते. त्या विचाराच्या अनुरोधाने एक पुस्तक लिहून तयार केले आहे.' (५२३-२४). हे पुस्तक मुळात गुजरातीत होते. त्याचा मराठी अनुवाद गोविंद बाबाजींनीच केला. ही पुस्तिका 'रोजनिशी'त छापली आहे. ज्या पेटीत लोकांनी पै-पैसा टाकायचा त्या पेटीचे चित्रही पुस्तिकेत छापले आहे.

गोविंद बाबाजींची 'ढकलगिरी' असे मी ज्याला म्हणतो त्याचे उदाहरण सर. टी. माधवराव यांच्याशी त्यांची भेट झाली त्या प्रसंगावरून दिसून येते. ७४ सालच्या जुलैत गोविंद बाबाजी बडोद्यास गेले असता त्यांनी माधवरावांची भेट मिळवण्याचा प्रयत्न केला. ते सर साहेबांच्या घरी गेले. पण त्यांचे मळके-फाटके कपडे पाहून पहारेकरी त्यांना आत जाऊ देईना. इतकेच काय, यांचे 'व्हिजिटिंग कार्ड' देखील तो नेऊन देईना. तेव्हा गोविंद बाबाजी चिकाटीने सकाळी ७ ते १० अंगणात जमिनीवर बसून राहिले. पुढे सर साहेबांची आणि गोविंद बाबाजी यांची चांगलीच ओळख झाली. १८७७ च्या दुष्काळात गोविंद बाबाजींवर हालाखीची परिस्थिती ओढावली तेव्हा माधवरावांनी 'सार्वजनिक उपदेशक' या पदावर बडोदे सरकारकडून नेमणूक करविली.

'सार्वजनिक उपदेशांचे व्रत गोविंद बाबाजी यांनी १८६२ पासूनच पत्करले होते. या कामात त्यांनी किती हाल सोसले, पदरमोड केली व अवहेलना पत्करली हे आपण पाहिले आहे. पण १८७० सालानंतर गोविंद बाबाजींच्या कार्याचे किंवा कार्यनिष्ठेचे महत्त्व कळले म्हणून म्हणा किंवा गोविंद बाबाजींची भाषणे सराईतपणे व परिणामकारक होऊ लागली असतील म्हणून म्हणा, त्यांचा गौरव व सत्कार होऊ लागला. नोव्हेंबर १८७३ मध्ये गोविंद बाबाजी यांनी फ्रामजी कावसजी इन्स्टिट्यूटमध्ये भाषण केले. ते जमलेल्या समुदायास इतके पसंत पडले की, त्याच ठिकाणी वर्गणी सुरू होऊन मजला ७५ रु. ची शालजोडी देण्याचा ठराव केला. (५८८) एदलजी हिराजीभाई हे पारशी गृहस्थही गोविंद बाबाजी यांच्या कार्याची कदर करणारे होते. ते गोविंद बाबाजी यांना म्हणाले की, "आज माझ्या मनात आले की, अशा पावसाळ्याचे दिवसात आपले घर, मुले-माणसे सोडून, पदरच्या भाकरी खाऊन सार्वजनिक हिताकरिता तुम्ही जे श्रम करिता अशा पुरुषाच्या तसबिरी आमच्या संग्रही असल्याने आम्हास तुमचे वारंवार स्मरण होत राहील." त्यानंतर गोविंद बाबाजींना घेऊन स्टुडिओत गेले व त्यांचे फोटो काढून घेऊन आले.

७

इंग्रजी राज्य सुरु झाल्यापासून एकोणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनात संस्थानिकांना महत्त्वाचे स्थान होते. महाराष्ट्रातील पारंपरिक पुढारीपण या राजे-रजवाडे व जहागीरदार यांच्याकडे असल्याने नव्या युगात देखील लोक संस्थानिकांकडेच नेतृत्वाच्या अपेक्षेने पाहत. त्या काळात लोकपक्ष व सरकारपक्ष यांच्यातील विरोध उकळीला आलेला नसल्याने संस्थानिकांना देखील सार्वजनिक संस्थांचे नेतृत्व किंवा सार्वजनिक कार्याला आर्थिक मदत करताना अडचण वाटत नसे. महाराष्ट्राच्या ब्राह्मण संस्थानाचा मगदूर बेताचा होता. मराठा संस्थाने म्हणजे, मुख्यत: कोल्हापूर, फलटण. इंदूर. ग्वाल्हेर, बडोदा ही संस्थाने भूगोलात महाराष्ट्राबाहेर असली तरी मराठी समाजाला त्यांच्याविषयी आत्मीयता वाटे. साहजिकच महाराष्ट्रातील सार्वजनिक कार्यकर्त्यांचे या संस्थानांशी दळणवळण असे.

गोविंद बाबाजी यांचे इंदूर व बडोदा या दरबारांशी चांगलेच आपुलकीचे संबंध होते. गोविंद बाबाजी यांचे भाषण व संभाषण या दोन्ही गोष्टी फार आर्जवी व लाघवी असल्या पाहिजेत. त्यांच्या भाषेतील निरागस, प्रांजळ भाव 'रोजनिशी' वाचताना जाणवतो. इंदूरचे तुकोजीराव यांच्यावर गोविंद






बाबाजी यांची चांगलीच छाप पडली असावी. कारण तुकोजी-रावांनी गोविंद बाबाजींना अंतःपुरात नेऊन त्यांच्याकरवी राण्यांना उपदेशपर गोष्टी सांगितल्या.

तथापि, गोविंद बाबाजी यांचा अधिक निकटचा संबंध बडोदे संस्थानशी आला. त्यावेळी मल्हारराव गायकवाड हे बडोद्याचे संस्थानिक होते. महाराजसाहेब माझे भाषण ऐकून इतके खुश झाले की, प्रवासाचे खर्चाकरिता त्यांनी २०० रु. वर्षासन करून देण्याचे कबूल केले होते व त्याप्रमाणे सनद करून देण्याविषयी (त्यावेळचे बडोद्याचे दिवाण) मे. दादाभाई नौरोजी यांस हुकुम केला होता. (५९९) पण ही सनद काही गोविंद बाबाजी यांचे हाती पडली नाही. अर्थात्, बडोदे दरबारच्या या मर्जीमुळे गोविंद बाबाजी हे गायकवाडांचे ओशाळे झाले, असे मुळीच नाही. अगदी लहानपणी गोविंद बाबाजी बडोद्याला गेले असता काही समारंभाच्या निमित्ताने राजेसाहेबांची मिरवणूक निघाली होती व तीत आतषबाजी चालली होती. रस्त्याच्या बाजूला घरातील लोक या आतषबाजीमुळे घराला आग लागेल या शंकेने भयभीत झाले होते. संस्थानांचा जरब असल्याने तक्रार मात्र करत नव्हते यांची नोंद गोविंद बाबाजींनी केली आहे. (XI-XII) पुढे १८७७ साली नाइलाजास्तव त्यांनी बडोद्याची चाकरी पत्करली. पण तिचा त्यांना काच वाटत होता, हे त्यांनी स्पष्ट लिहिले आहे. (६२०). मल्हारराव यांची राजवट एकंदरीने अस्वस्थतेचीच गेली व अनेक घालमेली झाल्या. त्या संबंधात १७ ऑगस्ट १८७३ रोजी त्यांनी रा. दादासाहेब खानविलकर, दिवाण, निसबत गायकवाड सरकार यांस पत्र लिहिले. त्यात त्यांनी म्हटले होते, 'सांप्रत काळी बडोद्याचे राज्यकारभाराविषयी इंग्रजी, मराठी व गुजराथी पत्रात कागाळ्या व टीका छापल्या आहेत. त्या वाचून चित्तात अति दुःख होते. आधीच नेटिव्ह संस्थानांचा इंग्रज सरकारास कंटाळा, तशाच वारंवार असा गिल्ला होणे याचा परिणाम शेवट किती गंभीर होईल हे माझ्याच्याने येथे लिहिवत नाही. राजाचे भोवताली तोंडपुजे व आत्मस्वार्थी लोक असले म्हणजे जो भयंकर परिणाम व्हावयाचा तशाच स्थितीत गायकवाडांचे राज्य आहे. (५६५)

गोविंद बाबाजीसारख्या क्षुल्लक मनुष्याच्या इशाऱ्याचा परिणाम तो काय होणार? मल्हारराव गायकवाडां-विरुद्धचे काहूर दाटतच गेले. अखेर जानेवारी १८७५ मध्ये इंग्रज रेसिडेंटवर विषप्रयोग केल्याचे आरोपावरून मल्हारराव यांना कैद करण्यात आले. त्यांच्या चौकशीसाठी आयोग नेमण्यात आला. त्यात तीन इंग्रज अधिकारी आणि ग्वाल्हेरचे शिंदे, जयपूरकर राजारामसिंग व राजा सर दिनकरराव राजवाडे हे तिघे हिंदी सदस्य होते. २२ फेब्रुवारी पासून १८ मार्चपर्यंत या चौकशीचे काम चालले. या कमिशनमध्ये मुंबईचे एक-दोन वर्तमान पत्रांचे तर्फे रिपोर्टर या नात्याने हजर झालो होतो. (६००). या वेळी दररोज कमिशनमध्ये काय काय झाले या हकीकतीचे मराठीत वर्तमानपत्र लोकांस वाटण्याकरिता मी काढत असे. हे पत्र चार दिवस निघाल्यानंतर ज्या मंडळीने दररोजच्या प्रोसिडिंगाचे भाषांतर करून देण्याचे कामी मदत करण्याचे कबूल केले होते. त्यांनी योग्य वेळी मदत केली नाही म्हणून बंद पडले. (६०३) गोविंद बाबाजींच्या या साहाय्यकावर जबरदस्त दडपण आले असणार हे उघड आहे.

मल्हाररावांना कमिशनने दोषी ठरवून पदच्युत केले व त्यांचा व त्यांच्या वंशजांचा कोणताही अधिकार संस्थानावर राहणार नाही असे जाहीर केले. पण बडोद्यातील प्रजा चवताळली. मल्हाररावांच्या सहा महिने वयाच्या मुलास लोकांनी जबरीने गादीवर बसविले. तैनाती फौजेचे मुख्य 'जनरल डिव्हाईन' यांना घेरा घातला. गाडी तेथच्या तेथे जाळून टाकली. (६०७). दामू नेने नावाच्या मनुष्याने मल्हारराव महाराजांनी कर्नल फेर (रेसिडिंट) यास विष घातले अशी जबानी दिली होती. 'दाम्या नेन्याचे घरात लोक शिरले. दाम्याचे बायकोस तिची विटंबना करून बाहेर हाकलून दिले.' (६१३) गोविंद बाबाजी सांगतात की दामू नेने याच्या जबानीवर कमिशनने बिलकुल विश्वास ठेवला नाही. नंतर तळटीपेत लिहितात की, 'याजला सांप्रत गायकवाड सरकारच्या खजिन्यातून सरकार २०० रु. पेन्शन द.म. देत असते.' (६१२-६१३)

सर माधवराव यांनी बडोदे राज्यात नोकरी देण्याची इच्छा गोविंद बाबाजींपाशी बोलून दाखवली होती. 'परंतु मी आपली ब्रिटिश राज्यातली नोकरी सोडून उपदेशाचा धंदा पत्करला तो सोडून पुनः परवशतेच्या बेडीच्या हातात हात घालून घेऊन नये या हेतूने नोकरी करण्याचे कबूल केले नाही.' (६१५). १८७७ साली मोठा दुष्काळ पडला. गोविंद बाबाजी यांची स्थिती हलाखीची झाली. कधी नव्हे ते कर्जबाज झाले. 'नंतर मी बडोदे येथे येऊन सर माधवरावास भेटलो आणि ता. १७ मार्च सन १८७७ पासून 'पब्लिक प्रीचर' या नोकरीवर










राहिलो तो आजपर्यंत आहे.' (६२०)

डॉ. जोशी सांगतात की, १८९७-९८ च्या सुमारास गोविंद बाबाजी यांनी बडोदे सरकारची नोकरी सोडली व ते वसईला येऊन राहिले. या वेळी त्यांनी आयुष्याची सत्तरी ओलांडली होती. म्हणजे त्या काळच्या भाषेत बोलायचे तर 'म्हातारा अगदी पिकला होता.' तरी ते सार्वजनिक कामात होतेच. शेवटी प्लेगाची लागण होऊन १ मे १९०६ रोजी ते मृत्यू पावले.

८

अशी ही गोविंद बाबाजींची हकीकत आहे. एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनाची पायाभरणी करण्यात जगन्नाथ शंकरशेट, डॉ. भाऊ दाजी, विश्वनाथ नारायण मंडलिक ही प्रमुख मंडळी होती. पण त्यांचे कार्य परिणामकारकपणे चालावे यासाठी तृणमूल स्तरावर काम करणारे खटपटी, हुन्नरी, कळकळीचे आणि निरलस कार्यकर्ते जिल्ह्याजिल्ह्यातून तयार होणे गरजेचे होते. ही गरज भागविणाऱ्यात गोविंद बाबाजी अग्रगण्य होते असे म्हणावे लागेल.

गोविंद बाबाजींच्यापाशी चौकसपणा, सभाधीटपणा, परिश्रम करण्याची तयारी, निरीक्षणशक्ती, कोठे काम कमी पडते आहे हे ओळखण्याचा चाणाक्षपणा, कोणतीही अडचण सोसण्याचा उत्साह, लोकांशी बोलण्याची व त्यांना बोलते करण्याची हौस, प्रामाणिकपणा आणि निर्व्याज वृत्ती असे अनेक शेलके गुण होते. पैसाफंडाची चळवळ त्यांनी सुरु केली, रायगडच्या जीर्णोद्धाराकडे लोकांचे लक्ष वेधले. विधवा-विवाहाला सक्रीय पाठिंबा दिला. ब्राह्मण/पोटजातींच्या एकीकरणाची सुरुवात केली. मुख्य म्हणजे १९ व्या शतकातील पहिल्या तीन चरणातील महाराष्ट्राच्या समाजाचे प्रत्ययकारी चित्र त्यांनी सहजपणे व सोप्या भाषेत उभे केले.

१८५५ साली काँग्रेस स्थापन झाली. सुरुवातीच्या काळातील काँग्रेसचे ठराव, तत्त्वत: गोविंद बाबाजींनी वसईच्या ग्रामसभेकडून जे अर्ज विलायत सरकारकडे केले होते. त्याच्या पलीकडे गेले नव्हते. गोविंद बाबाजी हे देखील काँग्रेसच्या अधिवेशनाला जात. मद्रास (१८८७), अलाहाबाद (१८८८), मुंबई (१८८९) या ठिकाणी भरलेल्या अधिवेशनात गोविंद बाबाजी हजर होते. तथापि काँग्रेसवर विद्यापीठातून पदवी मिळविलेल्या तरुणांचा वरचष्मा होत चालला. हे पदवीधर मिल, स्पेन्सर, ह्यूम अशांच्या अनीश्वरवादाचे किंवा अज्ञेयवादाचे संस्कार घेऊन आले होते. गोविंद बाबाजींनी सार्वजनिक काम केले ते ईश्वरावर निष्ठा ठेवून व धर्माची कसोटी आपल्या कार्यास लावून. केवळ बुद्धीच्या व ज्ञानाच्या जोरावर केलेल्या वागणुकीतून कळकळीचे काम होते, असे गोविंद बाबाजींना वाटत नसे. १८९४ साली त्यांनी नवीन सुशिक्षितांच्या चळवळीविषयी म्हटले होते, 'चळवळ पुष्कळ असते तरी ती आतून अगदी पोकळ असते. ती (पक्षी : चळवळ) धर्मश्रद्धेने भरून काढल्याशिवाय पुणे, मुंबई येथील विद्येच्या बाजारातून दरसाली निघणारा वणजारी तांडा देशाच्या पूर्ण उपयोगी पडण्यास कधी पात्र होणार नाही.' (२९२)

इंग्रजी राज्य येण्यापूर्वीचा मराठी समाज स्थायू होता असे नाही. त्यातही बदल घडत होतेच. तथापि जाणीवपूर्वक परिवर्तन घडवून आणता येते, या गोष्टीची त्याला माहिती नव्हती. इंग्रजांच्या सहवासाने म्हणा किंवा स्वातंत्र्य गेल्याच्या धक्क्यामुळे म्हणा लोकहितवादी, मंडलिक, जगन्नाथ शंकरशेट यांच्या पिढीने जाणीवपूर्वक परिवर्तन घडवून आणण्याचा निश्चय केला. या कामात गोविंद बाबाजी यांनी तनमनधन पणाला लावून स्वतःला वाहून व वाहवूनही घेतले.

☑ ☑ ☑

'जीर्णोद्धार' मालिकेचे चांगले स्वागत झाले. त्या मालेतील हा शेवटचा लेख.

**कोणा प्रकाशकाला हे एकत्रित पुस्तकरुपाने प्रसिद्ध करावयाचे असल्यास त्याने प्रा० यशवंत कळमकर, कार्यवाह, प्राज्ञपाठशाळा मंडळ यांच्याशी संपर्क साधावा.**

मागील अंकात 'जीर्णोद्धार : सुखाचा मूलमंत्र' या लेखावर लेखकाचे नाव श्री० मा० मराठे असे छापले गेले आहे. तो लेख श्री० मा० भावे यांनी लिहिलेला आहे. अक्षम्य अनवधानाबद्दल दिलगिरी.

- अतिथी संपादक

विस्मृत परंतु अविस्मरणीय

# गांधी-गौरवाची मीमांसा

### लोकमान्य टिळक

गेल्या साली म्हणजे १९१७ च्या डिसेंबर महिन्यात कलकत्त्यास कॉंग्रेस सभेस गेलो असताना तेथे सौ. अवंतिकाबाई गोखले ह्यांनी आपण महात्मा गांधींचे चरित्र लिहीत असल्याचे मला कळविले व त्यास प्रस्तावना लिहिण्यास मला विनंती केली. ही विनंती अर्थातच मला अमान्य करवेना. पण त्या वेळी हे पुस्तक इतक्या लौकर तयार होईल अशी मला कल्पना नव्हती. विशेषत: मी विलायतेस जाण्यास निघालो असता त्या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्याचे काम घाईघाईने उरकावे लागेल असे तर मुळीच वाटले नव्हते. पण आता तशी स्थिती आल्यामुळे ही प्रस्तावना कशीबशी तरी पुरी करावी लागत आहे. महात्मा गांधींच्या चरित्रास प्रस्तावना लिहिण्यास अधिक चांगली वेळ व फुरसत पाहिजे होती. ती मिळाली नाही याबद्दल मला वाईट वाटते. तथापि, 'अकरणान्मंदकरणं श्रेय:' ह्या न्यायाने मी ते काम करीत आहे. आणि या ग्रंथाचे वाचक वरील हकीकत लक्षात आणून त्याबद्दल मला माफी करतील अशी आशा आहे.

महात्मा गांधी यांचे नाव हिंदुस्थानात कोणास माहिती नाही असे नाही. अर्थात् त्यांच्याबद्दल थोडीबहुत माहिती करून घेण्याची इच्छाही सर्व लोकांस झालेली आहे असे म्हटले तरी चालेल. परंतु ही इच्छा पूर्ण होण्यास मराठी भाषेत आजपर्यंत कोणताच ग्रंथ झालेला नव्हता. ती उणीव सौ. अवंतिकाबाई यांनी प्रस्तुतचा सोपा ग्रंथ लिहून भरुन काढली याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो. सौ. अवंतिकाबाई म्हणतात त्याप्रमाणे, महात्मा गांधी यांचे चरित्र अद्याप वाढते आहे. आणि ह्याच विषयावर नवा ग्रंथ लिहिणारास दरवर्षी नवीन माहिती मिळण्यासारखी आहे. म्हणून हल्लीच्या ग्रंथाने पुढील लेखकांस कोणत्याही प्रकारचा अडथळा न येता, उलट त्या कार्याची प्रस्तावना करुन, ह्या कट्ट्या देशभक्ताच्या चरित्राची महाराष्ट्र वाचकांस ओळख करुन देण्याची कामगिरी बजावल्याचे श्रेय मात्र सौ. अवंतिकाबाईंस मिळणार आहे. सौ. अवंतिकाबाई ह्या हल्ली चंपारण्यात महात्मा गांधी ह्यांस मदत करण्यासाठी व त्यांच्या हाताखाली राहून काम करण्यासाठी गेलेल्या आहेत, तेव्हा केवळ पुस्तकावरुनच नव्हे, तर प्रत्यक्ष अवलोकनानेही त्यांच्या चरित्र-नायकाचे विचार, आचार, स्वभाव, राहणी, अनेक विषयांवरील त्यांची मते, त्यांच्या कुटुंबातील माणसांशी किंवा इतरांशी त्यांचे वर्तन, यांचा त्यांना पुरा परिचय झालेला आहे. ग्रंथ लिहिण्याच्या कामी ह्या प्रत्यक्ष अवलोकनाचा पुष्कळ उपयोग झालेला आहे असे वाचकांस सहज दिसून येईल.

महात्मा गांधी यांचे चरित्र बोधप्रद आणि अनुकरणीय का व्हावे याची कारणे शोधून काढण्यास, माझ्या मते, फारसे परिश्रम नको आहेत. गांधी हे ज्याप्रमाणे विलायतेहून बॅरिस्टरची परीक्षा पास होऊन आलेले आहेत, त्याप्रमाणे बॅरिस्टर झालेले पुष्कळ लोक आहेत. त्यांचे वडील दिवाणगिरीच्या कामावर होते तसेही पुष्कळांचे असतील. किंवा ह्यांचा स्वभाव जरा साधा व सरळ आहे तसा इतरांचाही असेल. त्यात विशेष काही नाही. इंग्रजी विद्येचा ह्या देशात प्रचार झाल्यापासून निष्णात पुष्कळ लोक हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयांतून बाहेर पडलेले आहेत. जगाचा इतिहास किंवा भूगोल सांगोपांग माहीत असणे, अथवा एखाद्या शास्त्रीय विषयावरील माहिती बिनचूक सांगणे, ही कामे केवळ बुद्धिगम्य असल्यामुळे ती आमच्यापैकी पुष्कळ बुद्धिवान् लोकांनी गेल्या शेदीडशे वर्षांत उत्तम रीतीने करुन दाखविली आहेत. तसेच पाश्चात्त्य विचार, पाश्चात्त्य सामाजिक पद्धती, पाश्चात्त्य समजुती किंवा समाजरचना इत्यादी गोष्टींबद्दलही बौद्धिक किंवा तार्किक विचार करण्यात आमच्या सुशिक्षित वर्गाने आपली बुद्धिमत्ता चांगल्या प्रकारे व्यक्त केली आहे. परंतु शील किंवा चारित्र्य - ज्यामुळे या कर्ममय भूमीत मनुष्याची सभोवतालच्या वस्तुस्थितीवर सत्ता चालू शकते, आणि ज्यामुळे निरनिराळ्या गोष्टींबद्दल केलेल्या प्रयत्नांस सिद्धी प्राप्त होण्याचा संभव उत्पन्न होतो ते शील व चारित्र्य - ज्या उदाहरणावरुन आपल्या प्रत्यक्ष निदर्शनाला येईल, अशी चरित्रे आमच्याकडे फारच कमी दृष्टोत्पत्तीस येतात. गांधींच्या चरित्राचे जे काही वैशिष्ट्य आहे ते हेच होय. त्यांच्या

अनुक्रमणिका

सामाजिक, धार्मिक, राजकीय किंवा इतर मतांपैकी काही मते कितिएकांस कदाचित् पसंत होणार नाहीत. विद्वत्तेने त्यांना मागे टाकणारे दुसरे पुष्कळ गृहस्थ असतील, पण शीलचारित्र्याची जी महती वर सांगितली त्या दृष्टीने विचार केला महात्मा गांधी यांचे चरित्र खरोखर सामान्य मनुष्यास आदर्शभूत होण्यासारखे आहे, याबद्दल काही मतभेद असेल किंवा होईल असे आम्हास वाटत नाही. आणि म्हणूनच मराठी भाषेत झालेल्या ह्यांच्या प्रस्तुतच्या चरित्राचा महाराष्ट्रातील लोकांनी नीट अभ्यास करावा अशी आमची त्यांस शिफारस आहे.

हिंदुस्थानातील लोक, मग ते हिंदुस्थानात राहणारे असोत किंवा इंग्रजी साम्राज्याच्या इतर भागात राहणारे असोत, चोहोकडे विपन्न स्थितीत आहेत याबद्दल काही शंका नाही. तसेच ही विपन्नावस्था का आली, पूर्वीच्या स्थितीत कोणते अंतर पडले, हे अंतर न पडण्यास काय केले पाहिजे, इत्यादी गोष्टींची पुष्कळ चर्चा झाली असल्यामुळे त्याबद्दल या लहानशा प्रस्तावनेत आम्ही काही लिहू इच्छित नाही - किंबहुना महात्मा गांधी यांच्या चरित्रापासून जो बोध घ्यावयाचा त्याचा हा महत्त्वाचा भाग नाही अशी आमची समजूत आहे. व्यक्तीच्या संसारात काय, किंवा देशाच्या संसारात काय, परिस्थिती ही प्राय: पूर्वपिढीच्या किंवा पूर्वकालीन कर्मांच्या परिपाकाने निर्माण झालेली असते. ही स्थिती वाईट असल्यास त्याचा दोष त्या स्थितीत राहणाऱ्या मनुष्याकडे देता येत नाही, हे खरे आहे. पण ती जर वाईट असेल तर तिच्या कारणांचा योग्य ऊहापोह करून व ती दूर करण्यास कोणते उपाय केले पाहिजेत, ह्याचा शक्य तितका खोल विचारांती निर्णय करून तो निर्णय अंमलात आणण्याचे काम, म्हणजे अर्थात ती स्थिती सुधारण्याचे काम, जर सदर स्थितीत सापडलेला पुरुष, विशेषत: देशातील कर्ता पुरुष करणार नाही, तर मात्र तो आपल्या कर्तव्यास जागला नाही असे म्हणावे लागेल. कारण परिस्थिती उत्पन्न होण्यास जरी आपण कारणीभूत नसलो, तरी ती सुधारण्यास आपल्या हातून शक्य तेवढे प्रयत्न करणे, हे प्रत्येक मनुष्याचे व्यक्तिदृष्ट्या आणि सार्वजनिकदृष्ट्या कर्तव्य आहे, पवित्र कर्तव्य आहे, असा शास्त्राचा आणि धर्माचाही सिद्धांत आहे. ज्या योगाने जगाचे धारणपोषण होते त्याला धर्म असे म्हणतात, आणि जगाचे धारण-पोषण म्हटले म्हणजे त्यांत सद्यःकालीन परिस्थिती सुधारून ज्यायोगे ती परिस्थिती वरच्या पायरीला जाऊन अखेर पूर्णावस्थेला पोचेल त्या त्या सर्व गोष्टी करणे, करविणे, स्वत: करणे आणि लोकांकडून करविणे याचा प्राधान्येकरुन समावेश होतो. आपला जन्म कोणत्याही देशात झालेला असो, तो केवळ आपण त्या देशातील अन्न खाऊन आमरणांत आपल्या बायकामुलांसह चैनीत राहण्यासाठी नाही, यापेक्षा काहीतरी उच्चतर ध्येय सिद्ध करण्याकरिता आहे, ही गोष्ट शास्त्राकार आणि धर्मकार या दोहोंसही पूर्णपणे मान्य आहे. या उच्चतर ध्येयाची मर्यादा इतकी श्रेष्ठ आहे की, मनुष्य या मार्गाने जाता जाता अखेर त्याला ह्या जगाचे पालनपोषण करणाऱ्या परमेश्वराचे तादात्म्य प्राप्त होते, म्हणजे तो देवपणा पावतो, असे शास्त्रांतून वर्णन आहे. परंतु शास्त्र आणि धर्म या दोहोंच्याही आज्ञा जरी अशा प्रकारच्या आहेत तरी ह्या ध्येयाकडे आमच्या देशांतील लोकांचे जितके लक्ष लागावे तितके लागले नव्हते, असे मोठ्या दुःखाने म्हणावे लागते. एरवी सध्याची परिस्थितीच उत्पन्न झाली नसती. पण पूर्वकाली ह्या गोष्टीकडे देशातील कर्त्या पुरुषांचे जावे तितके लक्ष गेले नाही म्हणून प्रस्तुत काली आम्हीही तो मार्ग स्वीकारू नये असे होत नाही. देशाच्या उन्नतीसाठी जे काही प्रयत्न करावयाचे त्याला कालाची काही विशिष्ट मर्यादा असते असे नाही. पूर्वीच्यांनी असे प्रयत्न केले नसले तर पुढच्या लोकांनी करू नयेत असे नाही, आज केले नाहीत तर उद्या करू नयेत असे नाही आणि उद्या केले नाहीत तर परवा करू नयेत असेही होत नाही. अशा तऱ्हेचे प्रयत्न करणे हे आपले कर्तव्य आहे. आणि ही कर्तव्यजागृती ज्याच्या त्याच्या मनात ज्या ज्या क्षणी होईल, त्या त्या क्षणी त्याने हे आपले कर्तव्य बजावण्यास, निरलसपणे स्वार्थत्याग करून आणि आपणावर किंवा आपल्या कुटुंबावर संकटे येणार किंवा येतील याची पर्वा न करता, परमेश्वरावर भरवसा ठेवून, निष्कामबुद्धीने लागले पाहिजे, हा ह्यांतील सारभूत सिद्धांत आहे. म. गांधींच्या चरित्रावरुन जो काही बोध घ्यावयाचा, त्यापैकी मुख्य बोध हा होय.

अलीकडे दुसरी एक अशी समजूत होत चालली आहे की, हिंदुस्थान देशाची स्थिती सुधारण्यास प्रथमत: हिंदी समाजाची स्थिती सुधारली पाहिजे आणि ही सुधारेल तेव्हा मग पुढे राजकीय गोष्टींचा विचार करण्याची वेळ येईल. महात्मा

गांधी यांच्या चरित्रावरुन वरील मत किती अयथार्थ आहे हे वाचकांस सहज कळून येणार आहे. देशांतील सर्व काही सुधारणा घडवून आणण्यास 'सर्वारंभास्तण्डुला: प्रस्थमूला:' या न्यायाने त्या देशातील सत्ता, पूर्ण नाही तरी बऱ्याच अंशाने, देशातील कर्त्या आणि विचारी पुरुषांच्या हातात असावी लागते. सत्तेशिवाय शहाणपण फुकट जाते इतकेच नव्हे तर कर्तृत्वही निर्माल्यवत् होते. म्हणून देशाची स्थिती सुधारण्याचे जे प्रयत्न करावयाचे ते विशेषेकरून प्रथमत: ह्या सर्व सुधारणांना अवश्य लागणाऱ्या मूलभूत बाबतीतच झाले पाहिजेत. महात्मा गांधींचे असे मत नसते तर ते राजकीय सुधारणेत बिलकुल पडले नसते. आफ्रिकेतील वसाहतीत गेलेल्या हिंदी मजुरांच्या कल्याणार्थ त्यांनी जे प्रयत्न केले ते केवळ सामाजिकच होते असे नाही. आफ्रिकेतील जुलमी राज्यव्यवस्थेमुळेच तेथील हिंदी मजुरांवर हा प्रसंग ओढवलेला होता असे म्हटले तरी चालेल. ह्याचा गांधी यांच्या मनावर स्वभावत:च असा परिणाम झाला की, राज्यव्यवस्थेत सुधारणा झाल्याखेरीज आफ्रिकेतील हिंदी लोकांची स्थिती सुधारावयाची नाही. इंग्रज साम्राज्याचे जर आम्ही भागीदार आहो तर ह्या साम्राज्यात गोऱ्या प्रजेस हक्क आहेत तेच हिंदी प्रजेसही असले पाहिजेत, हे न्यायदृष्ट्या अगदी उघड आहे. पण गोऱ्या लोकांच्या आज ज्या वसाहती झालेल्या आहेत त्या वसाहतवाल्यांनी केवळ आपल्याच फायद्याकरिता केल्या अशी स्वार्थमूलक समजूत असल्यामुळे साम्राज्याच्या इतर भागातील लोकांस समबुद्धीने वागविण्यास ते तयार नाहीत. तथापि बाहेरच्या देशांतील लोक त्यांस अगदीच नको आहेत असेही नाही. कारण वसाहतीत नवीन किंवा खनिज द्रव्यें मुबलक असून ह्या संपत्तीचा पूर्ण उपयोग करण्यास वसाहतवाल्यांजवळ पुरेसे मनुष्यबळ नाही. हजारपाचशे किंवा दोनचार हजार गोरे वसाहतवाले दोहोंच्या ऐवजी चारचार हातांनी जरी काम करु लागले किंवा सहस्र बाहूंच्या शक्तींची कितीही यंत्रे त्यांनी उपयोगात आणिली तरी वसाहतवाल्यांस होणार नाही. तेव्हा आफ्रिकेत मागे निग्रो लोकांस ज्याप्रमाणे ते वागवीत, त्याचप्रमाणे हिंदुस्थानातील काळ्या लोकांस मजूर म्हणून तेथे नेऊन केवळ पशूंप्रमाणे त्यांस वागविणेची आणि त्यांच्या उद्योगावर आपण समृद्ध होण्याची वसाहतवाल्यांनी कल्पना काढली आणि आमच्या हिंदुस्थानातील नोकरशाही वसाहतवाल्यांच्या बांधवांचीच असल्यामुळे वहासतींतील हिंदी मजुरांच्या शोचनीय स्थितीकडे हिंदुस्थान सरकारचे लक्ष गेले नाही.

ही शोचनीय स्थिती हिंदुस्थानातील पुढारी लोकांच्या लक्षात येऊन गेल्यास पुष्कळ वर्षे झाली. पण गांधींसारखे पुरुष येईपर्यंत तिचे अल्प देखील निवारण झाले नाही. समजले होते पण उमजले नव्हते आणि उमजले तरी करवत नव्हते, असा प्रकार होता. या कुचंब्यातून लोकांना बाहेर काढून गांधींनी आपल्या उदाहरणाने सुधारणेचा मार्ग दाखविला, असे पुढील चारित्रावरून कोणासही कळून येईल. आफ्रिकेतील हिंदी लोकांस त्यांच्या विपन्नावस्थेतून सोडविण्यास गांधी यांनी काय केले याचेही जरा सूक्ष्मरित्या अवलोकन केले पाहिजे. एखाद्या ठिकाणची राज्यव्यवस्था अन्यायाची असली तरी ती सुधारण्याचा प्रयत्न करणे हा काही न्यायदृष्ट्या राजद्रोह होऊ शकत नाही. ह्याला राजद्रोह म्हणणे हे, राज्यकर्त्यांस न्याय नको, नीती नको, अन्यायाचा प्रतिकार करावयास नको, आपल्या प्रजेस समतेचे हक्क द्यावयास नकोत, असे म्हणण्यासारखे आहे. आम्ही असे समजतो की, प्रजेचे कल्याण हेच राज्यसत्तेचे खरे ध्येय व सामर्थ्य आहे. हा सिद्धांत एकदा पत्करला म्हणजे मग ज्या ठिकाणी अन्याय आहे तेथे त्याचा प्रतिकार करून तो दूर करणे म्हणजे एक प्रकारे राज्यसत्तेच्या ध्येयाची अंमलबजावणी करण्यास मदत करणे होय, असा त्यापासून सहजच दुसरा सिद्धांत निघतो. पण पूर्वसंचितामुळे आलेले दुराग्रह अगर स्वार्थबुद्धी यामुळे प्रजाजनांपैकी काही विशिष्ट व्यक्ती, जाती किंवा वर्ग कधी कधी इतके पछाडले जातात की, त्यांना ही न्यायाची तत्त्वे दिसेनाशी होतात; अर्थात अशा वर्गाचा इतर लोकांवर एक प्रकारे जुलूम होऊ शकतो. अशा वेळी राज्यकर्त्यांनी त्यात एकदम हात घालून अन्यायाच्या गोष्टी बंद केल्यास ह्या दुराग्रही व स्वार्थी पण परंपरागत वजनाने प्रतिष्ठित बनलेल्या वर्गास दुखवावे लागते व त्यामुळे शांततेची चालत आलेली घडी विस्कळीत होते. यास्तव अशा प्रकारच्या स्थितीत ज्यांच्यावर जुलूम होतो त्यांच्याकडून निकराचे प्रयत्न झाल्याखेरीज राज्यकर्ते प्राय: त्यात मन घालीत नाहीत. सारांश, चालते मूल ज्याप्रमाणे कोणीही कडेवर घेत नाहीत ठेच लागून पडले तर गोष्ट निराळी, अशातलाच प्रकार राजकीय बाबतीतही घडून येतो. जोपर्यंत राज्यकारभार

चालण्यात काही अडथळा येत नाही, तोपर्यंत राज्याची सूत्रे चालविणाऱ्या लोकांनी तरी तिकडे काय म्हणून लक्ष द्यावे? मनुष्यस्वभाव असा आहे की, चालत्या गोष्टीत विनाकारण कोणी ढवळाढवळ करू इच्छित नाही. त्यापासून दुष्परिणाम होतात असे प्रत्यक्ष अनुभवाला येईल, इतकेच नाही तर त्यामुळे अडेल तेव्हाच कोणीही मुत्सद्दी मनुष्य त्यात सुधारणा करण्यास प्रवृत्त होत असतो, एरवी नाही. अर्थात प्रजेच्या दुःखाची किंवा गाऱ्हाण्यांची किंवा त्यावर होणाऱ्या जुलुमांची स्थिती अशा मजलेपर्यंत आणून ठेवणे आणि शेवटी राज्यकर्त्यांकडूनच ती सुधारणा घडवून आणणे हे एक प्रत्येक देशभक्ताचे हरएक प्रसंगी कर्तव्य आहे आणि ते कर्तव्य गांधी यांनी उत्तमप्रकारे बजावले, त्यामुळेच ते सर्व लोकांच्या स्तुतीस व आदरास पात्र झालेले आहेत.

परंतु गांधींच्या ह्या अडवणुकीच्या मार्गाचे खरे रहस्य सांगण्यास आणखीही दोन शब्द सांगितले पाहिजेत. देशात शांतता राखण्यासाठी जे कायदे केलेले असतात, त्यात राज्यकर्त्या अमलदारांशी दांडगाई करणे अगर त्यांचा हुकूम तोडून बंड करणे ह्या गोष्टी कितीही सद्बुद्धीने केलेल्या असल्या तरी स्वभावतःच बेकायदेशीर मानल्या जातात. अशा वेळी ज्या देशभक्तास आपली इच्छित सुधारणा कायदेशीर रीतीने अंमलात आणावयाची असेल त्याच्या मार्गात अनेक अडचणी उत्पन्न होतात. मन जळत असते, सुधारणा करण्याची उत्कट इच्छा असते, कायद्याच्या मर्यादेचे उल्लंघन करणे गैरशिस्त होय, अशी खात्री असते, पण उपाय सुचत नाही. गांधी यांनी स्वीकारलेला निःशस्त्र प्रतिकाराचा, अडवणुकीचा किंवा त्यांच्या भाषेत बोलावयाचे तर, सत्याग्रहाचा मार्ग अशा प्रकारच्या अडचणीतच त्यांस सुचलेला असून त्यांनी अनेक अडचणी सोसून त्या मार्गाचा अवलंब केल्यामुळे तो आता शास्त्रपूत झाला आहे. हा मार्ग सर्व प्रसंगी, सर्व काळी अवलंबिण्यासारखा असला तरी तो हरएक प्रसंगी उपयोगात आणावाच किंवा नाही अगर सर्व प्रसंगी तितकाच फलद्रूप होईल किंवा नाही हे निश्चयाने सांगणे कठीण आहे. तथापि त्या मार्गाची योग्यता मोठी आहे, हे सर्वांस कबूल करावे लागेल. राजाने केलेल्या कायद्याप्रमाणे सर्व प्रजेने वागावे म्हणूनच प्रत्येक कायद्याच्या मागे तो उल्लंघन करणारास शासन सांगितलेले असते. हे शासन प्राय: अशा प्रकारचे असते, की त्यामुळे मनुष्यमात्राची प्रवृत्ती नीतीने वागण्याकडे व्हावी. नीतीचा मार्ग सुखाचा, समाधानाचा आणि शांततेचा असतो. आणि त्या मार्गाने जाण्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीत जर स्वार्थामुळे थोडी चलबिचल होण्याचा संभव असला, तर हे कायद्याचे शासन ती चलबिचल काढून टाकून मनुष्याची सन्मार्गाकडे असलेली स्वाभाविक निष्ठा दृढ करण्यास कारणीभूत होते. पण त्याच्या उलट स्थितीत, म्हणजे जेव्हा कायद्याने ठरविलेली मर्यादा धर्ममूलक अगर न्यायमूलक नसून केवळ कायद्यात सांगितलेल्या शासनामुळेच ती अंमलात यावी असा प्रचलित कायद्यांचा परिणाम होऊ लागतो, तेव्हा कायद्याने दिलेले शासन भोगून धर्मतत्त्वावरची किंवा न्यायतत्त्वावरची आपली सत्यनिष्ठा कसोटीला लावावी अथवा कृत्रिम कायद्यातील शासनाच्या भीतीने ईश्वरनिर्मित न्यायतत्त्वाचा अव्हेर करण्यास प्रवृत्त व्हावे अशा शहाण्यासुरत्या मनुष्याच्या डोळ्यांपुढेही एक महत्त्वाचा प्रश्न उभा राहतो. सत्यनिष्ठ माणसे कायद्याचा कृत्रिम निर्बंध पाळणे अशा वेळी युक्त नाही असे सांगतात. पण हे सांगणे अमलात येण्यास सत्यावरील निष्ठा इतकी तीव्र असावी लागते, की स्वतःच्या किंवा आपल्या बायकामुलांच्या सुखा-सुखाचा, बलाबलतेचा विचारही मनात न आणता मनुष्य आपले कर्तव्य करण्यास झटदिशी प्रवृत्त होईल. ज्याला मानसिक धैर्य, खरी सत्यनिष्ठा किंवा सात्त्विक शील आणि दानत म्हणतात ते हेच होय. हा गुण केवळ विद्वत्तेने येत नाही. केवळ चांगल्या कुलात उत्पन्न झाल्याने येत नाही, आणि केवळ बुद्धिमत्तेनेही येत नाही. खरे आत्मबल हेच होय. आणि उपनिषदांतील 'नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन' हे तत्त्व नीट लक्षात ठेवले पाहिजे.

पण असा प्रकारचे आत्मबल नुसत्या विद्वत्तेने अगर बुद्धिमत्तेने प्राप्त होण्यासारखे नसून ते नैसर्गिकच पाहिजे, हा सिद्धांत जरी खरा असला तरी, निश्चयी मनुष्यास हा गुण, गीतेत म्हटल्याप्रमाणे, अभ्यास आणि वैराग्य यांच्या योगाने, क्रमाक्रमाने नेहमीच प्राप्त होण्यासारखा असतो, हेही विसरता कामा नये. थोर व उदार पुरुषांची चरित्रे शील-चरित्र-वर्धनास उपयोगी पडतात, यातील बीज हेच होय.

☑☑☑

(संग्राहक - डॉ० अशोक चौसाळकर)



अनुक्रमणिका

# पत्रव्यवहार

संपादक,

'नवभारत' यांसी,

स०न०

'नवभारत' मे-जून-जुलै २००७ च्या अंकात श्री० विश्वास दांडेकर ह्यांच्या 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे'चे श्री० अ० द० मराठे ह्यांनी केलेले समीक्षण चिंतन वाचले. त्यात पृ० १०४ वर "दुर्योधनाचे चित्रसुद्धा दुष्ट पुरुषाचे रंगवले जाते तसे नव्हते. तो प्रजाहितदक्ष होता. पांडवांच्या प्रजेला त्याने पांडवांचा विसर पडायला लावले होते. (हा विचार प्रथम भारवीच्या 'किरातार्जुनीय' महाकाव्यात दिसतो.)" असे म्हटले आहे. वस्तुत: भारवि (इ०स० ५५० चा सुमार) च्या अनेक शतके आधी होऊन गेलेल्या भासाच्या 'पञ्चरात्रम्' ह्या तीन अंकी समवकार नाटकात हा सूर स्पष्टपणे ऐकू येतो. मॅक्डोनेल्च्या मते कौरव पांडवांचे युद्ध म्हणजे एक 'नागरयुद्ध' होते, मुळात दुर्योधन मोठा सत्प्रवृत्त होता, पांडव त्याच्याशी अन्यायाने वागून त्याच्या राज्याचा अपहार करणारे होते. आपल्या 'मालविकाग्निमित्र' नाटकाच्या प्रस्तावनेत कालिदासाने भासाला प्रथितयश म्हणून उल्लेखिले आहे; त्याअर्थी तो कालिदासाहून आधीचा. सर्वात प्राचीन नाटक मृच्छकटिक हे चारुदत्तम्चे सविस्तर संस्करण. मृच्छकटिकाचा कर्ता शूद्रक हा इ०स० पूर्व २-३ शतकात गादीवर आल्याचे डॉ० व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो. म्हणजे भास हा त्यापूर्वीचा. टी. गणपती शास्त्री हे विद्वान आचार्य त्रावणकोर संस्थानाचे वतीने प्राचीन ग्रंथसंशोधन कार्यात हिंडत असताना १९१० साली त्या संस्थानाच्या दक्षिण भागात पद्मनाभपुराजवळ मनलिक्कर मठात त्यांना ३०० वर्षांपूर्वीच्या मल्याळी लिपीतील जुने ग्रंथ सापडले. 'स्वप्नवासवदत्तम्', 'पञ्चरात्रम्', 'चारुदत्तम्' इत्यादि ती १३ नाटके त्रिवेंद्रम संस्कृत ग्रंथमालेत एक दोन वर्षात त्यांनी प्रसिद्ध केली. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात भासाच्या ह्या १३ नाटकांपैकी 'प्रतिज्ञायौगन्धरायणम्' नाटकातील 'नवं शरावं सलिलैः सुपूर्णम्..' (४.३) हा श्लोक येतो. म्हणजे भास कौटिल्याच्या आधीचा ठरतो. 'प्रतिमा' नाटकात भासाने बृहस्पतीच्या 'अर्थशास्त्रा'चा उल्लेख केला आहे. महाभारत व कौटिल्य दोघांतही बृहस्पतीच्या ह्या अर्थशास्त्राचा उल्लेख आहे. पुराणांवरून वत्सराज उदयन, महासेन प्रद्योत व मगधाचा राजा दर्शक हे समकालीन. बौद्ध व जैन ग्रंथांच्या आधारे हे तीन राजे बुद्ध व महावीर ह्यांना समकालीन होत. त्यातील दर्शक हा इ.स.पू. ४७५-५० च्या सुमारास राज्य करीत होता, हे डॉ० स्मिथने दर्शविलेले. नंतर १०० वर्षांनी भास झाला असे म्हटले तरी त्याचा समय इ.स. पूर्व ३७५ ठरतो. तात्पर्य, दुर्योधन हा प्रजाहितदक्ष सत्प्रवृत्त राजपुरुष होता हा विचार श्री० मराठे मानतात तसा भारवीने प्रथम मांडलेला नव्हे. इ.स. च्या सहाव्या शतकातील भारवीच्या, सुमारे १ सहस्र वर्षे पूर्वी इ.स. पूर्व ४ थ्या शतकातील भासाने तो त्याच्या 'पञ्चरात्रम्' नाटकात आधीच मांडलेला आहे ! लेखाच्या शेवटी श्री० मराठे ह्यांनी लिहिले आहे, "खटकणारी गोष्ट एकच - अनेक मुद्रणदोष !" खुद्द मराठ्यांच्या 'नवभारता'तील प्रस्तुत लेखात मस्त्य देशात (पा.१०४, मत्स्य हवे !) असे २ दा आलेले, त्याच पानावर खालच्या उजवीकडच्या अंतिम ओळीत उपलव्य (उपप्लव्य हवे !) पा. १०५ वर अग्नेयेला (आग्नेयेला हवे !), नैत्रृत्येला (नैर्ऋत्येला हवे !), भौगिलिक (भौगोलिक हवे !), पा. १०८ वर वरून २ री ओळ दृष्टद्युम्न (धृष्टद्युम्न हवे!), पा. १०९ वर २ दा दुराभिमान (दुरभिमान हवे !) हे मुद्रणदोष पाहून खेद वाटला.

'जीर्णोद्धार' लेखमालेसाठी लेखक व संपादक उभयतांचे मनःपूर्वक अभिनंदन. ती ग्रंथरूपाने संकलित व प्रकाशित केल्यास प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेच्या दर्जेदार मराठी प्रकाशनमालिकेत एका संग्राह्य ग्रंथरत्नाची भर पडेल. कळावे.

- प्रा० म० शं० वाबगावकर, नागपूर १०.



अनुक्रमणिका

संपादक, 'नवभारत' यांना स० नमस्कार.

२७-२८ मे रोजी वाई येथे प्राज्ञपाठशाळेत झालेल्या लोकशाही व समाजवाद ह्या विषयावर झालेल्या चर्चेचा समाजवाद म्हणजे काय याबद्दलचा माझा निष्कर्ष -

१. समाजवाद म्हणजे वस्तु व सेवा यांचे उत्पादन, वितरण व विक्री व्यवस्था यांच्यावर शासनाची मालकी अथवा पूर्ण नियंत्रण असा अर्थ होत नाही.

२. समाजवाद म्हणजे कामगारवर्गाची हुकुमशाही असा अर्थ नाही.

३. समाजवाद म्हणजे थोडक्यात -

(अ) मृत्यूनंतर मालमत्तेच्या १० ते ५० टक्के अशा वाढत्या प्रमाणात मालमत्ताकर भरावा लागणे. यामध्ये योग्य अशा सवलती असतील. तसेच मृत्यूपूर्वी ७ वर्षेपर्यंत दिलेल्या बक्षीस रकमा व मालमत्ता यांचाही समावेश करपात्र मालमत्तेत केला जाईल.

(ब) अनर्जित मिळकती (Un-earned Income) वर ठराविक मर्यादेनंतर अर्जित मिळकतीपेक्षा जास्त आयकर असावा. यामध्ये डिव्हिडंड, व्याज, भांडवली फायदा, बक्षीस मिळालेल्या व लॉटरी, जुगार व शर्यती यांमधून मिळालेल्या रकमा यांचा समावेश होतो.

(क) बेकार भत्ता, वृद्धत्व भत्ता, अपंगत्व भत्ता, अनाथ भत्ता व सक्तीची आरोग्य विमा योजना.

दारिद्र्य रेषेखालील व्यक्तींचा विमा हप्ता बेकार भत्तामार्फत भरला जाणे.

(ड) दारिद्र्यामुळे कोणाचेही शिक्षण अडणार नाही अशा प्रकारची शिक्षण-अनुदान/कर्ज व्यवस्था व कमवा व शिका योजना.

समाजवादी मंडळींची याला संमती आहे काय?

- सुभाष आठले, कोल्हापूर.

☑☑

टीप : माझी वैयक्तिक संमती आहे. Indian Liberal Group ची आहे काय?

- देवदत्त दाभोलकर

आदरणीय प्रा० दाभोलकर सर यांना,

सप्रेम नमस्कार वि०वि०

मे मधील सातारा व वाई येथील दोन्ही शिबिरांना येता आले नाही. आलो असतो तर प्रत्यक्षात भेटणे/बोलणे झाले असते. नवीन शिक्षणाच्या प्रयोगात खूप काही नवीन शिकायला अनुभवायला मिळत आहे. खानापूर तालुक्यातील अत्यंत मागासलेल्या डोंगराळ भागातील वस्त्यांमध्ये कलिका केंद्रं काढली आहेत. या केंद्रांतून बालसखा-बालसखी म्हणून काम करणारे मित्र/मैत्रिणी त्याच गावातील/परिसरातीलच आहेत. कोणी ४ थी पर्यंत शिकलं आहे, तर कोणी ८ वी पास/नापास. एकदोघे जण १० वी पर्यंत शिकलेले आहेत. यांना घेऊन काम करावयाचे आहे. एकीकडे खूप कठीण असे काम, त्याचबरोबर एक आव्हान पण वाटते. ५ केंद्रांत काम करणाऱ्यांना (१० लोक) पंधरा दिवसांतून एकदा जाऊन दोन दिवस राहून आम्ही मित्रमंडळी त्यांना शिकायला मदत करत आहोत. यातूनच मुलांना शिकवण्याचे ते कसे शिकतील यासाठी प्रयत्न करत आहोत. यासंबंधात तयार झालेला अहवाल तसेच मी तुम्हाला कबूल केल्याप्रमाणे शिक्षणातील माझे स्वतःचे अनुभव पण पाठवून देत आहे. प्रिय ताईंची तसेच तुमची प्रकृती ठीक ना? स०न० सांगा.

आ०वि०
शिवाजी

☑☑

प्रा. म. शं. वाबगावकर,
नागपूर, १०

आपल्या पत्राबद्दल मी आभारी आहे. आपले पत्र माझा उत्साह वाढविणारे आहे. मी जरी संपादक असलो वा नसलो तरी नवभारतच्या संपादक मंडळाला आवश्यक तेथे साथ करावयास मला आनंदच राहील.

- देवदत्त दाभोलकर

☑☑








आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत
२० नोव्हेंबर २००६
पासून लागू

| | |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. वेडेकर | ३० रु. |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु. |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु. |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |
| ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु. |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

अनुक्रमणिका








'नवभारत'चा 'शिक्षण आणि समाजपरिवर्तन' हा अंक या विषयाला पूरकच आहे. वाचकांच्या सोयीसाठी त्यातील लेखांची अनुक्रमणिका खाली दिली आहे.

## नवभारत - शिक्षण आणि समाज परिवर्तन विशेषांक - सप्टेंबर-ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००३

अनुक्रमणिका

# J. P. Naik

Naik was in constant touch with developing educational thought all over the world and the exposed Indian educationists to these ideas. Conversely, by his participation in international educational activities, he became the authentic spokesman in those forums for the educationally backward Third World countries in general and for India and Indian education in particular. It is his wide-ranging national activities that have been in a large measure responsible for putting India on the world educational map.

**Naik's educational thought**

To describe and analyse the educational ideas of Naik is not an easy task, for he had a prolific output. Even if his non-educational writings are excluded, his books alone run into more than thirty-five titles. In addition, there are numerous reports of the commissions and committees in which he participated. It is no exaggeration to say that whenever Naik was member of a committee or commission he was invariably also the author of its report, which incorporated a number of his own ideas on that theme. Inevitably these books, booklets and reports taken together cover almost every aspect of Indian education.

After Naik had begun to work systematically and vigorously as Secretary to the Indian Council for Social Science Research, fostering social science research in India its present wide range, bringing in such fields as the status of women in India and social change among the weaker sections of society. At the same time, this ICSSR connection changed his own perspective on the Indian educational situation and changed his understanding of the relationship between educational change and social change.

In his last work Education Commission and After, undertaken during the vary last phase of his life, Naik frankly admits that the framework adopted in the Education Commission Report about education and development had basic weaknesses, since it did not even refer to the extreme poverty and deprivation in Indian society, and the highly unequal distribution of earnings, wealth and political power - the fundamental problems of Indian society, which need to be faced squarely. His close association with social science research in the ICSSR had changed his outlook and he would have preferred to have been Secretary of the ICSSR before becoming Secretary of the Education Commission!

Naik's departure from the Indian educational scene has created a large void which can not be easily filled. In a sense, it was the end of an epoch. It is for the on-going generations of Indian educationists to work for his idea of radical reconstruction of Indian education with a clearer perspective.

(Excerpts from A.R. Kamat's article published in UNESCO's *Prospects*, Vol. 13, No. 2, 1983, pp. 259-64)



हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




